# ज्ञानेशांची
# अमृतवाणी

: संपादक :

प्रा. हरि श्रीधर शेणोलीकर, एम्. ए.

लिंगराज कॉलेज, बेळगांव



स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

# निवेदन

वारकरी सांप्रदायिक व हरिदास-कीर्तनकार यांच्या द्वारां ज्ञानेशांच्या कांहीं ओव्यांशीं तरी प्रत्येक महाराष्ट्रीय माणसाचा थोडाबहुत परिचय असतोच. त्यामुळें ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाबद्दल सर्वांच्याच ठिकाणीं आत्यंतिक पूज्यबुद्धि दिसून येते. ज्ञानेशांचें चरित्र, कर्तृत्व व कवित्व यासंबंधीं आजवर पुष्कळ ऊहापोह झाला असून सामान्य माणसांच्या आदरभावनेला डोळस करण्याचे प्रयत्न अनेक विद्वानांनीं केले आहेत. तरी देखील ज्ञानेश्वरीच्या अंतरंगाकडे सामान्य माणसाचें लक्ष क्वचित् जातें. ज्ञानेशांची वाणी प्रसन्नमधुर असली तरी तिच्यांतील अध्यात्मविषय सामान्यांच्या दृष्टीनें गहनच आहे. शिवाय कालभेदामुळें ज्ञानेश्वरीची भाषाहि आजच्या वाचकाला बरीच दुर्बोध वाटते. त्यामुळें कांहीं सांप्रदायिक वगळल्यास रसज्ञतेनें व मार्मिकतेनें अथपासून इतिपर्यंत ज्ञानेश्वरीचें वाचन करणें जिज्ञासू वाचकालाहि अशक्य वाटतें; त्यामुळें अशा लोकांना ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाची, वाङ्मयाची व तत्त्वबोधाची स्थूल मानानें कां होईना पण पुरती कल्पना यावी अशा धोरणानेंच ज्ञानेश्वरीच्या निरनिराळ्या अध्यायांतील कांहीं निवडक वेंच्यांचें येथें संकलन करण्यांत आलें आहे.

या संकलनांत एकूण बावीस उतारे आहेत. आज सर्वांना उपलब्ध झालेल्या, प्रा. सोनोपंत दांडेकर यांनीं संपादित केलेल्या प्रसाद-प्रकाशनच्या 'ज्ञानेश्वरी'वरूनच हे उतारे घेतले आहेत. अर्थदृष्ट्या व कांहीं ठिकाणीं भाषादृष्ट्या राजवाडे-प्रतींतील जे पाठ मला विशेष महत्त्वाचे वाटले ते तळटीपांत नमूद केले आहेत. सामान्य वाचक किंवा विद्यार्थी यांच्या दृष्टीनें अनावश्यक असलेल्या पाठभेदांची गर्दी करणें मुद्दामच मीं टाळलें आहे. कवि आणि टीकाकार या नात्यानें ज्ञानेशांची भूमिका, त्यांच्या वेळचा समाज व त्यासंबंधींची ज्ञानेशांची प्रतिक्रिया, ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान व त्याला अनुसरून असलेली त्यांची शिकवण आणि त्यांची काव्यात्मक लेखनशैली या विविध अंगांनीं ज्ञानेश्वरांची ओळख व्हावी अशा क्रमानें

उताऱ्यांची मांडणी मीं केली आहे. तेव्हां सर्वसामान्य जिज्ञासू वाचकां-बरोबरच मराठी वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांनाहि प्रस्तावना, टीपा व उताऱ्यांचे पूर्वापर संदर्भ यांच्या सहाय्यानें या 'अमृतवाणी'चा लाभ घेतां येईल.

पदवी-परीक्षेसाठीं नियुक्त केल्या जाणाऱ्या एखाद्या अध्यायाच्या द्वारां ज्ञानेशांच्या संपूर्ण व्यक्तित्वाची व कलात्मक शैलीची पुरती ओळख एक-जिनसीपणानें होऊं शकत नाहीं; ती उणीवहि या संकलनानें दूर होईल अशी आशा आहे. मात्र प्रा. रा. द. रानडे यांच्या 'ज्ञानेश्वर वचनामृता'ची व या 'अमृतवाणी'ची बैठकच मुळांत वेगळी आहे; तेव्हां त्या ग्रंथाशीं या लहानशा प्रयत्नाची तुलना होऊं नये.

अशा संपादनाच्या कामांत दर्दी असलेल्या पूर्वगामी संपादकांचा 'मागोवा' घेतच मी निघालों आहें. परंतु प्रत्यक्ष हें पुस्तक तयार करतांना माझे स्नेही प्रा. गं. बा. सरदार यांच्या मार्गदर्शनाचा व विचारविनिमयाचा मला पुष्कळच उपयोग झाला. तसेंच माझे सहकारी प्रा. कृ. ब. निकुम्ब, प्रा. स. वा. दीक्षित आणि माझे मित्र श्री. ग. चिं. बझे, एम्. ए. यांनींहि निरनिराळ्या प्रकारें मला सहाय्य केलें, याबद्दल त्या सर्वांचा मी ऋणी आहे.

प्रकाशनाची सारी जबाबदारी अंगावर घेऊन या संपादनाची कामगिरी पार पाडण्याची संधि मला दिल्याबद्दल कोल्हापूरच्या स्कूल ॲन्ड कॉलेज बुकस्टॉलचे श्री. दा. ना. मोघे यांचा मी मनःपूर्वक आभारी आहे. तसेंच या पुस्तकाची छपाई तत्परतेनें व चांगल्या प्रकारें करून दिल्याबद्दल समर्थ भारत प्रेसचे चालक, व्यवस्थापक व कामगार यांचाहि मी आभारी आहे.

४०० माधवपूर—वडगांव,
बेळगांव
भाद्रपद शु. ॥ ४, १८७६

ह. श्री. शेणोलीकर

# प्रस्तावना

महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासांतील यादवकालाच्या[1] अखेरीअखेरीला ज्ञानेश्वरीसारखा अलौकिक काव्यग्रंथ गीता-टीकेच्या रूपानें मराठी भाषेंत निर्माण झाला. या ग्रंथाच्या द्वारांच ज्ञानेशांनीं वैदिक धर्माच्या तत्त्वज्ञानाला उजाळा देऊन धर्मसुधारणेचें एक प्रचंड आंदोलन महाराष्ट्रांत सुरूं केलें. पूर्वापार चालत आलेल्या पंढरीच्या भक्तिसंप्रदायामध्यें नवचैतन्य निर्माण करून ज्ञानेश्वरीमधील तत्त्वबोधाच्या भरभक्कम पायावरच ज्ञानेश्वरांनीं भागवतधर्माच्या[2] मंदिराची उभारणी केली. ब्राह्मणांपासून तों शूद्रातिशूद्रांपर्यंत साऱ्या अठरापगड जातींतील स्त्रीपुरुषांना ज्ञानेश्वरीनें एक प्रकारची नवी जीवनदृष्टि दिली आणि तत्कालीन समाजाचा कायापालट घडवून आणला. ज्ञानेश्वरसमकालीन नामदेवादि संतमंडळींवर ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाची व त्यांच्या अमृतमधुर वाणीची जबरदस्त छाप पडावी यांत कांहींच आश्चर्य नाहीं. पण केवळ ज्ञानेश्वरांच्या समकालीनांवरच ज्ञानेशांच्या गीताटीकेनें प्रभाव पाडला असें नसून तिचें अधिराज्य त्यांच्या पश्चात्‌हि चार-पांचशें वर्षें एकछत्रीपणानें नांदत राहिलें. कारण ज्ञानेश्वरीनें मराठी साहित्यामध्यें आपली अशी एक उज्ज्वल नि थोर परंपरा निर्माण करून ठेविली होती. मध्यंतरीं परधर्मीयांच्या राजवटींत वारकरी पंथाचा जोम कांहीं काळ ओसरला. तरीदेखील ज्ञानेशांच्या बोधगंगेचा शुद्ध प्रवाह या महाराष्ट्रभूमींतून तसा अजिबात

---

१. ज्ञानेश्वरी इ. स. १२९० त लिहिली गेली. ( शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।। ) त्या वेळीं रामदेवराव यादव हा देवगिरीच्या यादव साम्राज्याचा अधिपति होता. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं स्थलकालाचा निर्देश करणाऱ्या ओव्या ज्ञानेशांनीं लिहिल्या आहेत. त्यांत 'न्यायातें पोषी क्षितीशु । रामचंद्रु ' असा उल्लेख आहे.

२. ' ज्ञानदेवें रचिला पाया । तेणें उभारिलें देवालया ।।'–बहिणाबाई.

लुप्त झाला नव्हता, ही गोष्ट कान्होपात्रा, दामाजी, भानुदास[2] या संतांच्या चारित्र्यावरून व अभंगवाणीवरून स्पष्ट दिसून येते. उलट तीनशें वर्षांनंतरच्या बदललेल्या परिस्थितींतहि एकनाथांसारख्या अधिकारी व्यक्तीनें भागवतधर्माच्या पुनरुज्जीवनासाठीं म्हणून ज्ञानेशांच्या समाधीचा जीर्णोद्धार केला. ज्ञानेश्वरीची पाठशुद्ध संहिता[3] तयार केली आणि आपल्या विचारप्रवर्तक नि लोकप्रिय ग्रंथांतून ज्ञानेशांच्या शिकवणुकीलाच उजाळा दिला. त्यामुळें तर सोळाव्या शतकांत महाराष्ट्रामध्यें सांस्कृतिक पुनरुज्जीवन घडून आलें. अशा रीतीनें मध्यंतरीं दोनअडीचशें वर्षे सांस्कृतिकदृष्ट्या चेतनाशून्य बनलेल्या महाराष्ट्रसमाजाला पुन्हां ज्ञानेशांच्या वाणीनेंच एक प्रकारें संजीवन दिलें अशी इतिहासाची साक्ष आहे. एकंदरींत महाराष्ट्र समाज व मराठी साहित्य या दोहोंच्या बाबतींत ज्ञानेशांची गीताटीका खरोखरच अमृतवाणी ठरली यांत शंका नाहीं. ही अमृतमयता किंवा संजीवकता ज्ञानेशांच्या वाणींत कशा रीतीनें व कोणत्या स्वरूपांत अवतरली हें जाणून घेणें महाराष्ट्राच्या आजच्या परिस्थितींतहि संजीवक होईल. त्यासाठीं ज्ञानेश्वरांच्या गीता-टीकेंतील स्वतंत्रपणा व सकसपणा आणि त्यांच्या विवेचन पद्धतींतील अपूर्वता व परिणामकारकता ह्या गोष्टी समरसतेनें, सूक्ष्मतेनें आणि साकल्यानें नीट समजून घेतल्या पाहिजेत. ज्ञानेश्वरांसारख्या युगप्रवर्तक विचारवंताच्या शब्दांना जें एवढें विलक्षण सामर्थ्य प्राप्त होतें, तो कांहीं निव्वळ योगायोग नव्हे. अशा महापुरुषाचें थोर व्यक्तित्व व तत्कालीन समाजस्थिति यांच्यांतील परस्परसंबंध यांची योग्य रीतीनें संगति लावली; तरच त्यांच्या अमृतवाणीचें रहस्य आपल्याला कळूं शकेल.

---

१. इ. स. १४८० च्या सुमारासच कान्होपात्रा, दामाजी हीं होऊन गेलीं.

२ भानुदास हे एकनाथांचे पणजोबा. (इ. स. १४४८-१५१३)

३. 'श्रीशके पंधराशें साहोत्तरीं। तारणनाम संवत्सरीं।
एका जनार्दनें अत्यादरीं। गीता ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ (एकनाथ)

## ज्ञानेश्वरांचें चरित्र व सामाजिक कर्तृत्व

ज्ञानेश्वरांचें लोकविलक्षण असें चरित्र सर्वांना परिचित आहेच. संन्यासोत्तर गृहस्थाश्रम पत्करणाऱ्या विरक्त वृत्तीच्या विठ्ठलपंतापासून रखुमाबाईसारख्या साध्वी स्त्रीच्या पोटीं ज्ञानेशादि चार भावंडांना जन्म मिळाला, या एकाच घटनेनें ज्ञानेशांच्या चरित्राला त्या वेळच्या परिस्थितींत लोकविलक्षण असें वळण लागलें. शके ११९३ ( इ. स. १२७१ ) मध्यें आपेगांवीं ज्ञानेशांचा जन्म[१] झाला. धार्मिक बहिष्काराचा छळ सहन करी-तच त्यांचें बालपण आळंदींत गेलें. वर्णाश्रमधर्माच्या अभिमान्यांनीं धर्मविरुद्ध आचरण करणाऱ्या विठ्ठलपंताला देहान्ताची शिक्षा फर्मावली, आणि 'संन्याशाचीं मुलें' म्हणून या भावंडांना मौंजीबंधनाच्या संस्का-राला अनधिकारी ठरविलें. विठ्ठलपंतानें ब्रह्मवृंदाचें शास्त्रवचन प्रमाण मानून पश्चात्तापदग्ध वृत्तीनें प्रयागच्या त्रिवेणीसंगमांत पत्नीसह आपल्या देहाचें विसर्जन केलें. त्या वेळीं ज्ञानेश्वर अकराबारा वर्षांचे असावेत. त्यांचे वडील बंधू निवृत्तिनाथ हे पंधरा वर्षांचे होते. ब्रह्मवृंदानें शुद्धिपत्र देऊन आपल्या कुटुंबाला पावन करून घ्यावें अशी विठ्ठलपंतांची इच्छा होती. पण आळंदीकर ब्राह्मणांनीं शासन तेवढें सांगून टाकिलें आणि शुद्धिपत्रासाठीं पैठणच्या शास्त्रीमंडळींकडे बोट दाखविलें. अन्तःकरणाला पीळ पाडणाऱ्या या एकाच प्रसंगानें वर्णाश्रमधर्माच्या चौकटीचा बंदिस्त-पणा, पढिक पंडितांचें निर्घृण शब्दप्रामाण्य, आणि बौद्धिक मिरासदारी लाभलेल्या ब्रह्मवृंदाचा भावनाशून्य कर्मठपणा या साऱ्या अनिष्ट प्रवृत्तींची निवृत्ति-ज्ञानेशांना एकदमच कल्पना आली. म्हणूनच कर्मकांडापेक्षां योग-साधनेला, शास्त्रवचनांपेक्षां आत्मानुभूतीला आणि उच्चनीचभावाऐवजीं

---

१. या स्थलकालाबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. कांहीं संतमंडळींच्या वचनाधारें ज्ञानेशांचा जन्म आळंदी मुक्कामीं शके ११९७ त झाला असें कांहीं-जण मानतात. ( ज्ञानेश्वरी-दांडेकर प्रत. पानें ३,४,९, २० व ३० पाहा. )

समबुद्धीला प्राधान्य देणाऱ्या नाथसंप्रदायाकडे निवृत्तिनाथांचें लक्ष वळलें. त्यांनीं शुद्धिपत्रासाठीं पैठणला येण्यापूर्वींच त्र्यंबकेश्वरीं गहिनीनाथांपासून उपदेश घेऊन स्वतः नाथसंप्रदायांत प्रवेश केला व पुढें ज्ञानेश्वरांनाहि त्या संप्रदायाची दीक्षा[२] दिली. या मार्गांतील 'अद्वयानंदवैभवा'च्या आत्मसुखांत गढून गेल्यामुळेंच निवृत्तिनाथांना शुद्धिपत्राची तितकीशी जरुरी वाटली नाहीं. मात्र ज्ञानेशांच्या ठिकाणीं नाथसांप्रदायिकांचीच दलितोद्धाराची प्रेरणा प्रबळ असल्यामुळें लोकसंग्रहासाठीं तरी 'मार्गाधारें वर्तावें[३]' 'जनीं दाखवावें वर्तोनियां[४]' अशा बुद्धीनें ज्ञानेशांनीं वडिलांच्या इच्छेनुसार पैठणच्या शास्त्रीमंडळींकडून शुद्धिपत्र मिळविण्याची खटपट केली. पण त्यांच्या या उदात्त भूमिकेची कदर पैठणकरांनीं केली नाहींच. शुद्धिपत्रें वगैरे कांहीं न देतां 'न बाढवा संसृतिकामबंड' असा मानभावीपणाचा सल्ला देऊन त्यांनीं या भावंडांना वाटेला लावलें. शास्त्रीपंडितांच्या या हटवादी भूमिकेमुळें 'संन्याशाचीं मुलें' म्हणून या भावंडांचा उपहास करणाऱ्या टवाळांना अधिकच जोर चढला असणें, अगदीं स्वाभाविक आहे. अशांना गप्प करण्यासाठींच बहुधा नाथसंप्रदायी ज्ञानेशांनीं योगबलानें कांहीं चमत्कार[६] करून दाखविले असावेत. त्या चमत्कारानें दिङ्मूढ

---

१. ज्ञानेशांच्या घराण्याचा या संप्रदायाशीं पूर्वापार संबंध होता. ज्ञानदेवांचे आजोबा गोविंदपंत व आजी नीराई या उभयतांनीं गहिनीनाथांचाच अनुग्रह घेतला होता.

२. ज्ञानेशांनीं ज्ञानेश्वरींत शेवटीं नाथसंप्रदायी गुरुपरंपरा दिली आहे. (अ. १८-१७५१-६३ ओव्या पाहा.)

३. मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें । अलौकिका नोहावें । लोकाप्रति ।। ( ज्ञाने० ३-१७१ )

४. नामदेवकृत 'आदि' अभंग ९०३.

५. 'बोपदेवेन प्रथितं शुद्धिपत्रं समर्पितम् ।' अशा उल्लेखाचें एक शुद्धिपत्र पाहावयास मिळतें; ( मिंगारकरकृत 'ज्ञानेश्वर चरित्र' ) पण त्याच्या खरेपणाबद्दल शंका आहे.

६. रेड्याकरवीं वेद बोलविले अशी कथा आहे. (?)

झालेल्या ब्राह्मणमंडळींनीं "धन्य[२] यांचा वंश धन्य यांचें कूळ धन्य पुण्यशील अवतार हे ।। अशा देवत्रयांना प्रायश्चित्त कोणी द्यावें ?" असे गौरवाचे उद्गार काढले; पण ब्राह्मणत्वाचे अधिकार कांहीं बहाल केले नाहींत. शास्त्रप्रामाण्याच्या पोटीं एवढी अनुदार वृत्ति निर्माण व्हावी याचें आश्चर्य वाटून 'आपल्या परंपरागत शास्त्रग्रंथांनीं धर्माचें खरें रहस्य तरी काय सांगितलें आहे' या अतीव जिज्ञासेनेंच ज्ञानेशांनीं पैठणच्या मुक्कामांत धर्मग्रंथांचें अध्ययन[१] केलें असावें. उपनिषदें, बादरायणसूत्रें गीता, शांकरभाष्यें, भागवत, योगवासिष्ठ इत्यादि अध्यात्मग्रंथांचे संस्कार[२] ज्ञानेशांच्या ग्रंथावरहि झालेले स्पष्ट दिसून येतात. याखेरीज षड्दर्शनें, स्मृतिग्रंथ, अष्टादश पुराणें, काव्य-नाटकें आणि बौद्ध-जैन हीं अवैदिक मतें यांचाहि त्यांनीं चांगला परिचय[३] करून घेतला होता असें दिसतें. त्यावरून ज्ञानेशांच्या बहुश्रुततेची व ग्रंथगत ज्ञानाची कल्पना येते.

मात्र अशा प्रकारच्या पांडित्यसंपादनानंतरहि पैठणकर शास्त्रीपंडितांच्या हटवादी भूमिकेशीं आणि आळंदीकर ब्राह्मणांच्या आत्मघातकी संकुचित-पणाशीं ज्ञानेश्वर सहमत होऊं शकले नाहींत. उलट शब्दच्छल करणाऱ्या या धर्ममार्तंडांना औपनिषदिक धर्माचें खरें रहस्य कळलेलेंच नाहीं, अशी त्यांची खात्री पटली. म्हणून अध्यात्मग्रंथांच्या मननांतून व प्रत्यक्ष

---

१. अध्यात्मग्रंथ पाहती पैठणीं। गीतासंबोधिनी जवळी असे ।। (नामदेव.)

२. अ. १३ मध्यें नासदीय सूक्ताचें विवरण आहे, तर अ. ६ मध्यें पातंजल योग आला आहे. अमृतानुभवावर योगवासिष्ठाची बरीच छाप आहे. अनेक श्रुति-वचनांचे अनुवाद ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत आणले आहेत. उदा० 'विभाति यस्य भासा । सर्वमिदं' हा ऐसा। श्रुति काय वायसा। ढेंकरू देती । (अमृ० प्र. ७–२९०) [अधिक तपशीलासाठीं 'पांच संतकवि' (डॉ. तुळपुळे) पृष्ठें १६–१७ पाहा.]

३. अ. १ मधील प्रारंभींच्या गणेशावरील रूपकांत या साऱ्यांचा ज्ञानेशांनीं मार्मिकपणें उल्लेख केला आहे. अ. १३ मध्यें सांख्यशास्त्राचा संक्षेप आहे. बौद्धांचा शून्यवाद, जैनांची अहिंसा यांचा परामर्शहि ज्ञानेशांनीं घेतला आहे.

जीवनानुभवांतून ज्ञानेशांना जो नवा धर्मविचार स्फुरला त्याच्या प्रचाराला त्यांनी पैठणांतूनच सुरुवात केली. उदार नि व्यापक अशा औपनिषदिक धर्मतत्त्वांचा आणि गीतेनें घालून दिलेल्या सुलभ अशा आचार-धर्माचा लोकांमध्यें प्रसार करण्यासाठीं ज्ञानेशांनीं प्रवचन नि कीर्तन या साधनांचा प्रथमतः अवलंब केला. सर्व मार्गांचा नि विचारांचा समन्वय करणाऱ्या गीतामाउलीच्या दृष्टीनें ज्ञानेश्वर जेव्हां अंवतीभोंवतीच्या प्रतिष्ठित समाजाकडे पाहूं लागले, तेव्हां त्यांना कसलें दृश्य दिसलें? तर—

## यादवकालीन धार्मिक परिस्थिति

—वेदाध्ययन करणारे वैदिक पंडित यज्ञयागादि विधींचें शास्त्रोक्त अवडंबर माजवीत आहेत. कशासाठीं? तर अमरावतीचा निवास, ऐरावताचें वाहन, अमृताचें कुंड, कामधेनूंचें खिल्लार, गंधर्वांचें गाणें आणि रंभा-उर्वशींचें नाचणें इत्यादि राजस सुखें ( ८–२५-३२ )[१] उपभोगायला मिळावींत म्हणून. त्याकरितां धर्मकृत्यांचा हा सारा बडिवार. हे धर्मनिष्ठ ब्राह्मण '**कर्मठ**' म्हणून नांवाजले गेले तरी ते केवळ '**भोगासक्त**' आहेत. त्यांचें वैदिक पांडित्य, त्यांचें कर्मकांड, त्यांची धर्मश्रद्धा ही सारी सकामबुद्धीमुळें अगदीं निरर्थक होत. म्हणून श्रीकृष्णाच्या तोंडूनच जणूं कांहीं ज्ञानेश्वर वैदिक पंडितांना सांगतात कीं, "तुम्ही वेदविद असलांत तरी 'वायां गेलेले वेद-विद' आहांत."( ८–३८ ).

यादवकालीन ब्राह्मणवर्णीयांची हीच स्थिति होती. यज्ञयाग, व्रत-वैकल्यें, उद्यापनें, समाराधना यांतच त्यांचा दिवसाचा सारा वेळ खर्च होत असे. हेमाद्रीच्या 'चतुर्वर्ग चिंतामणी'मध्यें दोन हजार व्रतें सांगितलीं आहेत. अध्ययन-अध्यापन, चिंतन–मनन करून ब्राह्मणवर्गानें समाजाला कांहीं उच्च आध्यात्मिक विचारांची व नैतिक मूल्यांची शिकवण द्याव-याची. तें बाजूलाच राहून रोज 'घृतकुल्या मधुकुल्या' करून दैनंदिन उदरंभरणाबरोबर परलोकांतील विलासांची तरतूद करण्यांतच ब्राह्मणवर्ण

---

१. अशासारख्या ठिकाणीं पहिला आंकडा उताऱ्यांचा क्रमांक असून पुढील आंकडे त्यांतील ओंव्यांचे आहेत.

गर्क झाला होता. अशा रीतीनें धर्माचें खरें रहस्य बिसरून स्वतः शास्त्रीपंडितच आपल्या तत्त्वज्ञानाशीं, आपल्या वृत्तीशीं, आपल्या पेशाशीं विसंगत असें आचरण करूं लागल्यावर वैश्य, शूद्र, अतिशूद्र या वर्णीयांनीं कोणाकडे पाहावयाचें ? भीतीच्या पोटीं निर्माण होणाऱ्या नैसर्गिक धर्मभोळेपणा पलीकडे त्यांच्या आचारविचारांना अधिक खंबीर असा पाया कोठून मिळावयाचा ? अशा बिनबुडाच्या धर्मश्रद्धेंतील अज्ञान व उथळपणा तेराव्या अध्यायांतील '**अज्ञान**'वर्णनांत ज्ञानेशांनीं दाखवून दिला आहे. चतुर्थीला गणपती, पंचमीला नागोबा, रविवारीं भैरोबा अशा अनेक देवतांच्या मागें धांवणाऱ्या '**अज्ञानी भक्ता**'चें यथातथ्य चित्र ज्ञानेशांनीं रेखाटलें आहे. ( उतारा ९ ) प्रसंगपरत्वें निरनिराळ्या दैवतांची संकुचित व सकाम बुद्धीनें आराधना करणाऱ्या माणसाची चित्तवृत्ति कशी अस्थिर असते, त्यामुळें त्याच्या धार्मिक वर्तनांत केवढी विसंगति नि हास्यास्पदता निर्माण होते, याची पूर्ण कल्पना त्या चित्रावरून येते. आजहि अशीं उदाहरणें आपण पाहतोंच. मग यादवकालांत "बहुसंख्य समाज हा तर बोलूनचालून मूढ व अज्ञानी होता. पशुतुल्य जीवन कंठण्यापलीकडे त्याला दुसरी गति नव्हती. त्याच्या ठिकाणी जी थोडीबहुत धर्मश्रद्धा होती, तिला कधीं उच्च विचारांची बैठक लाभलीच नाहीं. म्हणून अज्ञानानें, भीतीनें किंवा स्वार्थबुद्धीनें मंगळाई, जाखाई, म्हसोबा, बहिरोबा इत्यादि देवतांची भक्ति करण्यापलीकडे तिची मजल गेली नाहीं."[१] अशा या दलित समाजाचा उद्धार करण्याची जबाबदारी वास्तविक पाहतां त्या वेळच्या शास्त्रीपंडितांवर होती, परंतु त्यांनीं आपल्या या सामाजिक कर्तव्याची कधीं दखल घेतली नाहीं; इतकेंच नव्हे तर, या वर्गाला साध्या माणुसकीच्या भावनेनें वागविण्याइतकीहि उदारता या वरिष्ठ वर्णीयांनीं दाखविली नाहीं. त्यांच्या या अक्षम्य उपेक्षेमुळेंच महाराष्ट्रांतील निरक्षर व असंस्कृत बहुजनसमाज जैन, लिंगायत, महानुभाव इत्यादि अवैदिक पंथीयांच्या जाळ्यांत ओढला जात होता. अशा स्थितींत वैदिक धर्माची ही ओहटी जर थांबवावयाची असेल तर लोकांच्या भोळ्याभाबड्या धर्म-

---

१. 'संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति' (पान २७) प्रा. गं. बा. सरदार.

भावनेला अध्यात्मविचारांची खंबीर बैठक मिळवून दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, अशी ज्ञानेशांची खात्री पटली.

पण मी मी म्हणणाऱ्या त्या वेळच्या पंडितांनाहि खऱ्याखुऱ्या अध्यात्मज्ञानाची ओळख नव्हती. त्यांतील कोणी कर्मकांडांत निष्णात, तर कोणी ज्योतिषविद्येंत पारंगत; कोणी शिल्पकलातज्ञ, तर कोणी पाककलाभिज्ञ; कोणी जारणमारणकलेंत निपुण, तर कोणी मोहनविद्येमध्यें प्रवीण; तसेंच कोणी कोणी न्याय, व्याकरण, वेदान्त, वैद्यक इत्यादि विविध शास्त्रांचे अभ्यासी तर कांहीं जण काव्य, नाटक, संगीत इत्यादि कलांचे व्यासंगी; ( १०-४-९ ) असे किती तरी विद्याकलांचे भोक्ते[1] त्या काळीं होते, असें दिसतें. परंतु स्वतंत्र प्रज्ञेच्या अभावीं रूढ विचारांचें नि ठराविक कल्पनांचें चर्वित-चर्वणच त्यांच्या ग्रंथांतून होत होतें. त्यामुळें समाजजीवनाला योग्य वळण लावण्याचें सामर्थ्य त्यांमध्यें नव्हतें; पुनरुज्जीवनाच्या प्रेरणेंतून निर्माण झालेलें हें पोकळ पांडित्य समाजधारणेला आवश्यक अशा नैतिक मूल्यांची जोपासना करूं शकलें नाहीं.

एकीकडे लौकिक विद्यांमध्यें निष्णात असलेली ही वैदिक मंडळी आत्मानात्म-विचार करणाऱ्या अध्यात्मशास्त्राला निरुपयोगी समजून त्याचा उपहास करीत होती;(१०-१) तर दुसरीकडे बौद्ध,जैन, महानुभाव इत्यादि पंथीयांकडून विपर्यस्त अशा स्वरूपांत आत्मज्ञान सांगितलें जात होतें. म्हणून वैदिक संस्कृतीला केवळ वेलबुट्टीप्रमाणें शोभणाऱ्या या पल्लवग्राही पांडित्याचा ज्ञानेशांनीं स्पष्ट शब्दांत अधिक्षेप केला आहे. तत्कालीन पढिक पंडितांच्या अभ्यासविषयांची यादी देऊन हा सारा फाफट पसारा दृष्टीखेरीज अंगभर डोळे असणाऱ्या मोराच्या पिसाऱ्यासारखा आहे. ( १०-११ ) शोभिवंत असला तरी निरुपयोगीच, असें ज्ञानेश्वर म्हण-

---

१. यादवराजे वैदिक संस्कृतीचे व विद्या-कला यांचे पुरस्कर्ते होते. हेमाद्री बोपदेव, विज्ञानेश्वर यांसारखे चतुरस्त्र बुद्धीचे अनेक विद्वान् याच काळांत संस्कृतमधून कां होईना पण विपुल ग्रंथरचना करीत होते. ( महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण प्र. ३ पाहा.-डॉ. श्री. व्यं. केतकर )

तात. आणि शेवटीं "तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण । अध्यात्मज्ञानेंविण । एकलेनी ॥" (१०-१४) असा निर्णय देऊन टाकतात.

सात्त्विक स्वरूपाच्या आध्यात्मिक विद्येच्या अभावीं राजस नि तामस प्रकृतीचेंच थैमान साऱ्या समाजांत प्रत्यहीं चालू असलेलें पाहून चांगलीं चांगलीं विद्वान माणसेंहि कर्तव्यच्युत अन् स्वधर्मभ्रष्ट कां व्हावींत, ( १२-२ ) असा प्रश्न अर्जुनाबरोबर ज्ञानेश्वरांनाहि पडलेला दिसतो. गीतेच्या आधारानें ते त्याचें उत्तर शोधूं लागतात, तेव्हां मनुष्याच्या ठिकाणीं असलेल्या नैसर्गिक कामक्रोधांचा हा सगळा प्रभाव आहे असें त्यांना आढळून येतें. 'कामप्रवृत्तीखेरीज या जगाला दुसरें कांहीं मूळच नाहीं.' ( ११-२९ ) हा सिद्धान्त प्रमाण मानणारीं माणसें 'धर्म नि मोक्ष' ह्या पुरुषार्थांना अनावश्यक मानून 'अर्थ नि काम' ह्या पुरुषार्थांची मनोभावें सेवा करणार ( ११-१६-२२ ) यांत शंकाच नाहीं. कामापाठोपाठ लोभ नि क्रोध हे विकार येणारच. अशीं विकाराधीन झालेलीं माणसें सत्य, शांति, विवेक, वैराग्य, समाधान, आनंद, धैर्य नि वीर्य इत्यादि गुणांना पारखी होऊन काय काय वेडेचार करतात, याचें प्रात्याक्षिक सभोंवतालच्या समाजांत ज्ञानेश्वर सगळीकडे पाहत होते. म्हणूनच कामक्रोधांच्या दुवाडपणाचें भयानक चित्र ( उतारा १२ ) त्यांनीं आपल्या श्रोत्यांपुढें उभें केलें आहे. तसेंच अज्ञानामुळें माया-नदीच्या पुरांत सांपडून कर्मठ नि कर्मभ्रष्ट, वैदिक नि अवैदिक, उच्च-वर्णीय अन् नीचवर्णीय, प्रबुद्ध नि अप्रबुद्ध सारेच जण 'प्रपंचाचीं वळणें, मत्सराचे वळसे, मदत्रयाच्या उकळ्या' घेत घेत अगतिकतेनें जीवन कंठीत आहेत; ( उतारा १३ ) हें दृश्य पाहून ज्ञानेशांचें अन्तःकरण द्रवलें. म्हणूनच अध्यात्मग्रंथाच्या चिंतनांतून आणि आत्मतत्त्वाच्या साक्षात्कारांतून ते ज्या लोकोत्तर सिद्धावस्थेला जाऊन पोंचले, तिच्यांतच रंगून न जातां, दलितोद्धाराच्या प्रेरणेनें त्यांनीं धर्मजागृतीचें कार्य हातीं घेतलें व त्यासाठीं आबालसुबोध अशा मराठी भाषेंत ज्ञानेशांनीं ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, अभंग इत्यादि ग्रंथरचना केली.

# यादवकालांतील संस्कृत वाङ्मय

यादवांची राजवट वाङ्मयदृष्ट्याहि मोठी भरभराटीची होऊन गेली. विज्ञानेश्वर, श्रीधर, हेमाद्री प्रभृति पंडित मंडळी वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनासाठीं श्रुतिस्मृतिपुराणोक्त अशा टीकाग्रंथांची निर्मिति करीत होती; तर शार्ङ्गधर, जल्हण, बोपदेवादि विद्वान ज्ञानेशांनीं उल्लेखिलेल्या लौकिक विद्या नि कला या संबंधींच्या वाङ्मयांत भर टाकीत होते. महाराष्ट्रांतील प्रख्यात ज्योतिषी आणि गणितज्ञ भास्कराचार्य यांच्या सिद्धान्तशिरोमणी, करणकुतूहल व लीलावती या विद्वन्मान्य ग्रंथांवर त्या कालीं बऱ्याच टीका लिहिल्या गेल्या. तसेंच, त्यांचे पुतणे अनंतदेव, विवाहवृंदावनकार केशव, श्रीपतीच्या रत्नमालेचा टीकाकार महादेव, आणि महादेवसारिणी ग्रंथाचा कर्ता महादेव परशुराम यांसारखे प्रसिद्ध ज्योतिषी या काळांतच महाराष्ट्रांत होऊन गेले. ज्योतिषाप्रमाणें वैद्यक आणि व्याकरण यांवरहि तेराव्या शतकांत महाराष्ट्रामध्यें बरेच ग्रंथ झाल्याचें दिसून येतें. एकट्या बोपदेव पंडिताच्या नांवावर अनेक ग्रंथ आढळतात. त्यांपैकीं दहा व्याकरण ग्रंथ व नऊ वैद्यक ग्रंथ आहेत. साहित्यशास्त्रावरील जयदेवाचा 'चंद्रालोक' आणि संगीतशास्त्रासंबंधींचा शार्ङ्गधराचा 'संगीतरत्नाकर' हे ग्रंथहि याच काळांतील होत. अशा रीतीनें ज्योतिष नि गणित, साहित्य नि संगीत आणि व्याकरण नि वैद्यक इत्यादि

---

१. इ. स. १०७०-११०० याज्ञवल्क्य स्मृतीवरील 'मिताक्षरी' टीकेचा कर्ता.

२. इ. स. ११५०-१२५० स्मृत्यर्थसार, भागवत टीका इ. ग्रंथांचा कर्ता.

३. इ. स. १२६०-१२७५ या काळांतील कृष्णदेव व महादेव या यादवांच्या कारकीर्दीतील 'करणाधिप' चतुर्वर्गचिंतामणीचा कर्ता— अनेक कर्ममार्गांचें एकीकरण करणारा ग्रंथ.

४. सूक्तिमुक्तावली ग्रंथाचा कर्ता, कृष्णदेव यादवाचा एक मंत्री.

५. इ. स. १२००-१३०० प्रसन्नराघव नाटकाचा कर्ता.

६. सिंघण यादवाचा कारभारी जो सोढल त्याचा पुत्र. सुमारें इ. स. १२४७.

शास्त्रें-कला यांच्यावर या काळांत संस्कृतमधून[1] कां होईना पण बरीच ग्रंथनिर्मिति झाली.

संस्कृत भाषेंत निर्माण झालेल्या या ग्रंथसंभारानें संस्कृत वाङ्मयाला संपन्न केलें असेल; तसेंच त्या त्या ग्रंथकाराला पंडितांच्या प्रभावळींत जागा मिळून राजदरबारीं त्याचा गौरवहि झाला असेल; पण सामान्यांच्या दृष्टीनें त्याचा काय उपयोग ! संस्कृत न येणाऱ्या असंख्य लोकांच्या दृष्टीनें हें ग्रंथभांडार असून नसल्यासारखेंच होतें. शिवाय कालभेदानुसार त्यांत नवीनपणा कांहींच नसल्यामुळें आणि त्याचा प्रसारहि संस्कृतज्ञ अशा मूठभर लोकांपुरताच मर्यादित असल्यानें तत्कालीन लोकजीवनाला हें वाङ्मय वळण लावूं शकलें नाहीं; संस्कृत भाषेचें हें वैगुण्य लक्षांत घेऊनच जैन, शैव, वैष्णव नि लिंगायत इत्यादि दक्षिणेंतील धर्मपंथांनीं तिकडील तामिळ, तेलगु, कानडी या लोकभाषांचा अंगीकार यापूर्वींच केला होता; आणि त्याद्वारां आपला प्रभावहि लोकांवर पाडला होता. आपलें पंथीय वाङ्मय लोकभाषेंत निर्माण करण्याची जैन लिंगायतांची ही परंपरा महाराष्ट्रांत नाथ, महानुभाव व वारकरी या पंथीयांनीं चालविली. लोकाभिमुख वृत्तीच्या ज्ञानेशांनींहि याच प्रथेला अनुसरून महाराष्ट्राच्या लोकभाषेंत–मराठींतच आपले ग्रंथ लिहिले.

## नाथपंथाचें ग्रंथकर्तृत्व

गुरुपरंपरेनें ज्ञानेश्वर ज्या संप्रदायाचे होते त्या नाथपंथीयांचें मराठी साहित्य आज फारसें उपलब्ध नाहीं. त्यांनीं पदें, अभंग अशी स्फुट रचना मराठीमध्यें पुष्कळच केली असण्याचा संभव आहे; पण ती काळाच्या ओघांत नष्ट झाली असावी. आदिनाथ, मच्छेंद्रनाथ यांची रचना मराठींत कांहीं नाहीं. ( हिंदी किंवा व्रज भाषेंतहि कांहीं नसावी. ) ‘ गोरक्षगीता ’ व ‘ अमरनाथसंवाद ’ हीं दोन ओवीबद्ध प्रकरणें व कांहीं पदें गोरक्षनाथांच्या नांवावर आढळतात. निवृत्तिनाथांचे गुरु गहिनीनाथ यांचे कृष्णभक्तिपर कांहीं अभंग सांपडतात.

---

१. अधिक तपशीलासाठीं–‘ महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण ’–प्र. ३ पाहा,

निवृत्तिनाथांच्या नांवावर 'निवृत्तिदेवी' हा ग्रंथ मोडतो. त्यांचे अभंग मात्र बरेच उपलब्ध आहेत. मराठींतील पहिले ग्रंथकार म्हणून ओळखले जाणारे मुकुंदराज हे नाथपंथीचे होत. ज्ञानेशांच्या पूर्वी शंभर वर्षे ते होऊन गेले असें मानलें जातें. 'विवेकसिंधू आणि परमामृत' असे दोन स्वतंत्र ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. तेव्हां अध्यात्मविषयावर स्वतंत्र ग्रंथ-रचना करणारा मराठींतला आदि ग्रंथकार नाथपंथानेंच महाराष्ट्राला दिला, असें म्हटलें पाहिजे. अमृतानुभवासारख्या स्वतंत्र ग्रंथाच्या लेखनाची प्रेरणा देतांना निवृत्तिनाथांनीं विवेकसिंधूकारांचा दाखला ज्ञानेशांपुढें ठेवला होता; अशी आख्यायिका आहे. शिवाय 'विवेकसिंधू' व 'पर-मामृत' या दोन्ही शब्दांचा उपयोग ज्ञानेश्वरींत केलेला दिसतो. तेव्हां मुकुंदराजांचे हे ग्रंथ ज्ञानेशांनीं पाहिले असावेत; असें म्हटल्यास चुकीचें होणार नाहीं. याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट अशी कीं, ज्ञानेशांच्या रचनेंतील काव्यांगाचा भाग वगळल्यास या साऱ्या नाथपंथीय वाङ्मयाचें वळण ज्ञानेश्वरीसारखेंच आहे. तेव्हां आशय व आविष्कार या दोन्ही बाबतींत नाथपंथीयांनीं जी पाउलवाट घालून दिली, त्या वाटेनें जाऊनच ज्ञानेशांनीं पुढिलांसाठीं ज्ञानेश्वरीच्या रूपानें मोठा थोरला राजमार्ग तयार करून ठेवला; असें म्हणावेसें वाटतें.

## ज्ञानेश्वरीपूर्व महानुभाव वाङ्मय

महानुभावांनीं तर मराठी ही आपली धर्मभाषाच केली. त्या पंथांतील

---

१. ज्ञानेश्वरांचे वडिल बंधु व गुरु. (इ. स. १२६८-१२९७) समाधि-स्थळ त्र्यंबकेश्वर.

२. इ. स. ११२८-१२०० मराठवाड्यांतील कीं नागपूरकडील ? मतभेद.

३. आदिनाथ–हरिनाथ–रघुनाथ–मुकुंदराज अशी यांची परंपरा आहे.

४. ज्ञानदेवांपूर्वी होऊन गेलेल्या चक्रधरानें ( इ. स. ११९४–१२७६ ) या पंथाची स्थापना केली. वारकरी पंथाप्रमाणेंच हा भक्तिमार्गी पंथ आहे, पण यशस्वी झाला नाहीं.

ग्रंथकार चांगले संस्कृतज्ञ पंडित होते. पण मराठींत रचना करण्यावरच त्यांचा भर होता. नागदेवाचार्यांनीं केशवराजसूरीला मराठींतच रचना करण्याबद्दल जें कटाक्षानें बजाविलें, त्यावरून लोकांच्या बोधभाषेला ग्रांथिक भाषेचा दर्जा प्राप्त होण्याला महानुभावांचे प्रयत्नच कारणीभूत झाले, ही गोष्ट सिद्ध होते. महानुभाव पंडितांच्या विविध प्रकारच्या ग्रंथ-रचनेमुळेंच मराठी भाषेचा कस नि दर्जा वाढला यांत बिलकुल शंका नाहीं. महिमभट्टाचे 'लीळाचरित्रादि' गद्यांतील चरित्रग्रंथ, केशवराजा-सूरीचा गद्य ' सूत्रपाठ ' व पद्यात्मक ' मूर्तिप्रकाश,' भावे देवव्यासाचा गुरुभक्तीनें ओथंबलेला ' पूजावसर, ' हयग्रीवव्यासाचें श्लोकबद्ध ' गज-राजस्तोत्र, ' महदंबेचे भावपूर्ण ' धवळे, ' दामोदर पंडिताचें भक्तिरसपूर्ण 'वत्सहरण' आणि नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवरा' ( इ. स. १२९२) सारखा अभिजात काव्यग्रंथ यांसारख्या अव्वल दर्जाच्या महानुभावीय वाङ्मयानें ज्ञानेश्वरीच्या रचनाकालींच मराठी भाषेला संपन्न केलें होतें. वारसाहक्कानें लाभलेली ही भाषिक संपत्ति ज्ञानेशांनीं आपल्या प्रतिभाबळानें कल्पनातीत वाढविली. आरंभींच्या महानुभाव ग्रंथकारांनीं मराठी भाषेच्या सौंदर्याची व सामर्थ्याची नुसती ओझरती ओळख करून दिली; पण त्या दुहेरी वैभ-वाचा पुरेपूर प्रत्यय ज्ञानेश्वरी ग्रंथानेंच लोकांना आणून दिला.

## तेराव्या शतकांतील लौकिक वाङ्मय

आध्यात्मिक विषयासंबंधींच्या पंथीय वाङ्मयामुळें ज्याप्रमाणें गंभीर विषयांच्या आविष्काराला आवश्यक असलेली प्रौढी व प्रगल्भता मराठी भाषेला प्राप्त झाली, त्याप्रमाणें त्या काळच्या मराठी बोलींत निर्माण होत असलेल्या ललित स्वरूपाच्या नवरसात्मक वाङ्मयाकडूनच ( ज्ञानेशांच्या वाणींत दिसून येणारी ) रसवत्ता व काव्यात्मकता मराठी भाषेंत उतरली असावी, असें वाटतें. तें अलिखित स्वरूपांतील वाङ्मय आज आपणांला अनुपलब्ध आहे इतकेंच. बाकी जीवनानुभवांतील विविध प्रसंगांनीं व शृंगार, वीर, करुण, हास्य आदि लौकिक रसांनीं परिपुष्ट झालेलें काव्य-

---

२. ग्रंथरचना संस्कृतमध्यें नको असें सांगतांना नागदेवाचार्यांनीं म्हटलें कीं, 'नको गा केशवदेया, येणें माझिये स्वामींचा सामान्य परिवारु नागवैल कीं गा'.

नाटकादि ललित वाङ्मय त्या काळांत बरेंच झालें असलें पाहिजे, असें ज्ञानेश्वरींतील काव्य, नाटकें, नट, नर्तक व शृंगारादि रस इत्यादि उल्लेखावरून म्हणतां येतें. वाक्प्रचार, वाक्संप्रदाय, संकेत, म्हणी, दृष्टांत इत्यादि भाषेचीं अंगोपांगें अशाच लौकिक स्वरूपाच्या वाङ्मयाकडून परिपुष्ट केलीं जातात. ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषा याहि अंगांनीं चांगली पुष्ट झाली होती, हें ज्ञानेश्वरीच्या लालित्यपूर्ण भाषासरणीवरून स्पष्ट होतें. मराठीपूर्व अपभ्रंश भाषेंतील ललितसंपन्न वाङ्मयाची साक्षहि याच अनुमानाला बळकटी आणते. कारण ओवी, अभंग, आरती ह्या लोकप्रिय मराठी छंदांचें मूळ अपभ्रंशांतील मात्रावृत्तांत जसें आढळतें, त्याप्रमाणें ज्ञानेश्वरींतील ललित भाषापद्धतीचें मूळहि तत्कालीन लौकिक वाङ्मयामध्यें ( पर्यायानें अपभ्रंशाच्या ललित वाङ्मयांत ) आढळूं शकेल; हें अनुमान सहज सुचूं शकतें. तें पटायला कांहीं अडचण पडूं नये. अर्थात् अपभ्रंश भाषेचें वाङ्मय आणि जुनी मराठी यांतील संबंधाबद्दल अधिक संशोधन होण्याची आवश्यकता आहेच.

## ज्ञानेश्वरांची ग्रंथरचना

एकीकडे नाथ-महानुभावांचें पंथीय वाङ्मय व दुसरीकडे ललित स्वरूपाचें लौकिक वाङ्मय निर्माण होत असतांनाच ज्ञानेशांच्या ज्ञानेश्वरीचा जन्म झाला. रजनीला शोभायमान करणाऱ्या असंख्य तारका लुकलुकत असतांनाच चंद्राचें पदार्पण व्हावें, आणि त्याच्या मधुर नि शीतल तेजानें सारें आकाश उजळून निघावें; तसाच प्रकार ज्ञानेश्वरीच्या आगमनानें मराठी वाङ्मयाच्या प्रांगणांत घडून आला. ज्ञानेशांच्या स्निग्धमधुर नि तेजस्वी अमृतवाणीनें पूर्वकालीन व समकालीन वाङ्मयाला मागें टाकून मराठीच्या दरबारांत ज्ञानेश्वरीलाच अग्रपूजेचा मान मिळवून दिला. एवढेंच नव्हे तर, मराठी वाङ्मयाच्या प्रारंभ कालांतच ज्ञानेश्वरीच्या रूपानें मराठी कवींपुढें साहित्याचा एक भव्य आदर्श निर्माण करून आजवर उपेक्षिल्या जाणाऱ्या मायभाषेचा—मराठीचा माथा तिनें उन्नत केला. पण आविष्काराच्या दृष्टीनें ज्ञानेश्वरी, अमृतानुभव हे थोर दर्जाचे साहित्य-ग्रंथ असले तरी आशयाच्या दृष्टीनें ते तत्त्वज्ञानाचेच ग्रंथ ठरतील आणि परिणा-

माच्या दृष्टीनें तर वैयक्तिक आणि सामाजिक नीतीचा आदर्श घालून देणारे बोधग्रंथ असेंच त्यांचें वर्णन करावें लागेल. क्रांतिदर्शी तत्त्वज्ञ, प्रतिभासंपन्न साहित्यिक व प्रभावी नीतिशिक्षक या तिन्ही भूमिका ज्ञानेशांच्या ठिकाणीं एकवटल्या आहेत. म्हणून केवळ साहित्य-निर्मितीपेक्षांहि ज्ञानेशांची सामाजिक कामगिरी फार मोठी आहे. अशा थोर व्यक्तीकडून ज्ञानेश्वरी-अमृतानुभवादि ग्रंथांची निर्मिति झाल्यामुळें महाराष्ट्र संस्कृतीची मुहूर्तमेढ रोवण्याचें महत्कार्य त्या साहित्यानें केलें, ही गोष्ट लक्षांत ठेवूनच आपण त्या ग्रंथांचा तशा दृष्टीनें परिचय करून घेतला पाहिजे.

## ज्ञानेश्वरी

ज्ञानेशादि भावंडें पैठण सोडून गांवोगांवीं गीताभागवतादि अध्यात्मग्रंथांवरील प्रवचनें व कीर्तनें करीत आळंदीला परत येत असतां वाटेंत नेवाशाच्या मुक्कामांत ग्रंथनिर्मितीची प्रेरणा ज्ञानेश्वरांना झाली. कीर्तन-प्रवचनांतून जो नवा धर्मविचार ते लोकांपुढें ठेवीत होते, त्या विचाराला निश्चित स्वरूप या सुमारास प्राप्त झालें असावें; म्हणूनच लिखित स्वरूपांत तो ग्रथित करण्याची आवश्यकता त्यांना भासली. तरीदेखील पहिल्याप्रथम लोकसंमत अशा गीता ग्रंथाच्या आधारानेंच त्यांनीं आपला विचार लोकांपुढें ठेवला. " आपण हें धाष्टर्य करतों आहोंत, पण गुरुकृपेच्या आणि उदार नि प्रेमळ अशा श्रोत्यांच्या क्षमाशील वृत्तीच्या बळावर हें धर्मसंकीर्तन आपल्याकडून चांगल्या प्रकारें पार पडेल " असा भाव ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं व्यक्त झालेला दिसून येतो. ज्ञानेश्वरींतील काव्यांगाचा विचार करतांना कवीच्या या भूमिकेचाहि विचार अवश्य करण्यासारखा आहे. तसेंच ज्ञानेशांचें तत्त्वज्ञान आणि त्यांचा नीतिबोध समजून घेतांना गीतेसारख्या समन्वयवादी ग्रंथाची निवड ज्ञानेशांनीं कां केली या प्रश्नाकडेहि आवर्जून लक्ष दिलें पाहिजे. मात्र टीकाग्रंथ लिहिण्याचें बंधन पत्करल्यामुळें गीतेच्या पावलावर पाऊल ठेवूनच तो तो विषय आणि तो तो विचार ज्ञानेशांना विशद करावा लागला आहे. आत्म्याचें अमरत्व व व्यापकत्व सांगणारा उपनिषदांतील अध्यात्मविचार आणि सृष्टीच्या विविधत्वाचा उलगडा करणारा सांख्यशास्त्राचा प्रकृति-पुरुष विचार, विश्वांतील नामरूपात्मक विविधतेचा परिहार करून निराकार,

निर्गुण ब्रह्माची ओळख करून देणारा मायावादी वेदांत, आणि ईश्वराच्या सगुण निर्गुण रूपांची योग्य व्यवस्था लावणारा ज्ञानोत्तर भक्तीचा सिद्धांत; तसेंच चित्तशुद्धीला उपकारक ठरणारा पण खडतर असा पातंजल योग आणि बाह्य शुद्धीला कारक होणारा वर्णाश्रमधर्मानुसारी कर्मयोग; आत्म्याला बंधनकारक होणारा हा त्रिगुणात्मक संसार आणि त्यांतून मुक्त करणारा ज्ञानकर्मभक्ति यांच्या समन्वयांतून निर्माण होणारा नीतिविचार; हे सारे विषय गीतेच्या अनुषंगानें ज्ञानेश्वरांकडून ज्ञानेश्वरीमध्यें ( अ. १८–ओंव्या ९०३२ ) साकल्यानें व समरसतेनें मांडले गेले आहेत. वर्ण्यविषयाशीं पूर्णतया समरस होऊन त्याचें रहस्य विशद करणें हें टीकाकाराचें वैशिष्ट्य या ठिकाणीं पुरेपूर प्रत्ययास येतें. केवळ व्याकरणदृष्ट्या शब्दच्छल करून वाक्याचा अन्वयार्थ सांगणारें शब्दपांडित्य ज्ञानेश्वरींत दिसणार नाहीं. श्रीकृष्णाचें मनोगत हलक्या हातानें उकलून दाखविणारी ज्ञानेशांची ज्ञानेश्वरी म्हणजे रहस्योद्ग्राही पद्धतीच्या भावटीकेचा एक उत्कृष्ट आदर्शच ठरेल. म्हणूनच वामनाच्या यथार्थदीपिकेच्या तुलनेनें हिला ‘ भावार्थदीपिका ’ हें सार्थ नांव पुढें प्राप्त झालें असावें. ज्ञानेशांच्या या भावार्थ दृष्टीमुळेंच ज्ञानेश्वरीमध्यें ठिक-ठिकाणीं रसकल्लोळाचे प्रसंग निर्माण होऊन तिला काव्यत्व प्राप्त झालें आहे. ज्ञानेश्वरींतील तत्त्वज्ञान आणि काव्य हे विचाराचे स्वतंत्रच विषय होत. मात्र एवढें खरें कीं, आध्यात्मिक विषयाचें एवढें काव्यपूर्ण निरसोत्कट विवेचन दुसऱ्या कुठल्याहि भाषेंत आढळणार नाहीं. मौलिक स्वरूपाचें तत्त्वज्ञान आणि अव्वल दर्जाचें काव्य या दोहोंचा मनोहर संगम या दृष्टीनें ‘ ज्ञानदेवी ’ हा ग्रंथ त्या काळच्या सर्व भाषांत तर लोकोत्तरच म्हणावा लागेल.

## अमृतानुभव

मुकुंदराजांप्रमाणें स्वतंत्र ग्रंथनिर्मितीचा आदेश निवृत्तिनाथांकडून मिळतांच ज्ञानेश्वरीनंतर ज्ञानेशांनीं ‘ अमृतानुभव ’ ( प्रकरणें १०, ओंव्या ८०४ ) हा स्वतंत्र ग्रंथ लिहिला. या ग्रंथावर विचारदृष्ट्या योगवासिष्ठाची

छाप विशेष दिसून येते. योगवासिष्ठांतील ' अनुभवामृत ' या शब्दावरून या ग्रंथाचें नांव[1] ज्ञानेशांना सुचलें असावें, असा एक तर्क आहे. ज्ञानेशांचें स्वतंत्र तत्त्वज्ञान शुद्ध स्वरूपांत याच ग्रंथांत प्रकट झालें आहे. ज्ञानेशांच्या काव्यमय भाषाशैलीचे विशेष याहि ग्रंथांत आढळत असले तरी ज्ञानेश्वरीच्या मानानें रसकल्लोळाचे व कल्पनाविलासाचे प्रसंग यामध्यें कमी आहेत. अत्युच्च तत्त्वज्ञान केवळ दृष्टांतांच्या मदतीनें कसें मांडावें याचा आदर्श म्हणून अमृतानुभवाकडे बोट दाखवितां येईल. ' एवं दशोपनिषदें । पुढारां न ढाळती पदें ' अशा आत्मविश्वासानें ज्ञानेशांनीं आपला चिद्विलासवादाचा दृष्टिकोन यामध्यें मांडला आहे. त्या दृष्टीनें सातवें 'अज्ञानखंडन' हें प्रकरण महत्त्वाचें आहे. त्यामध्यें पूर्वापार चालत आलेल्या शांकरवेदांतांतील मायेच्या कल्पनेचें ज्ञानेशांनीं समर्पकपणें खंडन केलें असून जीव, जगत्, परमात्मा सर्व कांहीं एकच आहे. ' जग असकी वस्तुप्रभा ।। (प्र. ७-२८९)'हा आपला पूर्णाद्वैताचा सिद्धान्त येथें मांडला आहे. ज्ञान्याच्या भूमिकेवरून या ग्रंथांत निकराच्या अद्वैतानुभवाचें वर्णन केलें आहे, म्हणून हा 'सिद्धानुवाद' आहे असें म्हटलें जातें. पण त्यापेक्षां जी वस्तु सिद्धच आहे, प्रकटच आहे अशा आत्मतत्त्वाचें दर्शन ज्ञानेश्वरांसारखा अनुभूतिवादी संत या ग्रंथांत आपणाला करून देत आहे, असें म्हणणें ज्ञानेशांच्या तत्त्वबोधाशीं अधिक सुसंगत ठरेल.

अविद्या खंडनावरून ज्ञानेश्वर ' माया ' मानीत नाहींत असें दिसतें, मग मूलतत्त्व आणि जगत् यांचा संबंध ते कसा लावतात ? हें पहावयाचें झाल्यास अमृतानुभवाचें ' शिवशक्ति समावेशन ' हें पहिलें प्रकरण पहावें. शिवशक्तींचें एकरूपत्व राहून त्यांमध्यें जो विलास चालतो, जी क्रीडा चालते, ती क्रीडा म्हणजे हें जगत् अशी त्यांची श्रद्धा आहे. निरनिराळ्या भूमिकेनें अद्वैताचा सिद्धांत ठसविण्याचा प्रयत्न प्रत्येक प्रकरणांत ज्ञानेशांनीं केला आहे. या दृष्टीनें सद्‌गुरुस्तवन ( प्र. २ ) व सच्चिदानंदपदत्रय–निरूपण ( प्र. ५ ) हीं दोन प्रकरणें उल्लेखनीय आहेत. अद्वैताचा अनुभव घेणाऱ्या सिद्ध पुरुषाच्या मनोभूमिकेचें उत्कृष्ट वर्णन या ग्रंथांतील 'सिद्धरहणी–कथन'

---

१. अनारतगलद्रूपं नित्यं च अनुभवामृतम् ॥ ( योग. ६–१०–७१ )

( प्र. ९ ) या प्रकरणांत पहायला सांपडतें. ग्रंथ लिहितांना लेखकाची भूमिकाहि कशी अद्वैतनिष्ठ आहे हें पुढील ओवीवरून स्पष्ट होतें. ज्ञानेश्वर सांगतात—' आम्ही बोलिलों जें काई । तें प्रकटाचि असें ठायीं । मा स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावें बोले ।। १०–८ ।। तर मग हा ग्रंथलेखनाचा खटाटोप कशाला ? याला ज्ञानेश्वरांचें उत्तर असें ' पढियंतें सदा तेंचि । परी भोगीं नवी रुची । म्हणोनि हा उचितुचि । अनुवाद सिद्धु ।। १०–१३ ।। एवढें समर्थन करूनच ते थांबले नाहींत तर ग्रंथाच्या प्रभावाबद्दल आत्मविश्वासानें ते म्हणतात—' अनुभवामृत निखळ । परी अमृताही उठी लाळ । अमृतें येणें ।। १०–२० ।। आपल्या वाणीच्या प्रभावाबद्दलचा केवढा जबरदस्त आत्मविश्वास हा ! एवढा आत्मप्रत्यय असलेला ग्रंथकार मराठी भाषेला लाभला, हें त्या भाषेचें महद्‌भाग्यच म्हणावयाचें.

' शुद्ध रसायनाच्या स्वरूपा'चा असा हा तात्त्विक ग्रंथ असल्यानें सामान्यांपेक्षां विद्वानांनाच हा अधिक प्रिय झालेला दिसतो. यावर अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत, त्यामध्यें शिवकल्याणांची[२] ' नित्यानंदैक्य दीपिका ' ही टीका ज्ञानेशांचें हृद्गत उकलून दाखविणारी म्हणून विशेष प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचें संस्कृतांतहि[३] समश्लोकी भाषांतर झालें आहे तसेंच अनेकांनीं या ग्रंथाचें सटीक संपादन केलें आहे.

## चांगदेवपासष्टी

चांगदेवपासष्टी हें ६५ ओव्यांचें लहानसें प्रकरण प्रासंगिक असलें तरी तत्त्वज्ञानपरच आहे. अमृतानुभवांतील तात्त्विक विचारच अधिक सूत्रबद्धपणें येथें मांडले आहेत. त्यामुळें अमृतानुभवाचें सार या दृष्टीनें या प्रकरणाची योग्यता फार मोठी आहे.

---

२. मुक्ताबाईकडून चालत आलेल्या नाथपरंपरेंतील चौदावे पुरुष. यांचा काल इ.स. १५६८-१६३८. यांनीं इ. स. १६३५ त अमृतानुभवावर टीका लिहिली.

३. प्रल्हाद बडवे यांनीं संस्कृतांत भाषांतर केलें. ( इ. स. १६९८.)

ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाची आणि ग्रंथांची कीर्ति लवकरच सर्वत्र पसरली. ती ऐकून तापी नदीच्या कांठीं राहणाऱ्या चांगदेवासारख्या हटयोग्याला ज्ञानेशांच्या दर्शनाची उत्सुकता लागून राहिली. म्हणून त्यानें ज्ञानेश्वरांना पत्र लिहिण्याचें ठरविलें. पण ' योगबलानें दीर्घायुषी झालेल्या आपण ज्ञानदेवासारख्या कोंवळया पोराला आशीर्वाद लिहावा कीं त्याच्या असामान्य कर्तृत्वाकडे पाहून नमस्कार लिहावा ' याची पंचाईत त्याला पडली. तेव्हां त्यानें कोरा कागदच ज्ञानेशांकडे पाठवून दिला. त्याच्या द्विधा वृत्तीची खूणगांठ पटून ज्ञानेशांची बहिण मुक्ताई हिनें ' दीर्घायुषी झाला खरा पण अखेर ( ज्ञानाच्या बाजूनें ) कोराच राहिला ' असा शेरा मारला. ज्ञानेशांनीं मात्र अद्वैतबोध करून देणारें ६५ ओव्यांचें एक उत्तर पाठविलें, तें म्हणजे हें चांगदेवपासष्टी प्रकरण होय. यामध्यें चिद्विलासाच्या भूमिकेनेंच पूर्णाद्वैताचा बोध केला आहे. यांतहि ज्ञानेशांचे नेहमींचे दृष्टांत आणि भाषेंतील प्रसाद नि माधुर्य हे गुण आहेतच; परंतु काव्यदृष्टीनें या प्रकरणाचें विशेष महत्त्व नाहीं. एका हटयोग्याला एका ज्ञानयोग्यानें धाडलेलें अध्यात्मबोधपर असें पत्र म्हणून याचें महत्त्व विशेष आहे. योगविद्या व आत्मविद्या यांच्या झगड्यांत ज्ञानेशांची आत्मविद्या श्रेष्ठ ठरली; हा या प्रकरणाचा निष्कर्ष ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे.

## पंढरीचा भक्तिपंथ व ज्ञानेशांचें कर्तृत्व

आळंदीचा ब्रह्मवृंद आणि पैठणचे शास्त्रीपंडित ज्ञानेशांपुढें हतप्रभ ठरले आणि या भावंडांना ईश्वराचे अवतार म्हणून मानूं लागले. चांगदेवासारखा हटयोगी गर्वरहित होऊन ज्ञानेशांना शरण आला; मुक्ताईचा शिष्य बनला. नेवाशाला लिहिलेल्या भक्तिप्रधान गीताटीकेचा सर्वत्र बोलबाला होऊं लागला. एवढ्या कर्तृत्वानिशीं ज्ञानेश्वर पंढरीला गेले. तेव्हां विठ्ठलाचा एकांतिक भक्त नामदेव त्यांच्या चरणीं लागला. ज्ञानदेवांच्या सान्निध्यांत नामदेवाच्या मूळच्या भावभक्तीला तत्त्वजिज्ञासेची जोड लाभून त्याच्या सगुणोपासनेला अद्वैताचा डोळसपणा आला. पंढरीच्या साऱ्या संतमंडळालाच ज्ञानेशांनीं ' अद्वैतनिष्ठ कर्मप्रधान भक्तियोगाची ' शिकवण

दिली. तेव्हां साहजिकच गोरोबा, सांवता, चोखाप्रभृति वारकरी पंथीयांनीं 'गुरुमाउली' म्हणून ज्ञानेशांना संतमंडळाची अग्रपूजा अर्पण केली. "पुस्तकी पांडित्यापेक्षां आत्मानुभव श्रेष्ठ आहे. कर्मठांच्या सकाम धर्माचरणापेक्षां निष्काम बुद्धीनें आचरलेला कर्मयोग हीच खरी ईश्वरभक्ति होय. वर्णाश्रमधर्मांतील विषमतेच्या परिपालनापेक्षां सर्वांभूतीं समताभाव हीच खरी नीति असून 'कृष्ण विष्णु हरि गोविंद' या नामघोषांतच सारें आत्मज्ञान अंतर्भूत आहे." असें प्रतिपादन करणारी ज्ञानेश्वरी वारकऱ्यांना अगदीं जवळची वाटली. आपलें हृद्गत बोलून दाखविणारी म्हणून 'माउली' ही थोर पदवी त्यांनीं तिला देऊन टाकली. ज्ञानेशांनींहि आपल्या जीवितकार्याच्या सिद्धीसाठीं नाथपंथीयांची एकाकी धर्मप्रचाराची पद्धति सोडून सामुदायिक स्वरूपानें भक्तीचा आनंद लुटणाऱ्या वारकरी पंथाला हाताशीं धरलें. ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपंत पंढरीचे वारकरी होतेच. पित्याकडून चालत आलेल्या या पंथसंस्कारांशीं आपल्या नाथपंथीय तत्त्वबोधाचा समन्वय ज्ञानेशांनीं घडवून आणला. ते या संतमंडळाच्या अग्रभागीं वावरूं लागतांच वारकरी पंथामध्यें एक प्रकारचें नवचैतन्य खेळूं लागलें. अधिकाधिक संघटित होऊन त्या पंथानें धर्मसुधारणेचें कार्य मोठ्या प्रमाणावर सुरूं केलें. जैन, लिंगायत, महानुभाव हे अवैदिक पंथ वारकरी पंथाच्या प्रभावापुढें निष्प्रभ ठरले. सामान्य लोकांमधील क्षुद्र देवताभक्ति मागें पडली. विठ्ठलभक्तीबरोबर जीवनभक्ति बळावली. वर्णावर्णांतील वैषम्य भावना मावळली. महाराष्ट्राच्या लोकजीवनाला उदार नि व्यापक अशा भागवतधर्माचें सांस्कृतिक अधिष्ठान मिळालें आणि सबंध जीवनाचें स्वरूप फार पालटून गेलें. या कार्यांत ज्ञानेशांच्या अभंगवाणीचा वांटा फार मोठा आहे.

## ज्ञानेश्वरांची अभंगरचना

पंढरीच्या संतमेळ्याशीं संबंध आल्यावर त्यांच्यासाठीं म्हणून ज्ञानेश्वरांनीं आपले अभंग लिहिले असावेत. आपली जीवनदृष्टि, आपला तत्त्वबोध अधिक प्रभावीपणानें लोकांच्या गळीं उतरावा यासाठीं अभंगासारख्या स्फुट नि सर्वसुलभ अशा नामदेवाच्या लेखनतंत्राचा ज्ञानेशांनीं अवलंब

केला. तसेंच तीर्थयात्रा वगैरेंचें महत्त्व ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथामध्यें कमी केलें असतांनाहि नामदेवादि संतांबरोबर ज्ञानेशांनीं लोकसंग्रहाच्या बुद्धीनेंच उत्तरेकडील तीर्थयात्रा केल्या. यावरून त्यांची लोकाभिमुखताच स्पष्ट होते. या तीर्थयात्रेच्या काळांतच ज्ञानेश्वरांनीं आपले बरेचसे अभंग लिहिले असावेत. आज उपलब्ध असलेल्या ज्ञानदेवांच्या गाथेमध्यें ७६५ अभंग आहेत. त्यांमधून ' बापरखुमादेवीवर ' असा ते आपला उल्लेख करतात. ज्ञानेशांचे बरेच अभंग कृष्णलीला वर्णन करणारे आहेत. प्रपंचाच्या भाषेंतून परमार्थ सांगणारे वासुदेव, पाईक, कापडी, अंबुला, अंधळा, कावळा, घोंगडी, यांच्यासंबंधींचे रूपकात्मक अभंग आणि विरहिणीचे अभंग हे त्यांतील उल्लेखनीय असे स्वतंत्र विभाग होत. ईश्वरस्वरूपाचें तात्त्विक विवेचन कांहीं अभंगांत असलें तरी पुष्कळ अभंग अनुभूतिपरच आहेत. पंढरीमाहात्म्य, विठ्ठलमाहात्म्य, नाममाहात्म्य, संतमाहात्म्य या सांप्रदायिक विषयांवरहि ज्ञानेशांनीं अभंग लिहिले आहेत. ईश्वरनिष्ठा, नामस्मरण, सगुणनिर्गुणभक्ति, अद्वैतबोध, सदाचार यांचा उपदेशच या साऱ्यांतून ज्ञानेशांनीं केला आहे. ज्ञानेशांचा नीतिबोध या अभंगवाणींतूनहि चांगला व्यक्त झाला आहे. भागवतधर्माचें खरें रहस्य सांगणारे 'हरिपाठाचे अभंग' म्हणजे वारकऱ्यांची नित्यपाठाची 'संध्या'च म्हणावी लागेल.

पिढ्यान्‌पिढ्या तोंडोतोंडीं वापर होत आल्यानें या अभंगांची भाषा ज्ञानेश्वरीच्या मानानें बरीच अर्वाचीन झाली आहे. या मुद्यावर ज्ञानेश्वरी-कर्ते ज्ञानेश्वर व अभंगकर्ते ज्ञानदेव या दोन भिन्न व्यक्ति असाव्यात असा एक वाद[१] मागें माजला होता. त्यामध्यें इतर मुद्यांची भर घालून आळंदीचे ज्ञानेश्वर व आपेगांवचे ज्ञानदेव या दोन व्यक्ति भिन्न काळांतील आहेत असा सिद्धान्त[२]हि त्या वेळीं मांडण्यांत आला. पण ऐतिहासिक पुराव्यानें तो

---

१. ' ज्ञानदेव व ज्ञानेश्वर '-सुधारक पत्रांतील लेखमाला ( १८९८-९९ ) त्यावर केसरींतील प्रत्युत्तरात्मक लेखमाला (श्री र. भिंगारकर)-१९००.

२. ' ज्ञानेश्वर एक कीं दोन ' ( १९३१ ) भारदे यांचा ग्रंथ व त्याला उत्तर म्हणून भिंगारकरबुवांचें ' ज्ञानेश्वर चरित्र ' पहा.

अद्यापहि सिद्ध झालेला नाहीं. ज्ञानेश्वरांच्या नांवावर दुसऱ्यांचे कांहीं अभंग गाथ्यांत घुसडले गेले असले, तरी विचार, कल्पना व कांहीं विशिष्ट शब्द इत्यादि बाबतींत अभंगांचें ज्ञानेश्वरीशीं असलेलें साम्य इतकें स्पष्ट आहे कीं, भाषेच्या अर्वाचीनपणाच्या आधारावर अभंगांचें ज्ञानेश्वरकर्तृकत्व नाकारतां येणार नाहीं. मात्र उत्तरगीता, प्राकृतगीता, शुकाष्टक, पंचीकरण, मुद्राप्रकाश इत्यादि पंचवीसावर प्रकरणें ज्ञानेश्वरांच्या नांवावर आढळतात. आशय व भाषा या दोन्ही दृष्टीनें पाहतां तीं या ज्ञानेश्वरांची नाहींत ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे.

## समाधि-प्रसंगींचें ‘ नमन ’

तीर्थयात्रेच्या शेवटीं पंढरीहून परतल्यावर सर्व संतमंडळींचा निरोप घेऊन समाधिस्थ व्हावें असें ज्ञानेश्वरांनीं ठरविलें. लोकांना एक नवा जीवनविषयक दृष्टिकोन देण्याचें आपलें जीवितकार्य संपलें. अद्वैतनिष्ठ भक्तिमार्गाचा प्रचार करून वारकरी पंथाचा प्रसार करण्याला नामदेवासारखा आदर्श भक्त योग्य आहे अशा जाणीवेनेंच जणूं कांहीं पुढील कार्य नामदेवांवर सोपवून ज्ञानदेवांनीं समाधि घेतली. या शेवटल्या प्रसंगींहि नमन ( ओव्या १०९ ) या नांवाचें एक लहानसें प्रकरण ज्ञानेशांकडून रचलें गेलें. त्यांत भगवंताची नामरूपी स्तुतीच आहे. सर्व संतमंडळांचें अन्तःकरण हेलावून सोडणारा हा समाधीचा प्रसंग ज्ञानेशांच्या वयाच्या पंचेविसाव्या वर्षी इ. स. १२९६ मध्यें कार्तिक वद्य १३ स आळंदीस घडला. अवघ्या २५ वर्षांच्या अवधींत ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, अभंग अशी मौलिक स्वरूपाची ग्रंथरचना करून महाराष्ट्राच्या संस्कृतीचा पाया भरण्याचें महत्कार्य करणारें एक थोर व्यक्तिमत्व त्या दिवशीं अनंतांत कायमचें विलीन झालें.

---

१. या समाधिकालाबद्दलहि मतभेद आहेत. प्रा. दांडेकरांच्या मतें इ. स. १२९३ ( शके १२१५ ) त हा प्रसंग घडला.

## 'ज्ञानेशांची शास्त्रनिष्ठा व आत्मनिष्ठा

या सर्व ग्रंथांतून व्यक्त झालेली ज्ञानेशांची विचारप्रणाली वैदिक परंपरेला अनुसरूनच आहे. उपनिषदांबद्दल तर विलक्षण आदर ज्ञानेशांच्या ठिकाणीं दिसून येतो. 'नाहीं श्रुतिपरौति माउली जगा ' असा त्यांचा दृढ विश्वास आहे. ज्ञानेश्वर हे आत्मानुभवी संत असले तरी केवळ आंतरिक प्रेरणेलाच प्रमाण मानावें असें ते म्हणत नाहींत. 'शास्त्रानें त्याज्य ठरविलेलें राज्यहि तृणवत् मानावें आणि शास्त्रानें ग्राह्य ठरविलेल्या विषाचाहि स्वीकार करावा ' ( १४–६ ) असें म्हणण्यामध्यें त्यांची शास्त्रप्रामाण्यबुद्धीच स्पष्ट होते. मौजीबंधनाच्या संस्काराची किंवा शुद्धि-पत्राची निवृत्तिनाथांसारख्या योग्याला विशेष मातब्बरी वाटली नाहीं; पण त्यावेळीं 'प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां । पावन अवस्था जरी झाली ।' असा आपला अभिप्राय ज्ञानेश्वरांनीं बोलून दाखविला. त्यावरून शास्त्रसंस्कारांबद्दलची त्यांच्या ठिकाणची उदंड श्रद्धाच दिसून येते. ही श्रद्धा त्यांच्या वाडवडिलांपासून परंपरेनें चालत आली होती. पण आपल्या ग्रंथांतून वारंवार तिचा उच्चार करण्यामध्यें ज्ञानेश्वरांपुढें काल-सापेक्ष असा कांहीं हेतूहि असावा असें वाटतें. अवैदिक पंथियांच्या प्रचारा-मुळें तात्कालीन हिंदु समाजाचा मूलाधार अशा वर्णाश्रमव्यवस्थेवर गंडांतर ओढवूं पहात होतें. या परिस्थितींत हिंदुमात्राच्या ठिकाणची डळमळित झालेली शास्त्रनिष्ठा बळकट करण्याची आवश्यकता ज्ञानेशां-सारख्या विचारवंताला वाटली असणें अगदीं स्वाभाविक आहे. म्हणून तर ' हें उपनिषदांचें सार आहे, हें सर्व शास्त्रांचें माहेर आहे,[१] किंवा गोजिरवाण्या स्वरूपांतील ही श्रुतीच आहे[२] ' अशा शब्दांत ज्ञानेश्वर गीतेची थोरवी गातात. वास्तविक पोथ्यापुस्तकें धुंडाळूनच तत्कालीन शास्त्री पंडितांनीं विठ्ठलपंताच्या कुटुंबाची छळणूक चालविली होती. तेव्हां

---

१. 'जें उपनिषदांचें सार। सर्व शास्त्रांचें माहेर। परमहंसीं सरोवर। सेविजे जें ॥ ( अ. १८–१८०७ ).

२. 'एवं कांडत्रय निरूपणी। श्रुतीचि हे कोडिसवाणी ॥... ( अ. १८–१४५० ).

त्या शास्त्रग्रंथांवर चिडून त्यांची अवहेलना करावीशी वाटणें, सर्वसामान्य मानवी स्वभावाला धरून होतें, पण ज्ञानेशांना तसें वाटलें नाहीं; उलट ' कार्याकार्य विवेकीं । शास्त्रेंच करावीं पारखीं ।। ' हा दंडक त्यांनीं घालून दिला, यांतच त्यांचा थोरपणा आहे.

एवढी शास्त्रांबद्दलची आस्था असूनहि ' वेदांनीं अनेक मार्ग दाखवून दिले आहेत. आपल्याला हिताचा वाटेल तो मार्ग आपण पत्करावा' ( १४–१५ ) असें सांगण्याची स्वतंत्र बुद्धिहि ज्ञानेशांच्या ठिकाणीं होती हें विशेष. ' प्रत्यक्ष शंकरांनीं किंवा श्रीकृष्णांनीं सांगितलें म्हणूनच हें मी मानतों असें नाहीं. त्यांनीं सांगितलें नसतें तरी माझ्या अनुभवाशीं प्रामाणिक राहून मीं हेंच म्हटलें असतें ' असें ज्ञानेशांनीं एके ठिकाणीं[1] म्हटलें आहे. तेथेंहि त्यांची हीच स्वतंत्र वृत्ति प्रगट होते. तत्त्वज्ञानाच्या बाबतींत उपनिषदांतील आत्मसत्तावाद, नाथपंथी अद्वैत, शांकर वेदान्त व काश्मिरी शैवमत यांचे संस्कार ज्ञानेशांच्या बुद्धीवर झालेले दिसतात. परंतु आपल्या बोधाची मांडणी मात्र त्यांनीं अगदीं स्वतंत्रपणें केली आहे, त्यामुळें शास्त्रनिष्ठा व आत्मनिष्ठा या दोहोंचा समन्वय ज्ञानेशांच्या तत्त्वबोधामध्यें दिसून येतो.

## वैदिक तत्त्वज्ञानाची परंपरा

ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य गाभा औपनिषदिक आहे. आपल्याकडील तत्त्वविचाराचा प्रारंभच मुळीं उपनिषदांपासून होतो. जीव, जगत् व परमात्मा यांचें स्वरूप काय, त्यांचा परस्परसंबंध काय याबद्दलचीं अनेक मतें–परस्परविरुद्ध मतेंहि–प्रसंगपरत्वें उपनिषदांमध्यें व्यक्त झालीं आहेत. त्यांची संगति लावण्याचा पहिला प्रयत्न ब्रह्मसूत्रांमध्यें बादरायणांनीं[2] केला. त्यानंतर महाभारतांत व्यास महर्षीनीं साऱ्या औपनिषदिक

१. परि शिवें का श्रीवल्लभें । बोलिलें येणेंचि लोभें ।
मातु तें हे लाभें । न बोलताही ॥ ( अमृ० प्र. ३–१८ )

२. सुमारें खि. पू. ५–६ वें शतक.

विचारांचें मंथन करून विविध विचारांचा व मार्गांचा समन्वय गीतेच्या द्वारां साधला. तेव्हांपासून ज्याला ज्याला तत्त्वज्ञानासंबंधीं लिहावयाचें असेल, त्यानें त्यानें उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व गीता या प्रस्थानत्रयीवर आपल्या दृष्टिकोनानें भाष्यें लिहून आपलें म्हणणें पटवावें अशी प्रथाच पडून गेली. त्या प्रथेप्रमाणें ज्ञानेश्वरपूर्वकालांत शंकर[1], रामानुज[2], निंबार्क[3], मध्व[4] या आचार्यांनीं भाष्यें लिहिलीं; आणि त्यांच्या आधारानें अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैताद्वैत व शुद्धाद्वैत अशा आपापल्या विचारसरणींचें मंडन त्या त्या आचार्यांनीं केलें. तसें करतांना आपल्या पूर्वींच्या मतांचें तार्किक दृष्टया खंडन करून आपलीच तत्त्वप्रणाली औपनिषदिक आहे, असें आग्रहपूर्वक समर्थन त्यांनीं केलें आहे. याच परंपरेला अनुसरून ज्ञानेशांनीं आपल्या तत्त्वबोधाच्या समर्थनार्थ गीता-टीकेचा अवलंब केला असावा. परंतु इतर आचार्यांपेक्षां ज्ञानेशांची भूमिका निराळी असल्यानें त्यांच्या गीता–टीकेचें स्वरूप इतरांच्या भाष्यग्रंथांपेक्षां अगदीं वेगळें झालें आहे.

## टीकाकार ज्ञानेशांची भूमिका

'भाष्यकारातें वाट पुसतु'[6] असें ज्ञानेश्वर म्हणत असले; आणि गीतार्थाच्या बाबतींत बऱ्याच ठिकाणीं त्यांनीं शंकराचार्यांचें अनुसरण केलें असलें किंवा एक दोन ठिकाणीं रामानुजांच्या[7] युक्तिवादाचाहि अवलंब त्यांनीं केला असला; तरी कोणाहि भाष्यकारापेक्षां ज्ञानेशांची टीकेची भूमिका अगदीं भिन्न आहे. सांप्रदायिक थाटाचें किंवा पंडिती वळणाचें त्यांना वावडें आहे असें दिसतें. ते अनुभूतिवादी संत आहेत. ठराविक चाकोरींतले पढिक पंडित नाहींत. भाष्यकारांची दृष्टि शब्द, वाक्य, श्लोक यांचा न्याय, व्याकरण, साहित्य इत्यादि शास्त्रांच्या आधारानें अर्थनिर्णय करून मूळ ग्रंथ आपल्याच विचारसरणीचा आहे असें सिद्ध करण्याकडे असते.

---

१. खिर. पू. ४००. २. इ. स. ७८८-८२०. ३. इ. स. १०१७–११३७.
४. सुमारें इ. स. ११६२. ५. इ. स. ११९७-१२७५

६. २१८ स्थलांपैकीं १४६ स्थळीं शांकरमताचा अनुवाद आहे. (डॉ. पेंडसे)

पण असल्या खटाटोपांत ज्ञानेश्वर पडले नाहींत. ज्ञानेशांची दृष्टि मूळग्रंथांतील आशय समरसतेनें विशद करण्याकडे व त्याच्या अनुरोधानें आपल्या आध्यात्मिक अनुभवाला व्यक्त स्वरूप देण्याकडे आहे. काव्य किंवा भावाविष्कार हें त्यांचें माध्यम असून विवक्षित वातावरण निर्माण करण्यावर त्यांचा भर आहे. अनुमान, युक्तिवाद, कोटिक्रम हीं वादाचीं साधनें (कुठें कुठें त्यांनीं वापरलीं असलीं तरी) त्यांच्या बाबतींत अगदीं गौण ठरतात; कारण खंडनमंडनापेक्षां आत्मानुभवाच्या सहजाविष्काराची मातब्बरी त्यांना अधिक वाटते; म्हणूनच त्यांचे ग्रंथ तार्किक बांधणीचे झाले नाहींत. विचारांची सूक्ष्मता व सखोलता त्यांत आढळली, तरी ती उत्स्फूर्त आहे. त्यांत तर्काचा कर्कशपणा नाहीं कीं फाजील कांटेकोरपणा नाहीं. आपल्या ग्रंथांतून परंपराप्राप्त वैचारिक धनाची अज्ञ समाजाला स्थूल मानानें ओळख करून देणें व त्यांतील ग्राह्य वाटणाऱ्या तत्त्वबोधाचा दृढ संस्कार सामान्यांच्या मनावर घडवून आणणें हाच ज्ञानेशांचा हेतु होता. त्यासाठीं पंडिती भाषा, पंडिती वळण व पंडिती वृत्ति यांचा त्याग करणें त्यांना आवश्यकच होतें. म्हणून महानुभाव पंडितांप्रमाणें भाष्यकारांच्या तर्ककर्कश व विद्वज्जड अशा शैलीचें अनुकरण करण्याच्या भरीस न पडतां ज्ञानेशांनीं व्यासवाल्मिकींच्या पौराणिक शैलीचा अवलंब केला. त्यामुळें ज्ञानेश्वर स्वतः अव्वल दर्जाचे पंडित व क्रांतदर्शी तत्त्वज्ञ असूनहि त्यांचे ग्रंथ पांडिती वळणाचे किंवा केवळ तात्त्विक स्वरूपाचे झाले नाहींत. पण हें त्यांचें वैगुण्य न ठरतां भूषणच ठरेल; कारण ज्ञानेशांच्या ग्रंथांनीं जेवढा तत्त्वबोध असंख्यांपर्यंत नेऊन पोंचविला तेवढा संस्कृत-मराठींतील साऱ्या तात्त्विक ग्रंथांकडूनहि पोंचविला गेला नसेल. बहुजनसमाजाच्या मनाची पकड घेऊन त्याच्या आचारविचारांना अपेक्षित असें वळण हमखासपणें लावण्याचें संस्कारसामर्थ्य ज्ञानेशांच्या ग्रंथांइतकें इतर ग्रंथांच्या ठिकाणीं क्वचितच आढळेल. कोणत्याहि प्रकारची एकांतिकता टाळून

---

१. एवं गुरुकृपें लाधलें । समाधिधन जें आपलें । तें ग्रंथ बांधौनि दिधलें । गोसावी मज ॥ ( अ. १८-१७६३ ).

गीतामाउलीनें दाखविल्याप्रमाणें पूर्वसूरींच्या सर्व विचारांचा व साधनांचा समन्वय करण्याचें क्रांतदर्शित्व ज्ञानेशांनीं दाखविल्यामुळें गतानुगतिक वृत्तीच्या सर्वसामान्य समाजावर ज्ञानेशांच्या गीताटीकेनें आपला प्रभाव पाडला व जीवनाकडे पहाण्याची एक नवी दृष्टि सामान्य माणसाला प्राप्त करून दिली. हेंच ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाचें वैशिष्टय.

## अजातवाद

ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानांतील मुख्य सिद्धांत अद्वैताचाच आहे. सर्वत्र 'एक आत्मतत्त्वच भरून राहिलें आहे; त्याखेरीज दुसरें कांहीं नाहींच.' ही अद्वैतवाद्यांची मुख्य कल्पना. ज्ञानेश्वरांच्या तत्त्वबोधाचें सार 'आत्मा' हेंच आहे. सर्वत्र तोच भरला आहे. पाण्यामध्यें अनेक लाटा निर्माण होतात; त्यांचा जन्म पाण्यांत, त्यांचें रहाणें पाण्यांत, त्यांचें जीवन, त्यांचा आधार, त्यांचें अस्तित्व सारें कांहीं पाणीच, त्याप्रमाणें या चराचर सृष्टीमध्यें माझ्याखेरीज ( म्हणजे आत्मतत्त्वाखेरीज ) दुसरें कांहीं नाहीं. ( १८–१०–११ ) ब्रह्मादिपिपीलिकावरी । मीवांचूनि दुसरी । गोठी नाहीं ।। ( १८–२ ) या दृष्टीनें पाहतां जीव, जगत् व परमात्मा हीं तिन्ही तत्त्वें एकच होत. आत्मतत्त्वा व्यतिरिक्त वेगळें असें जगत् वा जीव कांहीं निर्माणच झालें नाहीं, हा अद्वैताच्या दृष्टीनें अगदीं पराकोटीचा विचार ठरतो. यालाच 'अजातवाद' असें म्हणतात. ज्ञानेशांची मजल कित्येकदां या विचारापर्यंत गेली आहे. अमृतानुभवांतील शेवटला सिद्धांत हाच आहे; असें पुढील ओवीवरून दिसतें. ज्ञानेशांचें आत्मतत्त्व म्हणतें कीं ... 'सैंघ आम्हीच दाटलों । मा लोपलों ना प्रकटलों । कोणा होऊनि ।।' ( अमृ० प्र. १०–१५ ) गीतेच्या १५ व्या अध्यायांतील 'पुरुषोत्तम' रूपाचें वर्णन करतांनाहि ज्ञानेशांच्या प्रतिभेनें ही अजातवादाची शीव गांठली आहे. ( उदा०–तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं केंही न जाये । जैसा रात्री दिवसें नोहे । द्विधा रवि ।। ५५४ ।। )

## चिद्विलासवाद

आत्मतत्त्वाच्या दृष्टीनें जग वगैरे कांहीं झालें नाहीं, ( इये स्फूर्तिकडौनि । नाहीं स्फूर्तिमात्र वाचोनि ।। ) असें म्हटलें तरी आपल्या दृष्टीला

जें नामरूपात्मक जग दिसतें त्याची कांहीं व्यवस्था लावली पाहिजे. ती लावतांनाहि अद्वैताच्या मूळ सिद्धांताला बाध येतां कामा नये; या दृष्टीनें ज्ञानेशांनीं अद्वैताची मांडणी कशा रीतीनें केली आहे, हें पाहूं लागलें कीं, शंकराचार्यांचें अद्वैत व ज्ञानेशांचें अद्वैत यांतील फरक स्पष्ट होतो. सृष्टी-मध्यें जें नानात्व दिसतें त्याचा निरास करण्यासाठीं शंकराचार्यांनीं मायेचा आधार घेतला आहे. त्यांच्या मतानें दोरीवर सर्पाचा किंवा शिंपल्यावर रुप्याचा मिथ्या भास व्हावा, त्याप्रमाणें मूलतत्त्वाच्या ठिकाणीं हा नाना-त्वाचा भास होतो इतकेंच. म्हणून त्यांच्या दृष्टीनें हें दृश्य जगत् मायिक (मायाकार्य) अतएव मिथ्या[1] आहे. सत्य काय तें एक ब्रह्मच होय. अद्वैतसिद्धीच्या या विचारप्रणालीलाच **मायावाद** असें म्हणतात. ज्ञाने-शांनीं गीतेच्या अनुषंगानें कांहीं ठिकाणीं मायावाद मानल्यासारखें दिसतें (उदा०— मायानदीची दुस्तरता अ. ७. व अश्वत्थवृक्षाचें वर्णन अ. १५ पाहा.) पण त्या त्या ठिकाणीं ती ती भूमिका ज्ञानेश्वरांनीं सम-रसतेनें रंगविली आहे, एवढाच त्याचा अर्थ करावा; कारण अशा ठिकाणीं वर्णनपर भागानंतरच्या एखाद दुसऱ्या ओवींतच ज्ञानेश्वर आपली वेगळी भूमिका सांगून टाकतात. ती वेगळी भूमिका म्हणजे **चिद्विलासाची दृष्टि** होय. ही दृष्टि पत्करल्यामुळें जग हें भासरूप अतएव मिथ्या असें ज्ञानेशांना म्हणावें लागलेलें नाहीं. अविद्यमान असलेल्या मायेच्या निराकरणानें अद्वै-ताचें मंडन ते करीत नाहींत. ज्ञानेशांच्या दृष्टीनें मूलतत्त्व व जगत् यांचा संबंध दोरी आणि सर्पाभास यासारखा नसून पाणी आणि तरंग, रत्न आणि त्याची प्रभा, सुवर्ण आणि सुवर्णमणी यासारखा आहे. ह्या दोहोंचें स्वरूप एकात्मच असल्यानें एकाचें निराकरण करून दुसऱ्याचें एकत्व जाणून घ्यावें लागत नाहीं, त्याप्रमाणें जगाला (मायाकार्य म्हणून) बाजूला सारूनें[2] मूळ रूपाला जाणून घ्यायची जरूरी नाहीं. नानाविधत्वावर मायिकतेचा आरोप करून तिचा निरास करणें ही अद्वैताच्या सिद्धीची

---

१. ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या । जीवो ब्रह्मैव नापरः ॥.

२. जग परौतें । सारून पाहिजे मातें । तैसें नव्हे उखितें । आघवें मीचि ॥ ज्ञाने० (१४-१२७).

व्यतिरेक पद्धति होय. पण नानात्व म्हणजे त्या चिद्वस्तूची एक क्रीडाच आहे; असें समजून जगतालाहि परमात्मस्वरूपच लेखणें हा अद्वैताचा अन्वयात्मक विचार होय. 'मायावादी व चिद्विलासवादी या दोन्ही दृष्टिकोनांत केवळ मांडणीचा फरक आहे, मूळांत कांहीं फरक नाहीं'; असें कांहीं म्हणतात. पण मूळ भूमिकेंत फरक असल्याखेरीज भिन्न रीतीनें मांडणी होणारच नाहीं. तेव्हां ज्ञानदेव हे शांकरमताचे केवळ अनुवादक नाहींत किंवा ज्ञानेश्वरी ही शांकरभाष्याचें रसात्मक भाषांतर नाहीं; हें लक्षांत घेऊन स्वतंत्र दृष्टिकोनाचें श्रेय ज्ञानेशांना देण्याबाबत कुचराई होऊं नये.

## मूलतत्त्वाचें स्वरूप ' निखळ ज्ञान '

जगाला मिथ्या ठरविल्यानें मायावाद्यांकडून नामरूपात्मक सृष्टीला व तिच्यांतील व्यवहाराला गौणत्व दिलें जाई. पण ' ब्रह्मच जग आहे ' असें म्हटल्यामुळें तें गौणत्व नाहींसें होऊन, उलट आत्मतत्त्वाची पदवी जगाला प्राप्त होते. असें असलें तरी आधुनिक जडवाद्यांप्रमाणें या नामरूपात्मक जगाचें वस्तुगत सत्यत्व ज्ञानेश्वर मानीत नाहींत. जगतास शाश्वत व अंतिम सत्यत्व देणारे ते भौतिकवादी नाहींत. मायाकार्य या दृष्टीनें जगाला ते मिथ्या ठरवीत नसलें तरी जगताचें क्षणभंगुरत्व ते मांडतातच. पण चंचलत्व म्हणजे मृगजलवत् भास असें न मानतां नित्य नवीनत्व असा ते त्याचा अर्थ करतात. मूलतत्त्वच नित्य नवीं रूपें धारण करतें; म्हणून वारंवार पालटणारें जग ही त्याची क्रीडा[१] म्हणावयाची. मात्र देहागणिक असंख्य आत्मे मानायला ते तयार नाहींत. देहालाच आत्मा मानून हवें तसें वर्तन करणाऱ्यांना ज्ञानेशांनीं आसुरी संपत्तीचें ठरविलें आहे. ( उतारा ११ पाहा ) देहाच्या आश्रयानें आत्मा राहतो असें वाटलें, तरी तो देह नव्हे. तसेंच तो कर्ता असा दिसला तरी कर्में करणारीं इंद्रियें म्हणजे आत्मा नव्हे, तो त्यावेगळा आहे. हें पटवून देण्यासाठीं ज्ञानेशांनीं गीतेच्या अनुषंगानें ज्ञानेश्वरीमध्यें सांख्य तत्त्व-

१. पाणी कल्लोळाचेनि मिसें । आपणपें वेल्हावें जैसें । वस्तु वस्तुत्वें खेळों ये तैसें । सुखें लाहे ॥ ( अमृ. प्र. ७–१३५ ).

ज्ञानाच्या कल्पनेप्रमाणें प्रकृतीपासून विश्वोत्पत्ति कशी होते याचें सविस्तर वर्णन केलें आहे. ( उतारा १३–१ वरील टीप पान ४०–४१ पाहा ) त्या प्रकृतीच्या पसाऱ्यापासून पुरुष जसा वेगळा असतो, त्याप्रमाणें आत्मतत्त्व हें सगळ्या जगरहाटीपासून अलिप्त असतें असें ते सांगतात. जगांतला सारा व्यवहार त्रिगुणात्मक प्रकृति करते. त्या गुणांच्या बुडाशीं असणारें आत्मतत्त्व हें केवळ साक्षीभूत असतें. ( १६–१७–१९ ) हा विचार वसंतऋतु नि सूर्य यांचे दृष्टांत देऊन ज्ञानेशांनीं स्पष्ट केला आहे. ( १६–२०–२२ ) हें आत्मतत्त्व असें गुणातीत—त्रिगुणांच्या पलीकडचें-आहे. कुठल्याहि प्रकारच्या व्यवहारानें त्याची ही अवस्था भंग पावत नाहीं. हें जाणणें म्हणजेच मुक्त होणें होय, असें ज्ञानेश्वर सांगतात. 'अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ' ( १५–४७ ) असें म्हणण्यांतहि ' ज्ञानान्मोक्षः ' हीच त्यांची श्रद्धा स्पष्ट होते.

हें आत्मतत्त्व जाणून घेतां येतें म्हणजे तें शून्य नव्हे. शून्यवादी बौद्धांच्या मताचें खंडन अमृतानुभवांत ज्ञानेश्वरांनीं केलें आहे. ' तया आत्मयाचिया भाखा । न पडेचि दुसरी रेखा' असें पराकोटीचें अद्वयत्व सांगत असतांहि "जरी विश्वा अशेखा । भरला आहे' या शब्दांनीं त्याचें संपन्नत्वहि ज्ञानेश्वर वर्णन करतात. त्यामुळें परब्रह्म म्हणजे कांहीं शून्यस्वरूप पोकळी ठरत नाहीं, तर सर्व विश्वाला व्यापून राहणारी चिच्छक्ति असें त्याचें वर्णन करावें लागतें. ज्ञानेशांचें मूलतत्त्व असेंच चिद्रूप, ज्ञानरूप आहे. या मूलज्ञानांतूनच ' ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय ' अशी त्रिपुटी निर्माण होते. या त्रिपुटीची जाणीव म्हणजे विश्वाचें भान होय. पण ही त्रिपुटी एकरूपच आहे; हें ज्ञान म्हणजेच पूर्णाद्वैताची जाणीव होय. हें मूलज्ञान व त्याची जाणीव यांचा विलासच देवोदेवीच्या क्रीडारूपानें अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणांत ज्ञानेशांनीं वर्णिला आहे. ज्ञानेशांची देवोदेवी ही सांख्यांच्या प्रकृति-पुरुषापासून भिन्न आहे. तसेंच त्यांची शिवशक्तीची ही जोडी वेदांत्यांच्या ब्रह्म-माया जोडीहून वेगळी आहे. त्यामुळें ज्ञानेश्वरींत प्रकृतीच्या पसाऱ्याचें किंवा मायेच्या विलासाचें जें वर्णन ज्ञानेशांनीं सविस्तरपणें केलेलें दिसतें तें गीतेचा आशय समरसतेनें विशद करण्यासाठींच होय. त्या वर्णनांतील कल्पनांशीं ज्ञानेश्वर पूर्णपणें सहमत नाहींत, असेंच म्हटलें पाहिजे.

# पूर्णाद्वैत

सांख्य हें दर्शन तत्त्वत: द्वैतवादी आहे. त्याच्याशीं ज्ञानेश्वर पूर्णांशानें सहमत होणें शक्यच नाहीं. वेदान्त्यांच्या माया कल्पनेचा ज्ञानेश्वरींत अवलंब केला असला तरी अमृतानुभवांतील सातव्या प्रकरणांत त्यांनीं स्पष्ट खंडन केलें आहे. ज्ञानरूप अशा मूलतत्त्वाच्या ठिकाणीं अज्ञानरूप किंवा अविद्यारूप माया संभवेल कशी ? असा त्यांचा मुख्य आक्षेप आहे. शंकराचार्यांप्रमाणें व्यावहारिक सत्ता, पारमार्थिक सत्ता-अशा वेगळ्या मानून विचारांतहि द्वैताचा शिरकाव होऊं देण्याला ज्ञानेश्वरांची तयारी नाहीं. मायेच्या आश्रयाखेरीज चिद्विलासाच्या आश्रयानें ते सृष्टींतील नामरूपात्मक नानाविधत्वाची व्यवस्था लावितात. 'एकाकी न रमते, सद्वितीयमैच्छत्[1]' ह्या औपनिषदिक कल्पनेंतूनच 'अद्वय असें ज्ञानतत्त्व द्वैत दशेच्या प्रांगणांत जाणिवेच्या रूपानें प्रकट होते,[2]' अशी कल्पना ज्ञानेश्वर मांडतात. त्यामुळें पाण्यावर कितीहि तरंग किंवा कल्लोळ उसळले तरी त्याचा एकपणा जसा मोडत नाहीं; उलट असंख्य तरंगांनीं एकत्वाचीच प्रचीति अधिकाधिक येते, तसेंच विविध नामरूपांच्या जाणिवेनें एकाच मूलतत्त्वाची ओळख दृढ होत जाते; असा त्यांचा सिद्धान्त आहे.[3] यालाच पूर्णाद्वैत म्हणावयाचें. ही पूर्णाद्वैताची जाणीव होणें म्हणजेच आत्मज्ञान होणें होय. ह्या आत्मज्ञानाची महति ज्ञानेश्वरींत ज्ञानेशांनीं ठिकठिकाणीं गायिली आहे. पण जाणणें हीच कांहीं ज्ञानेशांच्या दृष्टीनें शेवटची पायरी नाहीं. कारण आत्मज्ञानानें अज्ञान जाऊन सोऽहं असा जो बोध होतो; त्या वेळींहि कांहींशी द्वैताची कोर शिल्लक राहतेच. 'मी आणि तें एकच आहोंत' या जाणिवेच्या प्रक्रियेंतहि द्वैत आहेच. पण ज्ञानेशांचें मूलतत्त्व

---

१. बृहदारण्यकोपनिषद् —( १-४-३ ).

२ द्वैत दशेचें आंगण। अद्वैत वोळगे आपण। भेद तंव तंव दूण। अभेदासी॥
( अमृ. प्र.- ९-२८ ).

३. अहो ऐक्याचें मुदल न ढळे। आणि साजिरेपणाचा लाभ मिळे। तरी स्वतरंगाचीं मुकुळें। तुरंबू कां पाणी॥ ( अमृ० प्र. १-५९ )

' ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गाळीव जें ॥' ( अ. १५–७७ ) अशा स्वरूपाचें आहे. ज्ञाता व ज्ञेय हा भेदहि तिथें शिल्लक राहात नाहीं. ज्ञानाच्या खड्गानें भवरूप अशा अश्वत्थ वृक्षाचें उत्पाटन करतां येतें. ( १५–४७ ) गीता ही स्वतंत्रपणानें मोक्ष देण्याला समर्थ असलेलें ' ज्ञानप्रधान शास्त्र[1] ' आहे. तसेंच ' सप्रपंच अज्ञान नाहींसें होऊन मी एकटाच तुला दिसेन अशा प्रकारचें ज्ञान नाना प्रकारांनीं या गीतेच्या द्वारां मी तुला उपदेशिलें आहे. त्या योगानें धर्माधर्माच्या अज्ञान-जन्य कल्पना तुला टाकतां येतील. ' ( २१-१-२ ) अशा तऱ्हेचीं वाक्यें ज्ञानेशांनीं श्रीकृष्णाच्या तोंडीं योजिलीं आहेत. पण हें ज्ञानदेखील बंधनकारक आहे. त्याचाहि निरास झाला पाहिजे अशी ज्ञानेशांची भूमिका आहे. ज्ञानेश्वर नुसतेच ज्ञानयोगी नाहींत तर ते आत्मसाक्षात्कारवादी आहेत. म्हणून स्वस्व-रूप ज्ञानाच्याहि पुढची स्वस्वरूपानुभवाची पायरी ते मानतात. ज्ञानेशांच्या दृष्टीनें केवळ आत्मज्ञानच नव्हे, तर उत्स्फूर्त असा आत्मानुभव हेंच मनुष्यमात्राचें अंतिम ध्येय होय. म्हणून " अहं ब्रह्मास्मि वृत्तिरूप ज्ञानानें अज्ञान नाहींसें केल्यावर तें ज्ञान आत्मसाक्षात्कार देऊन आपण नाहींसें होतें आणि तिथें मग ' मी ब्रह्म ' या वृत्तिज्ञानावांचूनचें जें निखळ ज्ञान तें तेवढें उरतें[2] " असें ज्ञानेश्वर प्रतिपादतात. अनुभवाच्या बाजूनें हेंच सांगतांना ज्ञानेश्वर लिहितात कीं, 'माझ्याखेरीज दुसरें कांहीं वेगळें नाहीं. तें आत्मतत्त्व म्हणजेच मी ' हें नुसतें बुद्धीनें जाणून गप्प न राहतां त्या जाणिवेपाठोपाठ त्या स्वस्वरूपाशीं अनन्यभावानें लीन होणें–मिळून जाणें; ज्ञाता–ज्ञेय त्याप्रमाणें भक्त-भगवंत असेंहि द्वैत न उरणें, हीच खरी अद्वैतावस्था होय. हाच मोक्ष. यालाच पूर्णाद्वैत म्हणावयाचें.

---

१. मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ॥ ( अ. १८–१४३६ ).

२. जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळें ॥ ५२६ ॥ तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें । ऐसें जाणणेंविण उरलें । जाणतें जें॥ ( अ. १५-५२७ ).

चिद्विलासाच्या दृष्टिकोनानें हेंच पूर्णाद्वैत ज्ञानेशांनीं साधलें आहे. हीच ज्ञानेशांची भारतीय तत्त्वज्ञानांत मौलिक स्वरूपाची भर होय.

## ज्ञानेश्वर व इतर आचार्य

ज्ञानेशांच्या पूर्णाद्वैताचें हें स्वरूप समजून घेतलें कीं, पूर्वकालीन आचार्यांपेक्षां त्यांचें तत्त्वज्ञान कसें नि किती भिन्न आहे, हें कळून चुकतें. ज्ञानेशांपूर्वीं रामानुजाचार्यांनीं आपल्या श्रीभाष्यांत मायावादावर कडकडून हल्ला चढविला असला तरी त्यांची व ज्ञानेशांची तात्त्विक दृष्टि एक नव्हे. जीव, जगत्, ईश्वर हीं तीन तत्त्वें मानून जीव (चित्) आणि जगत् (अचित्) हीं दोन्ही ईश्वराचें सूक्ष्म नि स्थूल शरीर होत असें ते सांगतात. म्हणजे शरीर-शरीरीभावसंबंधानें सिद्ध होणारें विशिष्ट स्वरूपाचेंच अद्वैत रामानुजाचार्यांना मान्य आहे. पण वस्तुतः त्यांचा हा दृष्टिकोन द्वैतीच ठरतो. मूलवस्तु आणि विविधत्व यांचा डाळिंबाचें कवच व त्यांतील अनेक दाणे यासारखा संबंध ज्ञानेश्वरांना मान्य होणारा नाहीं. दुधापासून दहीं होतें, असली जगदोत्पत्तीची परिणामवादी प्रक्रियाहि ज्ञानेशांना संमत नाहीं. याच द्वैती भूमिकेवर आधारलेला वासुदेव-भक्तीचा द्वैती भक्तियोग आणि ज्ञानेशांची अभेदभक्ति यांत महदंतर आहे. भजक आणि भगवंत यांचेंहि एकरूपत्व होणें म्हणजे खरा भक्तियोग; असें म्हणणाऱ्या ज्ञानेशांना मुक्तिनंतरहि जीव-ब्रह्म हा भेद राहतोच; ही रामानुजीय कल्पना मानवणें शक्यच नाहीं. तेव्हां अज्ञानखंडनाच्या वेळीं रामानुजांसारखे एकदोन युक्तिवाद ज्ञानेशांनीं केले असले तरी तेवढ्या पुराव्यानें ज्ञानेशांच्या तत्त्वबोधावर रामानुजांच्या विचारसरणीची छाप असावी; असा निष्कर्ष काढतां येत नाहीं. ज्ञानेशांनीं श्रीभाष्यहि वाचलें असावें; एवढेंच फार तर म्हणतां येईल.

रामानुजांप्रमाणेंच चित्, अचित् व ईश्वर अशीं तीन मूलतत्त्वें मानायचीं आणि पुन्हां उपनिषदांतील द्वैती व अद्वैती दोन्ही प्रकारचीं वचनें पुढें करून 'द्वैताद्वैती' असा संमिश्र दृष्टिकोन मांडायचा; या निंबार्काचार्यांच्या आत्मविरोधी मतांशीं ज्ञानेशांचें बिलकूल जमत नाहीं. ज्ञानेशांनीं द्वैत व अद्वैत किंवा सगुण-निर्गुण या विरोधाचा परिहार चिद्विलासाच्या किंवा

स्फूर्तिवादाच्या पातळीवरून केला आहे. निंबार्कमतांतील तडजोडीची भूमिका व ज्ञानेशांची समन्वयवादी भूमिका यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. मध्वाचार्य हे चिद्विलासवादी असले तरी सरळ सरळ द्वैतीच होत.

पूर्वकालीन आचार्यांमध्यें ज्ञानेशांना जवळचे असे शंकराचार्यच म्हणावे लागतील. अद्वैत सिद्धांतांबाबत तरी दोघांचें एकमत आहे. अजातवादाचा सिद्धांत दोघेहि मांडतात. माया ही वस्तुतः सत्य म्हणून शंकराचार्यहि मानीत नाहींत. मात्र द्वैताच्या परिहारासाठीं तिला जगकारण म्हणून ते मानतात; तरी देखील 'सदसद्विलक्षण अनिर्वचनीय' असेंच मायेचें वर्णन ते करतात. अद्वैतसिद्धीसाठीं वेगळ्या वेगळ्या सत्ता मानणें व नानात्व हा भ्रम आहे असें म्हणणें हें शंकराचार्यांचे दोन्ही मार्ग ज्ञानेश्वरांना मान्य नाहींत. सत्य अशी एकच मूलवस्तु असून ती विकासशील आहे असें जर्मन तत्त्वज्ञ हेगेलप्रमाणें ज्ञानेश्वरांचें मत आहे. आणि त्याच्या आधारें जगाच्या नानारूपत्वाचा वा चंचलत्वाचा ते उलगडा करतात. शंकराचार्य हे तार्किक वृत्तीचे चिकित्सक असल्यानें त्यांचा भर व्यतिरेकावर आहे तर ज्ञानेश्वर हे अनुभूतिवादी, साक्षात्कारवादी असल्यानें त्यांचा भर अन्वयावर आहे. भूमिकेंतील याच फरकामुळें एक केवल अद्वैती झाले; तर दुसरे पूर्णाद्वैती ठरले.

## ज्ञानेशांच्या स्वतंत्र तत्त्वबोधाचें सामाजिक महत्त्व

" केवल अद्वैत काय नि पूर्ण अद्वैत काय शेवटीं पूर्वापार चालत आलेल्या अद्वैताचा सिद्धांतच ज्ञानेश्वरांनीं सांगितला आहे. " असें म्हणून कित्येकदां ज्ञानेशांच्या तत्त्वबोधांतील नवीनपणा हिरावून घेतला जातो. निदानपक्षीं त्याकडे दुर्लक्ष केलें जातें; परंतु ज्ञानेशांच्या तत्त्वबोधाची निश्चिति हा कांहीं केवळ पंडितांच्या चर्चेचा विषय नाहीं. त्याला तत्का-लीन समाजाच्या दृष्टीनें फार मोठा अर्थ आहे. ज्ञानेशांचा चिद्विलासवादी दृष्टिकोन हें त्यांच्या सामाजिक कर्तृत्वाचें अधिष्ठान आहे. त्याच्या आधा-रानेंच लोकांच्या धर्म, नीति यांसंबंधींच्या कल्पनांत ज्ञानेशांनीं परिवर्तन घडवून आणलें. अर्थात् कौटुंबिक वारसदारीप्रमाणें ज्ञानाच्या–विचाराच्या क्षेत्रांतहि पूर्वसूरींच्या विचारधनाचा वारसा घेऊनच कोणी झालें तरी

पुढें जाणार. तसेंच ज्ञानेशांनीं केलें आहे. शंकराचार्यांचा अद्वैताचा विचार त्यांनीं घेतला; पण परिस्थित्यनुरूप त्यांतील मलिन झालेला मायावादाचा भाग समाजधारणेला निरुपयोगी म्हणून त्यांनीं बाजूला टाकला आणि त्यांना ग्राह्य वाटलेल्या औपनिषदिक सिद्धांताला उजाळा देऊन कालोचित अशा धर्मनीतिसंबंधींच्या आपल्या विचारांना चिद्विलासवादाची भरभक्कम बैठक त्यांनीं मिळवून दिली. या त्यांच्या कर्तृत्वामुळें पुढील कालावरहि ते प्रभाव पाडूं शकले. तत्त्वज्ञ या नात्यानें ज्ञानेशांचें क्रांतदर्शित्व प्रकट होतें तें याच ठिकाणीं. शांकरमतच तेवढें ते उगाळीत बसले नाहींत, तर ते शंकराचार्यांच्याहि दोन पावलें पुढें गेले. पूर्वजांच्या कमाईवरच खात बसणारे ज्ञानेश्वर नव्हते. तें काम हेमाद्रीबोपदेवादि मंडळी करीत होती. म्हणूनच ती त्या काळींहि निष्प्रभ ठरली आणि भविष्यकाळीं केवळ नामोल्लेखाची धनी होऊन बसली. शंकराचार्य, ज्ञानेश्वर यांसारखे द्रष्टे पुरुष मात्र आपल्या काळच्या समाजाला कालोचित असें वळण देतातच; पण त्यांनीं घालून दिलेल्या आचारविचारांचें वळण भविष्यकालांतहि आपला प्रभाव गाजवीत रहातें. ज्ञानेश्वरांनीं नवें कांहीं सांगितलेंच नसतें, तर त्यांचें साहित्य आजवर टिकून राहिलें नसतें. ज्याअर्थी आजच्या महाराष्ट्राच्या मनःपिंडांत त्यांच्या व त्यांच्या पंथांतील एकनाथ-तुकारामादि मंडळींच्या तत्त्वबोधाचे संस्कार आजहि आढळून येतात; त्या अर्थी त्यांच्या तत्त्वबोधांत असें कांहीं अमृततत्त्व निश्चित असलें पाहिजे कीं, त्यानें स्वतः अमर राहून ज्ञानेश्वरतुकारामादि मंडळींना अमर करून ठेवलें.

## चिद्विलासवादाचा महाराष्ट्रीय जीवनावर परिणाम

ज्ञानेशांच्या कालांत महाराष्ट्रांत तरी शांकर अद्वैताचेंच बाळकडू समाजाला पाजलें जात होतें. मात्र त्यावर आधारलेली समाजाची वर्णाश्रमव्यवस्था अंतर्गत विषमतेमुळें व अवैदिकांच्या सवगोलंकारी समतेमुळें डळमळित होऊं लागली होती. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र सारेच वर्ण तसे कार्यक्षम राहिले नव्हते. आचारविचारांतील विसंगति हें त्याचें मुख्य कारण होतें. तोंडीं अद्वैताची भाषा अन् व्यवहारांत मात्र द्वैत-भावाची परिसीमा.

वेदान्त सांगतांना हा सारा संसार म्हणजे मायेचा खेळ म्हणून सर्वस्वी मिथ्या; पण दैनंदिन व्यवहारांत वागतांना मात्र त्याच मायेच्या खेळांत डुंबण्याची हांव. ' कर्मसंन्यासाखेरीज मोक्ष अशक्य ' हा तत्त्वसिद्धांत, पण कर्माचरणाचा सोस मात्र विलक्षण. ही आचारविचारांतील भयंकर विसंगति पाहून ज्ञानेशांसारख्यांना मूळ तत्त्वसिद्धान्ताबद्दलच फेरविचार करावा असें वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. ज्ञानेशांना आपल्या अंवतीभोंवतीच्या समाजांत तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें निरनिराळ्या कोटींत बसतील असे लोक दिसत होते. एका बाजुला विपरीत आचाराचे शांकरमतवादी पंडित, तर दुसऱ्या बाजूला ' देह हाच आत्मा ' मानून ' सुखोपभोग हाच मोक्ष ' या भावनेनें वागणारे व्यवहारवादी प्रतिष्ठित, एकीकडे जन्मसिद्ध जातिसंस्थेच्या कडव्या आभिमानानें पेटलेले वर्णाश्रमधर्माभिमानी, तर दुसरीकडे सबगोलंकारी समतेचें आमिष दाखवून वर्णाश्रमधर्माचा उच्छेद करूं पहाणाऱ्या अवैदिक पंथांचे अभिमानी; एकीकडे निरीश्वरवादी नास्तिक, तर दुसरीकडे सर्व वस्तुजाताच्या ठिकाणीं भिन्नभिन्न देवता मानणारे भोळसट आस्तिक, एकीकडे एकेश्वरी मताचे निष्ठावंत परधर्मी, तर दुसरीकडे अनेक देवतापूजक निष्ठाहीन स्वधर्मी. अशा द्वंद्वात्मक परिस्थितींतून मार्ग काढून साऱ्या वैदिक धर्मानुयायांना विचाराच्या दृष्टीनें अद्वैताच्या उंच पातळीवर आणणारें, भावनात्मक दृष्टया साऱ्या समाजाला एकजीव करणारें, आणि आचारदृष्टया स्वार्थनिरपेक्ष वृत्तीनें आणि निष्ठेनें समाजोपयोगी अशा व्यवहारकर्मात रत करणारें असें तत्त्वज्ञान लोकांपुढें मांडण्याची त्या काळीं आवश्यकता होती. काळाची ही गरज ओळखूनच ज्ञानेशांनीं चिद्विलासवादी पूर्णाद्वैताचा आपला सिद्धांत अमृतानुभवाच्या द्वारां लोकांपुढें ठेवला. नानाविध मतांचा समन्वय करणाऱ्या गीतेच्या आधारानें लोकांना तो समजावून दिला; स्वतःच्या जीवनामध्यें तो आचरून दाखविला आणि नामदेवादि संतमेळ्याच्या द्वारां संघटितपणें त्याचा प्रसार करविला. म्हणूनच त्याचा अपेक्षित तो परिणाम पुढें महाराष्ट्राच्या पडत्या काळांतहि दिसून आला.

ज्ञानेशांच्या चिद्विलासवादी पूर्णाद्वैतानें जीवनाकडे पहाण्याची लोकांची दृष्टीच बदलली. त्यामुळें नवा धर्मविचार, नव्या नीतिकल्पना निर्माण

झाल्या. जुन्या विचारांना व आचारांनाहि कालोचित असा नवा अर्थ प्राप्त झाला. धार्मिक विषमता व तज्जन्य दुजाभाव दूर होऊन लोकांतील ऐक्यभावाचें दृढीकरण होत गेलें. त्यामुळेंच मुसलमान अमदानींत वैदिक धर्माचा पाया बळकट राहिला. अवैदिक पंथ निष्प्रभ ठरले. मुसलमानांची परसत्ता महाराष्ट्राच्या धार्मिक, सामाजिक नि सांस्कृतिक जीवनावर विशेष परिणाम करूं शकली नाहीं. ह्या धार्मिक एकजुटींतूनच राष्ट्रीय ऐक्याचा व सामुदायिक पुरुषार्थाचा मार्ग महाराष्ट्राला चोखाळता आला. ज्ञानेश्वर ते एकनाथ या काळांतील सांस्कृतिक कार्याची भौतिक फलश्रुति शिवकालांत दृष्टीस पडली.

मात्र धर्मसुधारणेचें हें कार्य ज्ञानेशांनीं मोठ्या जबाबदारीनें आणि फार सावधगिरीनें केलें असावें असें त्यांच्या ग्रंथांतील समन्वय दृष्टीवरून व हळुवार प्रतिपादनावरून दिसून येतें. कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म, जन्मसिद्ध जातिव्यवस्था आणि वर्णाश्रमधर्म यांसारख्या हिंदुसमाजाच्या आधारभूत तत्त्वांना धक्का लावून सामाजिक क्षेत्रांत ढवळाढवळ करण्याचा क्रांतिकारक प्रयत्न ज्ञानेश्वरांनीं केला नाहीं. बौद्ध, जैन यांच्या फसलेल्या क्रांतिकारक प्रयत्नांपासून त्यांनीं एकप्रकारें धडाच घेतला असावा. ज्ञानेशांच्या जरा अगोदर होऊन गेलेले महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर यांच्या तुलनेनें ज्ञानेश्वर धर्मसुधारणेच्या प्रयत्नांत अधिक वास्तववादी ठरतात. वैदिक धर्मियांपासून फुटून वेगळाच पंथ काढण्याचा आततायीपणा त्यांनीं केला नाहीं. उलट अगोदरपासून लोकांत प्रचलित असलेल्या वैदिक धर्मांतर्गत भागवतधर्मी वारकरी संप्रदायालाच त्यांनीं हाताशीं धरलें. त्याच्या द्वारां एका बाजूला वैचारिक दृष्ट्या वैदिक धर्माला अधिक व्यापक नि उदार असें स्वरूप देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; तर दुसऱ्या बाजूला सर्वसामान्य हिंदू धर्मीयांच्या आचरणाला नैतिक अधिष्ठान प्राप्त करून दिलें. ज्ञानेशांचा तत्त्वबोध जसजसा समाजामध्यें रुजूं लागला तसतसा लोकांच्या आचारावरहि त्याचा परिणाम होऊं लागला. त्यांच्या आचारविचारांतील विसंगति दूर झाली. सामान्यांच्या जीवनाची नैतिक पातळी उंचावली. त्यांच्या ठिकाणची जीवनाची आसक्ति कमी होत जाऊन जीवननिष्ठा मात्र बळावत गेली.

## गीतेचीच निवड कां केली ?

तत्त्वबोधाप्रमाणें नीतिबोधाच्या बाबतींतहि ज्ञानेशांची दृष्टि लोकाभिमुखच आहे. 'विश्वामध्यें स्वधर्मसूर्याचा उदय व्हावा' या लोकहितबुद्धीनें मराठीच्या नगरांत ' ब्रह्मविद्येचा सुकाळ ' करण्याला ते सिद्ध झाले. त्यासाठींच त्यांनीं गीतेची निवड केली आणि भक्तिपंथाची कांस धरली. श्रोत्यांना उद्देशून ते म्हणतात कीं, ' तुम्ही गीतार्थाचे सोइरे । जाणोनि गीता जीवसरें । धरिली मियां ॥ ' ( अ. १३–३२९ ) सर्वांनाच गीताग्रंथ प्रिय नि आदरणीय आहे. म्हणून तिच्या द्वारां ज्ञानेशांनीं आपला नवा विचार, नवा आचार लोकांच्या गळीं उतरविला. गीतेला देवताभेदमूलक विचारसरणीचा स्पर्श नाहीं; गीतेंत जातिभेद–वर्णभेद यांवर जोर नाहीं. स्त्री, शूद्र आणि दुराचारी यांनाहि गीतेनें सद्‌गति मिळवून देणारा सुलभ असा उपासनामार्ग सांगितला आहे. गीतेमधली देवकल्पना संकुचित किंवा एकदेशीय नाहीं; व्यापक नि उदात्त आहे. तसेंच गीतेनें वर्णिलेले दैवी गुण सामाजिक नीतिमत्तेला उपकारक आहेत. हे सारे महत्त्वाचे विशेष लक्षांत घेऊन ज्ञानेशांनीं गीतेचा आदर केला; ही गोष्ट त्यांच्या गीतागौरवपर ( उतारा ३ ) ओव्यांवरून स्पष्ट होते. ' वेदाची सुसेव्यता ' ' औदार्यें आगळा वेदु ' ' हें सगळें परब्रह्मचि ' किंवा 'गीता म्हणजे श्रीप्रभूची वाङ्मयी मूर्तिच होय;' इत्यादि शब्दांनीं गीतेची महति ज्ञानेश्वर गातात. ती उगीच नाहीं. त्यांच्या जीवितकार्याच्या दृष्टीनें त्यांना गीता शिरोधार्य वाटली म्हणून तिचा जीवनपर अर्थ लोकभाषेंत विशद करून ज्ञानेशांनीं सांगितला. त्यांतहि दैवी गुणांच्या नीतिपर अर्थावर त्यांनीं अधिक लक्ष दिलें म्हणूनच अ. १३ व १६ यांवरील त्यांचें विवेचन बरेंच विस्तृत झालें आहे.

## ज्ञानेशांच्या नीतिबोधाची प्रेरणा

ज्ञानेशांच्या विशिष्ट दृष्टिकोनानें पाहूं लागतांच कर्म, ज्ञान, भक्तियोग, संन्यास इत्यादि रूढ साधनांचें स्वरूप, त्यांचा दर्जा, त्यांचीं उद्दिष्टें, इत्यादि सारें कांहीं पार बदलून जातें. म्हणूनच म्हणावयाचें कीं, ज्ञानेशांच्या जीवनदृष्टीनें लोकांच्या नैतिक कल्पनांत देखील महदंतर घडवून

आणलें. उदाहरणार्थ, ज्ञानेशांच्या काळांत व्रतवैकल्यें, तीर्थयात्रा, यज्ञयाग करून स्वर्गसुखें मिळवावींत, अशी अपेक्षा केली जाई. त्याहिपेक्षां उंच उडी म्हणजे कर्मसंन्यासाच्या किंवा ज्ञानयोगाच्या द्वारां मोक्ष मिळविणें ही होय; पण हीं दोन्हीं ध्येयें चिद्विलासवादी दृष्टीनें तुच्छ ठरविलीं. भक्तिप्रेमाच्या सुखापुढें स्वर्ग-मोक्ष हीं कोण्या झाडाचा पाला! 'वेदज्ञांचें स्वर्गसुख म्हणजे स्वप्नांत लाधलेल्या ठेव्यासारखें आहे' असें एके ठिकाणीं (८-३७) ज्ञानेश्वर म्हणतात. तर दुसरीकडे भक्तांच्या भक्तिमार्गाचा गौरव करतांना ते लिहितात, 'ते सोय पाहोनि अव्हांटा। स्वर्गापवर्ग' (१८-२८) जुन्या ध्येयाबरोबरच जुन्या मार्गाचें स्तोम कमी केल्या-खेरीज कुठल्याहि समाजांत सुधारणा होत नसते. म्हणूनच ज्ञानेशांच्या नव्या नीतिबोधानें स्वधर्माची महति पटवितांना योगसाधन, तीर्थयात्रा, व्रतवैकल्यें अनेक देवतापूजन इत्यादींचें महत्त्व पार कमी[1] केलें. तसेंच, आपल्या बोधाचें स्वरूप ज्ञानेशांनीं लोकांना पचेल झेपेल असेंच ठेविलें. तत्कालीन समाजांतील वर्णसंस्था, आश्रमसंस्था, ग्रामसंस्था इत्यादींमध्यें पार उलथापालथ करून टाकावी अशी त्यांची भूमिका नव्हती. असला अराजकी क्रांतिवाद त्यांनीं पुरस्कारला नाहीं. या सगळ्या लोकसंस्था रक्षणीय आहेत म्हणून कृतकार्य झालेल्यांनीं देखील 'मार्गाधारें वर्तावें' आणि विश्वाला (लोकांना) नीट मार्गाला लावावें;' अशीच त्यांची शिकवण होती. लोकांपासून फटकून राहण्याची किंवा असाधारण अशा मार्गाचा पाठपुरावा करण्याची त्यांची वृत्ति नव्हती. 'जें फार प्रयासानें आईच्या स्तनांतील दूध प्राशन करूं शकतें, त्याच्यापुढें पक्वान्नें ठेवून काय

---

१. तुम्हीं व्रत नियमु न करावे। शरीरातें न पीडावें। दुरी कें्ही न वचावें। तीर्थासी गा ॥ योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें। मंत्रयंत्र विधानें। झणीं करा ॥ देवतांतरा न भजावें। हें सर्वथा कांहीं न करावें। तुम्हीं स्वधर्मयज्ञीं यजावें। अनायासें ॥ (अ. ३-८९-९१).

२. जे पुढत पुढती पार्था। हे सकळ लोकसंस्था। रक्षणीय सर्वथा। म्हणऊनियां ॥ मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरें लावावें। अलौकिका नोहावें। लोकांप्रति ॥ (अ. ३.—१७०-७१)

उपयोग ?' स्वतःच दिलेल्या या दृष्टांताप्रमाणें अज्ञ समाजाची कुवत लक्षांत घेऊन निरनिराळ्या साधनांसंबंधींचा विवेक ज्ञानेशांनीं लोकांना शिकविला. यांत लोकांच्या हिताची खरीखुरी कळकळ आणि तारतम्यबुद्धि हींच दिसून येतात.

## कर्मयोगांतील तारतम्यबुद्धि

कर्मयोगासंबंधीं ज्ञानेशांची जी दृष्टि आहे, तीवरून तत्कालीन समाजाला अनुसरून आपल्या बोधाचें स्वरूप ज्ञानेशांनीं कसें ठेवलें तें स्पष्ट होतें. एका बाजूला कर्मात बुडून गेलेले वैदिक कर्मठ तर दुसऱ्या बाजूला कर्मसंन्यासाचा पुरस्कार करणारे कर्मभ्रष्ट अवैदिक. हीं दोन टोकें लक्षांत घेऊन कांहीं ठिकाणीं आत्मज्ञानविरहित आंधळ्या कर्माचरणाचा अधिक्षेप, तर कांहीं ठिकाणीं वर्णाश्रमविहित अशा धर्मकर्माचा गौरव ज्ञानेशांना करावा लागला आहे. कर्मसंन्यासवाद्यांना ते बजावतात कीं, " टाकूं म्हटलें तरी कर्में टाकतां येत नांहींत.[2] शरीरधाऱ्याला[3] कर्में हीं केलींच पाहिजेत. दुसरें असें कीं कर्में सोडतां आलीं तरी स्वधर्मविहित कर्में सोडतां कामा नये." अन्तःकरणाला शुद्ध करणारीं सत्कर्में हीं तीर्थांच्या योग्यतेचीं होत. ( १७-१३ ) तिसरा विचार असा कीं, "साध्या साध्या कर्माचरणाच्या बाबतींत जे असमर्थ नि अपात्र आहेत, त्यांना नैष्कर्म्ययोग[4] पटवून उपयोग काय ? त्या लोकांना मार्गाला लावण्यासाठीं तेथें सत्कर्म योगच सांगितला पाहिजे. इतकेंच नव्हे तर लोकसंग्रहासाठीं नैष्कर्म्य स्थितीला पोंचलेल्या ज्ञानी माणसानेंहि योग्य-

---

१. ' जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवीं ॥—(अ. ३-१७२).

२. संगु जंव प्रकृतीचा । तंव त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाहि करूं म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ॥ ( अ. ३-६३ ).

३. हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोघें आलें । मग उचित का आपुलें । वोसंडावें ॥ ( अ. ३-१४४ ).

४. तैशीं कर्मीं जया अयोग्यता । तयाप्रती नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां । आदि करूनी ॥ ( अ. ३-१७३ ).

प्रकारचें कर्माचरण करून दाखवून लोकांना धडा घालून दिला पाहिजे;[1] " कारण ' एथ वडिल जे जे करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिति । सामान्य सकळ ॥ ( अ. ३-१५ ) अशी या लोकांची स्थिति आहे. तेव्हां कर्मसंन्यासाचें तत्त्वज्ञान सांगून या अज्ञ लोकांचा बुद्धिभेद करणें सर्वथैव अयोग्य आहे असेंच ( श्रीकृष्णाप्रमाणें ) ज्ञानेशांना वाटत होतें; असें यावरून दिसतें.

वर्णाश्रमधर्मानुसार केलीं जाणारीं कर्मे हीं शेवटीं नैष्कर्म्यसिद्धीलाच कारण होतात असा त्यांचा सिद्धांत आहे. त्यासाठीं त्यांनीं मार्ग, नाव, दीप, औषधी इत्यादि साधन वस्तूंच्या उपयोगाचे मार्मिक दाखले दिले आहेत. ( उतारा १७ पहा ) यावर कर्मे हीं बंधनकारक होतात अशी शंका काढणारांना 'जया कर्मासि...कर्मचि रुसे' अशा प्रकारची 'हातवटी' ज्ञानेश्वर सांगू लागतात. ती हातोटी म्हणजे 'कर्मफळत्याग' होय. इतरत्रेंहि त्यांनीं हाच विचार मांडला आहे. अनेक दृष्टांतांनीं या त्यागाचें महत्त्व पटवून देऊन शेवटीं ज्ञानेश्वर श्रीकृष्णाच्या तोंडून असें म्हणतात कीं, ' कर्मे करावीं हा चांगु । निरोपु माझा ।' ( १७-२९ ).

मात्र ज्यांनीं कर्ममार्गाचें अवडंबर माजविलें आहे; त्यांच्यासाठीं आत्मज्ञानाच्या आवश्यकतेचें प्रतिपादन ज्ञानेशांनीं केलें आहे. प्रथम ते सांगतात कीं, वेदविहित कर्माचरणाला कांहींच हरकत नाहीं, इतकेंच काय पण स्वधर्माचरण हें केलेंच पाहिजे. म्हणून तर ज्ञानेशांनीं वैदिक कर्मठांचें किंवा याज्ञिकांचें चित्र आदर वाटेल असें रेखाटलें आहे; पण त्यांच्या कर्माचरणांतलें एक वैगुण्य म्हणजे सकामता किंवा सहेतुकता तें तेवढें वाईट आहे; घातक आहे असें स्पष्टपणें ज्ञानेश्वर बजावतात. (८-६)

---

१. तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी । नैष्कर्मींहि दावावी । आचरोनी ॥—( अ. ३-१७४ ).

२. आणि हें कर्म मी कर्ता । आचरेन या अर्था । ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिघों देसी ॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावें । भोग सकळ ॥ ( अ. ३-१८७-१८८ ).

ज्ञान्यांच्या दृष्टीनें याज्ञिकांचा हा पुण्यमार्ग–हें सकाम धर्माचरण–म्हणजे उपसर्गच होय. कारण एका आत्मज्ञानाखेरीज असले जितके उपाय केले जातात तेवढे बंधनालाच कारण होतात; असा ज्ञानेशांचा सिद्धान्त आहे. ( तिहीं गुंफली अधिकें। रुखीं इयें ।। १५-४२ ). तेव्हां कर्मसंन्यास-वाद्यांना वाटणारी कर्मबंधाची भीति दूर करण्यासाठीं कर्मफलत्यागपूर्वक कर्मे करण्याची 'हातवटी' ज्ञानेशांनीं जशी एका बाजूला सांगितली;त्याच-प्रमाणें, दुसऱ्या बाजूला कर्मकांडाच्या नादीं लागून बंध निर्माण करणाऱ्या कर्मठांना निष्काम वृत्तीनें व निरहंकारपणें कर्मे करण्याची युक्ति ज्ञानेशांनीं दाखवून दिली. त्यासाठीं कर्मांचा पसारा हा त्रिगुणांचा धर्म आहे, ( १६-१९ ) आत्म्याशीं त्याचा संबंध नाहीं. म्हणून 'त्याच्या मुक्ती-साठीं मी कर्मे करतों' ही समजूत चुकीची आहे. आत्म्याचें अकर्तेपण, त्याचें गुणातीतत्व लक्षांत घेऊन कर्मे करूं लागाल तर 'ऐसी मुक्ति असे सहज' असें अर्जुनाप्रमाणेंच 'ज्ञानांबुज द्विरेफु' ( ज्ञानरूपी कमलांतील भ्रमर ) अशा कर्मठ पंडितांना ज्ञानेशांनीं सांगितलें आहे. (१६-११).

कर्मयोगाला ज्ञानाप्रमाणेंच भक्तीचीहि जोड दिली पाहिजे; अशी ज्ञानेशांची शिकवण आहे. डोळसपणानें जरी स्वधर्माचरण केलें तरी त्यांत केवळ कर्तव्यभावनेची रुक्षता असूं नये तर तीं तीं कर्मे आवडीनें, प्रेमानें केलीं पाहिजेत, तरच 'तिहीं वैकुंठचि केलें आघवें' ही योग्यता प्राप्त होते असें ज्ञानेशांचें म्हणणें आहे.

## ज्ञानेशांचा स्वतंत्र भक्तियोग

या भक्तिमार्गासंबंधींहि तत्कालीन प्रचलित दृष्टिकोनांपेक्षां वेगळी विचारसरणी ज्ञानेशांनीं मांडली. त्यामुळें आजहि इतर प्रांतीयांपेक्षां महा-राष्ट्रीयांचा भक्तिमार्ग आपल्या वैशिष्ट्यानें वेगळा असा उठून दिसतो. या बाबतींतहि दोन प्रकारच्या दृष्टिकोनांमध्यें ज्ञानेशांना परिवर्तन घडवावें लागलें. अनेक क्षुद्र दैवतांना भजण्याचा–निकृष्ट प्रकारच्या सगुण भक्तीचा व्यवहार सामान्य अडाणी लोकांत रूढ होता. त्यांतलें वैय्यर्थ्य त्यांना पट-वून देऊन त्यांच्या स्वार्थानुसारी चंचल श्रद्धेचें निरपेक्ष अशा निष्ठेंत ज्ञाने-श्वरांनीं रूपांतर घडवून आणलें. अर्थात् या कामीं वारकऱ्यांच्या एकांतिक

विठ्ठलनिष्ठेचा आदर्श एका बाजूला त्यांनीं पत्करला. पण त्याचबरोबर दुसऱ्या बाजूला अशा प्रकारची एकविध निष्ठा ज्यांच्या ठिकाणीं बाणली होती, अशा नामदेवासारख्या भक्तांना सगुण भक्तीच्या पलीकडे जाऊन निर्गुण, निराकार अशा चिद्रूपाला ओळखण्याची शिकवणहि त्यांनीं दिली. ती शिकवण नामदेवादि भक्तमंडळींनीं लगेच आत्मसात् केली; असें त्यांच्या अभंगरचनेंतील ज्ञानेश्वरी वळणावरून स्पष्ट दिसतें. दुसरा दृष्टिकोन जीव-ईश्वर भेद मानून दीनवाण्या वृत्तीनें ईश्वराची उपासना करावी असें शिकवणाऱ्या द्वैतवाद्यांचा होता. रामानुजांचें विशिष्टाद्वैती तत्त्वज्ञान प्रमाण मानणाऱ्या दक्षिणेकडील वैष्णवांचा भक्तिमार्ग हा अशाच प्रकारचा होता. महानुभावांचा उपासनामार्गहि द्वैती कल्पनेवरच आधारलेला होता. अर्थात् या मार्गांशीं ज्ञानेशांच्या पूर्णाद्वैती विचारसरणीचें सख्य जमणें कठीणच. भक्तिसुखाचें श्रेष्ठत्व मान्य करूनहि त्याची परिणति अद्वैत निष्ठेंतच झाली पाहिजे; अशी ज्ञानेशांची भूमिका होती. 'द्वैत दशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण ' या तात्त्विक दृष्टिकोनाला जुळती अशीच ही भूमिका असल्याचें ' अभेद भक्ति व हृदया हृदय येक जालें ' या उताऱ्यांवरून स्पष्ट होतें. 'जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ' अशा वृत्तीनें माझ्या व्यापक स्वरूपाला जाणणें आणि याच जाणिवेनें मला शरण येणें म्हणजे ' चित्तें मीचि जाहले ' अशा प्रकारें मद्रूप होणें हा खरा भक्तियोग होय. (१८–१५-१६). या अद्वैती भक्तींत ( 'अभेदें जो भक्तियोगु । १८-७ ) भक्त नि भगवंत असें द्वैत संभवतच नाहीं. घटाचा नाश झाला—मातीचा घडा भंगला कीं, घटाच्या आंतली पोकळी बाहेरच्या पोकळींत मिसळून जाते, तसें माझ्याशीं ऐक्य करणें म्हणजे मला शरण येणें होय. ( २१–१२ ) हें पराभक्तीचें वर्णन भावनेनेंच आणून घेतलें पाहिजे. ' मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें । ' या सूत्रांत ज्ञानेशांनीं आपल्या अद्वैती भक्तीची व्याख्या दिली आहे. ती तर्कानें समजणार नाहीं; कल्पनेनें उलगडणार नाहीं; अनुभूतीनेंच प्रत्ययास येईल. अद्वैती भक्ति हा स्वानुभवाचाच विषय आहे. ज्ञानेशांनीं तसली भक्ति अनुभवली होती, म्हणून दृष्टान्तांच्या साहाय्यानें तिची जास्तींत जास्त कल्पना ते देऊं शकतात. त्या दृष्टीनें उतारा १८ मधील १६ ते २६ ओव्या व

उतारा २१ मधील १९ ते २६ ओव्या मुळांतूनच पाहाव्यात. अशा अभेदभक्तीच्या बळावर मोक्षाची सोडीबांधी करणें किंवा भक्तिमार्गाच्याच द्वारां चौथ्या पुरुषार्थसिद्धीचें वांटप जगामध्यें करत जाणें, एवढा सर्वाधिकार भक्ताला प्राप्त होतो. ( १९–२३-२४) अशा शब्दांत ज्ञानेश्वर ज्ञानी भक्ताचें श्रेष्ठत्व वर्णन करतात.

## भक्तीची सामाजिक नीतीशीं सांगड

पण अशा ज्ञानी भक्ताची केवळ आध्यात्मिक योग्यताच वर्णन करून ते थांबत नाहींत. कर्म, ज्ञान, भक्ति यांच्यांतील एकांतिकता टाळून त्यांचा समन्वय साधण्याचा हितोपदेश ज्या नैतिक भूमिकेनें ज्ञानेश्वर करतात, त्याच नैतिक भूमिकेनें त्यांनीं आपल्या आदर्शांचें चित्रण केलें आहे. कर्मयोगी, ज्ञानयोगी, भक्तियोगी, (आणि हठयोगीसुद्धां) यांचीं चित्रें रेखाटतांना ज्ञानेशांनीं ज्या ज्या गुणांचें वर्णन केलें आहे ते ते गुण सामाजिक नीतिमत्तेला पोषक असेच आहेत. सत्य, अहिंसा, दया, सर्वांभूतीं समभाव, अमानित्व, अदंभत्व, अक्रोधत्व इत्यादि गुणांचें स्वरूप स्पष्ट करतांना वैयक्तिक आणि सामाजिक दोन्ही अंगांनीं ज्ञानेश्वर विचार करीत आहेत; असें स्पष्ट दिसून येतें. त्याचप्रमाणें संन्यास, तप, यज्ञ,त्याग, वैराग्य इत्यादींचे अर्थ ज्या प्रकारें ज्ञानेश्वरांनीं केले आहेत; त्यावरून केवळ आध्यात्मिक भूमिकेवरून ज्ञानेश्वर बोलत नसून आपल्या भोंवतालच्या समाजाची नीतिमत्ता कशी उंचावेल आणि लोकांचें सांसारिक जीवनहि निकोप नि निरामय कसं होईल या कळकळीनें ते बोलत आहेत अशी खात्री पटते. ज्ञानेशांच्या चिद्विलासवादी दृष्टिकोनावरून त्यांची क्रांतदर्शी तत्त्वज्ञाची भूमिका स्पष्ट झाली आहे. त्यांचें सारें विवेचन एखाद्या योग्याला साजेल असें अनुभूतिप्रधान आहे. शिवाय ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत नाथपंथाचें 'अद्वयानंदवैभव' काव्यमय भाषेंत लोकांपुढें ठेवून योगमार्गाचें रहस्य जाणणारा आत्मानुभवी योगी ही पदवी ज्ञानेशांनीं सार्थ करून दाखविली आहे. ज्ञानेशांचें सारें जीवन व सारें कर्तृत्व त्यांच्या संतहृदयाची साक्ष पटविणारें आहे. तर अ. १३ चा कांहीं भाग व अ. १६ यावरील ज्ञानेश्वराचें विवेचन त्यांच्या नीतिशिक्षकाच्या भूमिकेबद्दल ग्वाही देणारें आहे.

त्यांच्या नीतिबोधाचा पाया अर्थात् अध्यात्म ह्याच आहे; परंतु त्याचें लक्ष्य अंवतीभोंवतीचे लोक हेच असल्यानें त्याचा परिणाम सामाजिक जीवनावर झाल्याखेरीज राहिला नाहीं. म्हणूनच ज्ञानेशांची भूमिका अध्यात्मिक असली तरी कार्य सामाजिक-नैतिक आहे; हें विसरतां येत नाहीं. वैयक्तिक मोक्षाच्या हेतूनें ज्ञानेशांनीं ग्रंथलेखन केलेलें नाहीं; ही गोष्ट त्यांच्या शेवटल्या पसायदानावरूनहि स्पष्ट होते. "खलबुद्धीच्या लोकांचा दुष्टपणा नाहींसा व्हावा; सत्कर्मामध्यें त्यांना अधिकाधिक गोडी लागावी; जीवमात्राच्या ठिकाणीं परस्परांबद्दलचा स्नेहभाव निर्माण व्हावा; पापाचा अंधार नाहींसा होऊन स्वधर्मसूर्याच्या उदयानें सारें विश्व उजळून निघावें; सर्व प्राणीमात्राला त्याचें ईप्सित प्राप्त व्हावें; सर्व सुखी व्हावेत; त्यांना दृष्ट-अदृष्ट ( लौकिक व पारलौकिक ) असें दोन्ही प्रकारचें यश लाभावें." (२२–२–८ ) असा प्रसाद आपल्या वाग्यज्ञाचें फल म्हणून ज्ञानेश्वर मागतात. ही फलश्रुतीच त्यांची सामाजिक–नैतिक भूमिका स्पष्ट करणारी आहे.

या सामाजिक भूमिकेला अनुसरूनच आध्यात्मिक आदर्शाच्या चित्रांतहि ज्ञानेशांनीं नैतिक गुणांचीं वर्णनें केलीं आहेत. अर्थात् सर्वत्रच अद्वैताची भूमिका सारखी असल्यानें ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनें आदर्श अशी आध्यात्मिक वृत्ति व सामाजिकदृष्ट्या उदात्त असें नैतिक आचरण यांमध्यें द्वैत किंवा विरोध असणें शक्यच नाहीं. आध्यात्मिकदृष्ट्या श्रेष्ठ असलेला पुरुष वैयक्तिक वा सामाजिक नीतिमत्तेच्या बाबतींतहि आदर्श असलाच पाहिजे. श्रेष्ठ दर्जाचें अध्यात्म आणि उच्च दर्जाची नीति हीं दोन्ही एकच होत. म्हणून भक्तांचें माहात्म्य वर्णन करतांना ज्ञानेश्वर लिहितात, 'जयांचिये लीलेमाजीं नीति। जियाली दिसे ॥ ( २०–५ ).' कारण भक्तांचें सहज वागणें हेंच नीतीला आधार होऊन बसतें. सद्भावांबद्दल त्यांना जी आस्था वाटत असते, त्या आस्थेच्या ठिकाणींच धर्म राज्य करीत असतो. ज्ञान, विवेक, वैराग्य आणि समाधान यांवर नीति उभारलेली असते. त्या चारहि गोष्टी भक्ताच्या ठिकाणीं पूर्ण स्वरूपांत नांदत असतात. भक्त हे ज्ञानगंगेंतच अवगाहन करीत असतात. त्यांचें मन हेंच विचाराचें जीवन असतें आणि वैराग्यच त्यांची उपासना करीत

असतें. तसेंच पूर्णता जेवून तृप्त झाल्यानें हे सदोदितच समाधानी असतात. यांच्या इंद्रियांनीं शांतीचेच अलंकार धारण केलेले असल्यानें हे सदा शांतचित्त व आनंदी असतात. ( २०–१–६ ) अशा वृत्तीचे हे महानुभाव असें कोणतें महत्कार्य करतात ? तर 'मीचि होऊनि पांडवा। करिती माझी सेवा' पण ही अद्वैतीभक्ति ही वैयक्तिक बाब झाली. त्यांचें सामाजिक कार्य काय ? भक्तीसारख्या आध्यात्मिक वृत्तीची सामाजिक फलश्रुति काय ? तर नामसंकीर्तनाच्या सुलभ साधनाचा छंद लोकांना लावून पापाचें नांव नाहींसें करून टाकलें. पापाचरणाकडे त्यांची प्रवृत्तीच होईनाशी झाली. त्यामुळें प्रायश्चित्तादि कर्मकांडाचें अवडंबर कमी झालें. पापाचरणाची प्रवृत्ति नष्ट करणाऱ्या नामघोषानें विश्वाचीं दुःखें ( तापदायक वर्तन) नाहींशीं झालीं. तसेंच हा राजा–हा रंक, हा लहान–हा थोर ही भेदबुद्धि नष्ट होतांच 'आनंदाचें आवारू। होत जगा' असा अनुभव लोकांना येऊं लागला. या अनुभवाचें त्या वेळच्या परिभाषेंत वर्णन करतांना ज्ञानेश्वर सांगतात कीं, नामघोष गौरवानें सारें विश्व धवलित करून 'तिहीं वैकुंठचि केलें आघवें' म्हणजे आजच्या आलंकारिक भाषेंत त्यांनीं पृथ्वीलाच स्वर्ग बनविलें. (२०–१०, १३, १५, १६ )[1]

---

१. ज्ञानेश्वरींतील हा सबंध उतारा नाममाहात्म्याबरोबरच वारकरी पंथाच्या कर्तृत्वाचें वर्णन करणारा आहे. ज्ञानेश्वरींत विठ्ठलाचा उल्लेख नाहीं. असा आक्षेप घेणारांचें 'नामघोषगौरवें। धवळलें विश्व' एवढ्या शब्दांनीं देखील समाधान व्हायला कांहीं हरकत नाहीं. याखेरीज पंढरीच्या विठ्ठल दर्शनाच्या पद्धतीची आठवण करून देणारा 'उराउरी भेटण्याचा' उल्लेख अ. १८ मध्यें आला आहे किंवा अ. १२ मध्यें कृष्णानें मस्तकीं शंकराला धारण केल्याचा उल्लेख आहे. त्यामुळें विठ्ठलाच्या मुकुटाचे ठिकाणीं शिवलिंग असल्याचा जो समज आहे, त्याचा निर्देश त्या ठिकाणीं अभिप्रेत असावा; असे पुरावे इतरांनीं दिलें आहेतच. [ ज्ञानेश्वर वचनामृत—प्रस्तावना पाहा—( प्रा. रा. द. रानडे ).]

बाराव्या अध्यायांतील भक्त-लक्षणांत तर निसर्गांतील वस्तुजाताचे दृष्टांत देऊन आदर्श भक्तीच्या बाबतींत अनेक नैतिक गुणांचे उल्लेख ज्ञानेशांनीं केले आहेत. त्या त्या गुणांची सामाजिक आवश्यकताच ज्ञानेशांना अपेक्षित होती; असें त्यावरून दिसतें. अ. १६ मध्यें दैवी नि आसुरी संपत्तीच्या वर्णनांमध्यें मनुष्याच्या ठिकाणीं कोणचे गुण असावेत, कोणते अवगुण नसावेत; हें सांगण्याचाच स्पष्ट उद्देश आहे.

सौजन्य, कारुण्य, लीनता, क्षमाशीलता, दयाळूपणा व औदार्य इत्यादि गुणांचा गौरव करतांना ज्ञानेशांनीं मुक्त कंठानें तो केला आहे. कारण त्यांना ज्या प्रकारचा भूतदयावादी किंवा मानवतावादी आदर्श लोकांपुढें उभा करावयाचा होता; त्याच्या ठिकाणीं या मानवी गुणांचा उत्कर्षच त्यांना अभिप्रेत होता. म्हणून अहिंसक वृत्तीच्या माणसाचें चालणें वर्णन करतांना 'कारुण्यामाजीं पाउलें । लपवूनि चाले ॥' किंवा 'जीवांतळीं आंथरितु । आपुला जीवु ।।' अशा अत्युक्तिपूर्ण भाषेंत ज्ञानेश्वर बोलून जातात. त्याच्या बोलण्याचें वर्णन करतांना 'पुढें प्रेम पाझरतें, मागून अक्षरें चालतात; कृपा आधीं प्रगट होते, मग शब्द उमटतात' असें ते लिहितात. तसेंच उपरोधिक बोलणें, तंट्यास उत्तेजन देणें, टर उडवणें, टाकून बोलणें वर्मी झोंबेल असें बोलणें, हटवाद करणें, आशा दाखविणें, संशयांत पाडणें, कपट करणें इत्यादि दोषांपासून त्याची वाणी अगदीं अलिप्त राहतें; त्यामुळें त्याचें बोलणें नादब्रह्म आकारास यावें किंवा गंगेचें पाणी उसळावें तशासारखें असतें असा दृष्टांत देऊन ज्ञाने-

---

१. तैसे परमाणु पां गुंतलें । जाणूनि जीव सानुले ।... ( अ. १३-२४८

२. ते वाट कृपेचि करितु । ते दिशाचि स्नेहा भरितु ।...(अ. १३-२४९).

३. पुढां स्नेह पाझरे । मागां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ ( अ. १३-२६२ ).

४. उरोधु वादुबळु । प्राणु पापढाळु । उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ॥
आटु वगु विंदाणु । आशा शंका प्रतारणु । हे संन्यसिले अवगुणु । जिया वाचा ॥ ( अ. १३-१७०-७१ ).

श्वर लिहितात कीं ' तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ । बोल जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ अ. १३–२६९ ॥

## ज्ञानेशांचें व्यक्तित्व

अशा तऱ्हेचीं वर्णनें वाचत असतांना आपल्यापुढें ज्ञानेशांची मूर्तिच उभी राहते. कारण भक्त, योगी, ज्ञानी यांचीं चित्रें काढतांना ज्या ज्या वृत्तींचा उल्लेख ज्ञानेश्वरींत आला आहे, त्या त्या वृत्तींनीं संपन्न असेंच ज्ञानेशांचें व्यक्तित्व होतें. हीं सत्वगुणसंपन्न आदर्श चित्रें म्हणजे जणूं कांहीं ज्ञानेश्वरांच्या शब्दप्रतिमाच होत. त्यांकडे पाहतां असें वाटतें कीं ज्ञानेश्वरांचें कर्तृत्व तर मोठें आहेच; पण त्यांचें व्यक्तित्व त्याहूनहि मोठें आहे. सर्वच थोर व्यक्तींच्या कर्तृत्वाप्रमाणें त्यांचें कर्तृत्व बदलत्या कालमानाप्रमाणें इतिहासजमा होऊन त्याला अंधुकपणा आला असला, तरी त्यांच्या चरित्रांतून व ग्रंथरचनेंतून व्यक्त होणारें त्यांचें अलौकिक व्यक्तिमत्व आजहि प्रत्येकाला वंदनीय व मार्गदर्शक वाटल्याखेरीज राहणार नाहीं. ज्ञानेश्वरींतील नीतिबोधाच्या प्रकाशांत आजसुद्धां आपण आपलीं कर्तव्यकर्में डोळसपणानें आणि निष्ठेनें करूं शकूं. इतकें सामर्थ्य त्या अमृतवाणीच्या पाठीशीं उभ्या असलेल्या व्यक्तित्वाच्या पोटीं आहे.

अशा थोर व्यक्तित्वाचा हृदयंगम आविष्कार या दृष्टीनेंहि ज्ञानेश्वरीचें मोल फार मोठें आहे. केवळ काव्यदृष्टीनें ज्ञानेश्वरीचा आस्वाद घेणारांच्या मतानेंहि ज्ञानेश्वरी हा 'काव्या रावो ' आहे. श्रेष्ठ तत्त्वज्ञान, थोर व्यक्तित्व व उत्कृष्ट काव्य यांचा अपूर्व मिलाफ म्हणजे ज्ञानेश्वरी ग्रंथ होय. अध्यात्मासारखा प्रतिकूल विषय व टीकालेखनाचें बंधन असें दुहेरी पारतंत्र्य स्वखुषीनें लादून घेऊन उच्च दर्जाचें काव्य ज्ञानेशांनीं निर्माण केलें; हीच त्यांच्या प्रतिभेची अद्भुत किमया होय.

## ज्ञानेश्वरींतील काव्य

विविध कारणांनीं ज्ञानेश्वरीला काव्यत्व प्राप्त झालें आहे. अर्थात् मूळ कारण ज्ञानेशांचें काव्यानुकूल व्यक्तित्व हेंच होय. त्यांचें चरित्र नि चारित्र्य सारेंच अद्‌भुत नि काव्यमय आहे. ज्ञानेशांचा मूळचा पिंडच मुळीं कलावंताचा आहे. भावपूर्ण नि कल्पनातरल वृत्तीमुळें गीतेंतील

तत्त्वज्ञानहि ज्ञानेशांनीं काव्यमय करून टाकलें. त्यांच्या प्रेमळ, हळुवार, कोमल, धीरोदात्त नि कारुण्यपूर्ण अशा व्यक्तित्वाच्या पोटींच त्यांच्या गीताटीकेंतील रसकल्लोळाची निर्मिति झाली आहे. त्या त्या रसाचा आस्वाद घेण्यांत ते स्वतःच रंगून जातात; त्यामुळें त्यांच्या वाणींतहि तोच रस प्रकट होतो. दुसरें असें कीं, जें कांहीं व्यापक, उच्च, उदात्त, भव्य नि रम्य असेल तें सारें काव्यरूपांत परिणत होतें; मग तें भावरूप असेल कीं विचाररूप असेल अगर कृतिरूपहि असेल. हें जर मान्य केलें तर गीताटीकेच्या काव्यत्वाचें आणखी एक कारण स्पष्ट होतें. ज्ञानेशांना जो अध्यात्मविषय, जें पूर्णाद्वैताचें तत्त्वज्ञान सांगावयाचें होते तें इतकें व्यापक नि भव्य, उच्च नि उदात्त होतें कीं, तें आत्मज्ञानच मुळीं स्वतःसिद्ध काव्य होते. त्या विचाराबद्दल ज्ञानेशांना अत्यंत आत्मीयता होती; इतकेंच नव्हे तर, तो विचार ज्यांना सांगावयाचा होता त्या सामान्य लोकांबद्दलहि ज्ञानेशांना अपरंपार जिव्हाळा वाटत होता. 'बांधिलीं सोडित, बुडालीं काढित, आर्तांची सांकडी फेडित ' असेंच त्यांनीं आपलें जीवन व्यतित केलें होतें. आणि त्याच परम कारुणिक बुद्धीनें ज्ञानेशांनीं गीताटीका लिहिली. इतक्या काव्यानुकूल गोष्टी एकत्र झाल्यावर कविहृदयाच्या व्यक्तीनें सहजस्थितींत जे पूर्णोद्गार काढले ते काव्यरूपांत प्रकट होणारच.

## ज्ञानेश्वरांची काव्यदृष्टि

ज्ञानेशांचा काव्यविषयक दृष्टिकोनहि त्यांच्या टीकादृष्टीप्रमाणेंच स्वतंत्र आहे. त्यांच्या काळांत निर्माण झालेल्या लौकिक स्वरूपाच्या काव्यांचें[1] त्यांनीं अनुकरण केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर, भास्कर-नरेंद्रादि महानुभाव कवींनीं संस्कृतमधील पंचमहाकाव्यांचे आदर्श आपल्यापुढें ठेवून कलाविलासाच्या प्रेरणेनें शृंगारप्रधान कथाविषयांचें व कल्पनाप्रधान नि अलंकारमंडित शैलीचें अनुकरण केलें, तसें ज्ञानेशांनीं केलें नाहीं. ज्ञाने-

१ ' देखा काव्यनाटका । जें निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणति क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥' ( अ, १-७ ) असलें गौणस्थान गणेशाच्या रूपकांत ज्ञानेशांनीं लौकिक काव्याला दिलें आहे.

ज्ञांच्या ज्ञानेश्वरींत रसकल्लोळ आहे, कल्पनाविलास आहे, दृष्टांतादि अलंकारांचें वैभव आहे. पण त्या सर्व बाबतींत कुठलाहि सांचा त्यांनीं पत्करला नाहीं. मम्मटविश्वनाथांसारख्या साहित्यशास्त्रकारांच्या काव्यशास्त्रीय चौकटीलाहि त्यांनीं बाजूला सारलें. ही गोष्ट त्यांच्या काव्यनिर्मितीच्या प्रत्यक्ष स्वरूपावरून व विवेचनाच्या ओघांत प्रसंगपरत्वें बोलून दाखविलेल्या काव्यकल्पनांवरून स्पष्ट होते. ज्ञानेश्वर हे नेणते कवि नसून जाणकार साहित्यिक आहेत, हेंहि त्यावरून दिसून येतें. ज्ञानेश्वरीमुळें टीकाग्रंथांचे जुने अभियुक्त आदर्श जसे मागें पडले; तशाच रूढ काव्यकल्पना व काव्याचे जुने नमुनेहि बाजूला सारले गेले आणि मराठींत एक नवी काव्यपरंपराच निर्माण झाली.

काव्याच्या बाबतींतहि ज्ञानेशांची बैठक मूलतः आध्यात्मिकच आहे. 'वाचें बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्त्व। स्पर्शु (जैसा)॥' (अ. १८-३४७) दृष्टांतादाखल लिहिलेल्या या ओवींत ज्ञानेशांनीं आपली काव्यविषयक आध्यात्मिक दृष्टीच व्यक्त केली आहे. पण परतत्त्वविचार रसिकतेनें मांडल्यास काव्याला व पर्यायानें वाणीला 'बरवेपण' (चांगलेपणा) प्राप्त होतें; ही गोष्ट मान्य करण्यांत ज्ञानेशांनीं काव्याचें—लालित्याचें महत्त्वच वर्णिलें आहे. 'तैसें अध्यात्मशास्त्रीं इये। अंतरंगाचि अधिकारिये। परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया' (अ. १८-१७४९) या ओवींतहि वाक्चातुर्याचा—ललितगुणसंपन्न वाणीचा प्रभावच ते सांगत आहेत. आणि लोकांना सुखी, आनंदित करण्याचें सामर्थ्य आपल्या वाणींत आहे, अशी जाणीवहि ठिकठिकाणीं त्यांनीं व्यक्त केली आहे. थोर कलावंतांच्या ठिकाणीं आपल्या प्रतिभासामर्थ्याबद्दलचा जो उदंड आत्मविश्वास असतो, त्याचा प्रत्यय ज्ञानेशांच्या बाबतींतहि आल्याखेरीज रहात नाहीं. सगळीं कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें व निरहंकार वृत्तीनें करावींत; या आपल्या शिकवणुकीप्रमाणें ज्ञानेश्वरांनीं ग्रंथरचनेचें कर्तृत्वहि आपल्या गुरूच्या—श्रीनिवृत्तिनाथांच्या—चरणीं अर्पण केलें आहे. प्रसंगीं त्याचें श्रेय ते आपल्या संत-श्रोत्यांनाहि देऊन टाकतात. पण आपल्या तत्त्वज्ञानाशीं सुसंगत असलेली ही भूमिका कायम ठेवूनहि ज्या वेळेला कलावंताचा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणीं स्फुरण पावतो त्या वेळीं गुरुकृपेच्या बळावरच पण

'बोलीं अरूपाचें रूप' दाखवीन; अमूर्ताला मूर्त स्वरूपांत उभें करीन; इंद्रियातीत अशा अनुभवालाहि इंद्रियांच्या कक्षेंत आणीन;' (५–३६) किंवा देशी भाषेच्या क्षेत्रांत साहित्यसुवर्णाच्या खाणी उघडीन; रत्नांचे आगर, भावार्थाचा डोंगर आणि रसांचा सागर मराठी भाषेंत निर्माण करीन ( ६–१६ ) अशा तऱ्हेचे प्रतिज्ञोद्गार ज्ञानेशांकडून निघतात. 'आपल्या वाग्विलासाच्या विस्तारानें साऱ्या मराठी विश्वांत गीतार्थ भरून टाकून, त्या ब्रह्मविद्येचा मराठीच्या नगरांत सुकाळ करण्याची आणि साऱ्या जगाला आत्मानंदाचा अनुभव आणून देण्याची' (५–४३) ज्ञानेशांची प्रतिज्ञा ज्ञानेश्वरीनें सफल केली; याबद्दल आतां काळानेंच ग्वाही देऊन टाकली आहे. जगांतील अक्षर वाङ्मयांत मराठीचें प्रतिनिधित्व करूं शकणाऱ्या ग्रंथांत ज्ञानेशांची ज्ञानेश्वरीच अग्रेसर ठरेल यांत बिलकुल शंका नाहीं.

तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र या बाबतींतील मौलिकत्वाबरोबरच साहित्याच्या क्षेत्रांतहि ज्ञानेशांनीं आपलें पृथगात्मकत्व सिद्ध केलें आहे. पंडिती थाटाच्या भाष्यकारांची वादकुशल व तर्ककर्कश पद्धति सोडून रसाळ नि सालंकार भाषेंत भावबळानें अर्थ समजून देण्याची नवी टीका-पद्धति त्यांनीं अवलंबिली. त्याचप्रमाणें तेराव्या शतकांतील साहित्यशास्त्र लक्षांत घेतां व्युत्पत्ति, व्याकरण, अलंकार व शृंगारवीरकरुणादि लौकिक रस यांना महत्त्व देणाऱ्या काव्यदृष्टीला बाजूला सारून ज्ञानेशांनीं स्वतंत्र काव्यदृष्टीचा अगदीं जाणीवपूर्वक पुरस्कार केला. रूढ काव्यशास्त्रांतील अष्टरसात्मक व्यवस्थेंत न बसणाऱ्या शांत, भक्ति नि वत्सल या रस-त्रिपुटीचा ज्ञानेशांनीं आपल्या ग्रंथांत आदर केला आहे; त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. 'या गीताटीकेंत मी केवळ शांतरसात्मक असें निरूपण करीत आहे, पण तें इतकें सरस आहे कीं, रसराज शृंगाराच्याहि माथ्यावर पाय ठेवील' (५–३१ ) हा आत्मविश्वास ज्ञानेश्वरीनें सार्थ करून दाखविला म्हणून त्याला फार महत्त्व आहे. इतरत्रैहि त्यांनीं अशाच शब्दांत

---

१ देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिणें । वोविया होती लेणें । साहित्यासी ( अ. १०–४२ )

आपल्या ग्रंथाबद्दलचा योग्य अभिमान व्यक्त केला आहे. ' **शांतोदात्त भक्ति** ' या उपेक्षित रसत्रिपुटीला मराठी साहित्यांत बरचें स्थान मिळवून देण्यांत ज्ञानेशांच्या साहित्यविषयक दृष्टिकोणाचें वेगळेपणच सिद्ध होतें. कल्पनाविलासाच्या बाबतींत किंवा अलंकारयोजनेच्या बाबतींतहि ज्ञानेशांनीं महानुभाव कवींप्रमाणें रूढ पद्धतींचें अनुकरण न करतां आपल्या उत्कट वृत्तींचा आविष्कार करण्याची अगदीं अभिनव पद्धति अवलंबिली आहे; यांतच ज्ञानेशांचें कविकुलगुरुत्वाचें मोठेपण सामावलेलें आहे.

## ज्ञानेश्वरींतील रसकल्लोळ

मूळ गीतेंत रसोत्कर्षाचे प्रसंग अगदीं कमी आहेत. तरी देखील आपल्या उत्कट भावनांना अनुसरून वाव मिळेल तिथें रसकल्लोळाची संधि ज्ञानेशांनीं साधली आहे. व्यक्ति, प्रसंग यांचीं यथार्थ चित्रें रेखाटतांना तो तो भाव अत्यंत उत्कटत्वानें वर्णन करून ज्ञानेश्वर रसनिर्मिति करतात. या कामीं गीतेच्या संवादात्मक स्वरूपाचा योग्य उपयोग त्यांनीं करून घेतला आहे. गीतेंतील धृतराष्ट्र-संजय, कृष्ण-अर्जुन या व्यक्तींचे स्वभावविशेष व त्यांच्यांतील भावनात्मक संबंध लक्षांत घेऊन ज्ञानेशांनीं त्यांच्या व्यक्तिरेखा गीतेपेक्षांहि अधिक सुस्पष्ट रेखाटल्या आहेत. कृष्णार्जुन संवादांतून ब्रह्मरसाचा लाभ आपल्याला घडत आहे म्हणून आनंदित झालेला संजय आणि पुत्रमोहामुळें त्या आनंदाला पारखा झालेला धृतराष्ट्र यांच्यांतील संवाद ( ५–१–८ ) या दृष्टीनें पाहाण्यासारखा आहे. एका लहानशा कल्पित प्रसंगाच्या द्वारां ज्ञानेशांनीं या दोन्ही व्यक्ति आपल्या डोळ्यांपुढें उभ्या केल्या आहेत. तसेंच कृष्णार्जुनप्रेमभावाचें उत्कट दर्शन घडवतील असेहि प्रसंग कल्पनेनेंच ज्ञानेशांनीं निर्मिले आहेत. अशा प्रसंगीं कृष्णाच्या भूमिकेशीं पूर्णतया समरस होऊन ज्ञानेश्वर लिहूं लागतात, तेव्हां कृष्णाचें व्यक्तिचित्र हें जणूं कांहीं त्यांचें स्वतःचेंच चित्र असल्यासारखें भासतें. समर्पक विशेषणांचा उपयोग करून त्या त्या स्वभावविशेषांनीं युक्त अशा व्यक्तीला सगुण, साकार करण्याची ज्ञानेशांची पद्धति मोठी आकर्षक आहे...." जो निर्मळु । निष्कळु लोककृपाळु...धर्मकीर्ति धवळु...प्रणत प्रतिपाळु......भक्तजनवत्सलु । प्रेमजन प्रांजळु " ( १९–४४–४८ ) अशा शब्दांत वैकुंठीच्या

कृष्णजीचें ते वर्णन करतात, त्या वेळीं भक्तांचा कैवारी अशा त्या श्रीकृष्णाची मूर्ति मनश्चक्षूंपुढें उभी रहातेच रहाते. तसेंच, 'मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ या ओवीपासून पुढील पांचसात ओव्या वाचतांना खरोखरच कृष्णार्जुनांच्या दृढालिंगनाचा तो प्रसंग ( २१-३१-३८ ) आपण पहातों आहोंत, असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. या व्यक्तिचित्रांबरोबर ज्ञानेशांनीं कांहीं ठिकाणीं स्वतःच्या गुरूचे ( श्रीनिवृत्तिनाथांचें ) व आपलें स्वतःचेंहि व्यक्तिचित्र कुणाचेंहि मन वेधून घेईल अशा रीतीनें रेखाटलें आहे. विशेषतः निरनिराळ्या अध्यायांचे प्रस्ताव या दृष्टीनें उल्लेखनीय वाटतात. ' ग्रंथरचनेच्या कामांत आपण अनभिज्ञ असून श्रीगुरूंनीं कृपा केली तरच हें काम तडीस जाईल;' अशी पुन्हां पुन्हां विनवणी करणारा विनम्र वृत्तीचा शिष्य आणि त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याला धीर देत असलेला प्रेमळ गुरु असें चित्र ज्ञानेश्वरी वाचतांना अनेकदां आपल्यापुढें उभें रहातें. ( १-२८-२९; ६-२३-२४; ७-३२-३३ ).

त्याप्रमाणेंच अवतीभोंवतीच्या समाजांतील सुष्टदुष्टांचीं चित्रेंहि प्रसंगपरत्वें ज्ञानेश्वरींत रेखाटलीं गेलीं आहेत. एकदोन, एकदोन ओव्यांतच ज्ञानेशांनीं वैदिक, कर्मठ किंवा याज्ञिक यांचीं चित्रें काढलीं आहेत; तीं वरील कल्पित चित्रांपेक्षां देखील अधिक उठावदार व ठसठशीत अशीं वाटतात. ( ८-५, १२, १३; ) शब्दांच्या सहाय्यानें अशीं व्यक्तिचित्रें डोळ्यांपुढें उभीं केलीं जातात; हेंच ' बोलीं अरूपाचें रूप दावीन' असें प्रतिज्ञित झालेलें ज्ञानेशांचें प्रतिभासामर्थ्य होय. नाटकाप्रमाणें काव्यांतहि स्वगत भाषणांच्या द्वारां व्यक्तीला साकार करतां येतें. आसुरी प्रकृतीच्या पुढाऱ्याचें चित्र रेखाटतांना ज्ञानेशांनीं याच नाट्यात्मक पद्धतीचा अवलंब केला आहे. "आजवर अनेकांची मालमत्ता हिरावून घेऊन मी धन्य झालों आहे. याच संपत्तीच्या बळावर आणखी संपत्ती मिळवून विश्वांतील सर्व धनाचा मालक मीच होईन. सर्वांना मारून मीच या भोगभूमीचा-पृथ्वीचा स्वामी व चराचराचा ईश्वर बनेन. इंद्र देखील माझ्यापुढें क्षुद्र आहे. मी म्हणेन तसें घडून येईल. काळहि माझ्यापुढें दुबळा ठरेल. संपन्नतेच्या बाबतींत कुबेरहि माझी

बरोबरी करूं शकणार नाहीं. माझ्या कुळाचा प्रभाव आणि माझा गोतावळा यांच्यापुढें प्रत्यक्ष ब्रम्हदेवसुद्धां हलका ठरतो; ईश्वरादि नांवें माझ्यापुढें व्यर्थ आहेत. कारण ' नाहीं मजसीं सरी पावे । ऐसे कोण्ही ।।' इ. ( ११-३१-४५ ) यासारखी आत्मप्रौढीची भाषा बोलणारी व्यक्ति मूर्तिमंत अहंकाराच्या रूपांत आपल्यापुढें उभी रहाते. कामक्रोधांच्या रूपकात्मक वर्णनाच्या वेळीं श्रीकृष्णाच्या तोंडीं ज्ञानेशांनीं अशीच ओजोगुणपूर्ण नाट्यात्मक भाषा घातली आहे. उदा०-हे ज्ञाननिधींचे भुजंग । विषयदरींचे वाघ ।...हे देहदुर्गीचें धोंड, किंवा 'हे जळेवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।......' इ० ( १२-५-९; २०-२३; )

व्यक्तिचित्रांच्या बरोबरीनेंच परिणामकारक अशीं प्रसंगचित्रें वा दृश्यें रेखाटण्यांतहि ज्ञानेशांची लेखणी अगदीं सिद्धहस्त आहे. ' जेथ अमरत्व हेंचि सिंहासन ' या चरणानें सुरू झालेलें स्वर्गीय सौख्यांचें वर्णन ( ८-२५-३२ ) हा अशा शब्दचित्राचा एक उत्कृष्ट नमुना होय. मायेच्या प्रभावाचें रूपकात्मक वर्णन वाचतांना तर एखाद्या महापुराचें दृश्य आपण पहात आहोंत अशीच भावना आपली होत जाते. “ जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळकलनेचेनि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तींचीं तुंगें । तटें सांडी ।। जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरलेली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांची ” ( १३-३-४ ) या दोन ओव्या वाचतांना ' मुसळधार पाऊस कोसळत आहे आणि महापुरानें बेफाम झालेल्या नदीचें पाणी दोहों बाजूंना सारखें पसरत जाऊन त्याखालीं लहानमोठीं गांवें बुडून जात आहेत. ' असें भयानक दृश्य आपल्या नजरेला भेडसावूं लागतें. मायानदीचा हा सबंध भागच ज्ञानेशांच्या वर्णनकौशल्याचे दृष्टीनें मोठा उल्लेखनीय आहे. सांग रूपकाच्या योजनेंतील कौशल्य व त्यामुळें वर्णनाला येणारा उठावदारपणा याचें उत्कृष्ट उदाहरण 'कामक्रोधाच्या दुवाडपणांत'हि पहावयास मिळतें. ' साध्वी शांति नागविली । माया मांगी शृंगारिली !'...या प्रकारच्या ओव्यांनीं सहृदयाच्या मनावर होणारा अपेक्षित परिणामच वर्णनाच्या यशस्वितेचा पुरावा होय.

भक्ताचा महिमा वर्णन करीत असतांना श्रीकृष्णाच्या तोंडीं घातलेले उद्‌गार वरीलपेक्षां निराळ्या वृत्तीचे दर्शक आहेत. भिन्नभिन्न प्रकारच्या

भावप्रदर्शनाला साजेशी भाषा ज्ञानेश्वर कशी योजतात हें त्यावरून लक्षांत येईल. " अशा त्या भक्तश्रेष्ठाला आम्ही मस्तकावर मुकुट म्हणून धारण करूं. त्याची लाथहि भूषण म्हणून आमच्या छातीवर झेलूं. त्याला पहावें अशा अनिवार इच्छेमुळेंच अचक्षू असा मी डोळस बनलों. त्याच्या आलिंगनासाठीं म्हणून चतुर्भुज झालों. त्याच्या सहवासासाठींच विदेही असूनहि मी सदेह झालों. " ( १९-२५-२९ ) अशा प्रकारें आपलें भक्तवात्सल्य प्रकट करणारा श्रीकृष्ण आणि कामक्रोधांचें दुवाडपण वर्णन करणारा श्रीकृष्ण प्रसंगानुसार कोमल किंवा कठोर भाषा कशी योजतो हें पहाण्यासारखें आहे. अभेदभक्तीच्या वर्णनाचे वेळीं दोन भक्त एकमेकांना भेटले म्हणजे तिथें अद्वैत सुखाची कशी परमावधि होते याचें वर्णन अगदीं हळुवारपणानें ज्ञानेश्वर करतात. त्या ठिकाणीं ज्ञानेशांच्या शैलींतील रसवत्तेचा परमोत्कर्ष झालेला दिसून येतो. दोघांचींहि चित्तें मद्रूपच झाल्यानें जवळचीं दोन सरोवरें एकमेकांला भेटावींत तसा प्रकार त्यावेळीं होतो. त्यांच्यांत पाण्याच्या दृष्टीनें फरक कांहींच नाहीं. फक्त पाण्याच्या उचंबळून येण्यामुळें कल्लोळांनीं कल्लोळालाच भूषवावें तसाच प्रकार या भक्तांच्या संवादसुखाबाबत घडतो. ( तेथ बोधाची लेणीं । बोधेंचि मिरवी. ) सामरस्याचे प्रयागक्षेत्र बनलेले ते भक्त साऱ्या जगांत माझें संकीर्तन करतात. संकीर्तन करतां-करतांच संकीर्तनालाहि विसरतात आणि त्या विस्मृतीमध्येंच 'जीवें आंगें' विरून जातात. ( १८-१७-२५ ) ऐक्यभावाचें असलें उत्कट वर्णन ज्ञानेश्वरच करूं जाणोत; ज्ञानेश्वरीखेरीज इतरत्र तें आढळणार नाहीं.

शब्दातीत अशा अनुभवालाहि शब्दस्वरूप देऊन तो अनुभव रसरूपानें वाचकाच्या ठिकाणीं संक्रमित करावयाचा हें विलक्षण सामर्थ्य ज्ञानेशांच्या प्रतिभेमध्यें होतें. म्हणूनच तो तो भाग वाचीत असतां रसिकाचें अन्तःकरण भक्तिरसानें, शांतरसानें किंवा वात्सल्यानें तुडुंब भरून जातें. ज्ञानेशांचीं मंगलाचरणें हीं तर उत्कृष्ट भावकाव्यें होत. गुरुभक्तीचा जिव्हाळा प्रत्येक शब्दांशब्दांत प्रतीत होतो ( उतारा १ व ६ ). त्याचप्रमाणें श्रोत्यांबद्दलचा ज्ञानेशांचा प्रेमादरहि बालकाच्या भूमिकेनें उच्चारलेल्या लडिवाळ बोलांतून अगदीं ओसंडून बाहेर येतो. ( उतारा ७ ) या प्रकारच्या रसवत्तेमुळेंच ज्ञानेश्वरीला काव्यत्व प्राप्त झालें आहे. शांतरस हा

ज्ञानेश्वरीचा मुख्य गाभा होय. ज्ञानेश्वरीचें अंतरंग भाक्ति, शांत आणि वत्सल रसात्मक असून तिचा बाह्य साज उदात्त रसाचा आहे. ' श्रवणामार्जी आयता मोक्ष ' आणून देणारें वाक्चातुर्य हें ज्ञानेश्वरीचें बाह्यवैभव आहे. निसर्गातील भव्य वस्तूंच्या उपमादृष्टांतांनीं ' उदात्त ' रसाची सजावट ज्ञानेश्वरीला लाभली आहे. ज्ञानेशांच्या अमृतमधुर वाणीची अमृतमयता अशा ठिकाणींच अनुभवास येते.

## ज्ञानेश्वरींतील कल्पनाविलासाचें स्वरूप

अमूर्ताला मूर्तत्व देण्याच्या कामीं ज्ञानेशांच्या कल्पकतेनें फार मोठें सहाय्य केलें आहे. त्यांच्या कल्पकतेनें निर्माण केलेली अलंकारसृष्टि वैपुल्यानें, विविधतेनें व नाविन्यानें इतकी संपन्न आहे, कीं केवळ या अलंकारांमुळेंच ज्ञानेश्वरीला काव्यत्व प्राप्त झालें; असा भ्रम निर्माण होतो आणि ज्ञानेश्वरींतील रसवत्तेकडे दुर्लक्ष होतें. ज्ञानेश्वरींत उपमादृष्टान्तांची आणि रूपकउत्प्रेक्षांची नुसती रेलचेल आहे. कांहीं ठिकाणीं व्यतिरेक, असंगति, विरोधाभास, विषम इत्यादि अलंकारांचाहि यथोचित उपयोग ज्ञानेशांनीं केला आहे. यमकानुप्रासांसारखे शब्दालंकारहि विवेचनाच्या ओघांत सहजगत्या आले असले तरी त्यांची योजना परिणामाच्या दृष्टीनें सहेतुकपणें केली आहे. क्वचित् प्रसंगीं एखादा कोटिक्रम लढवितांना श्लेषाचाहि उपयोग ज्ञानेश्वर करतात असें आढळून येतें. या साऱ्या अलंकारांची मोजदाद येथें करणें, म्हणजे हिऱ्याच्या खाणींत जाऊन एक, दोन, तीन अशीं बोटें घालण्यासारखेंच हास्यास्पद ठरेल. ज्ञानेश्वरीचें कुठलेंहि पान उघडलें कीं, या अलंकारवैभवानें डोळे दिपून गेल्याखेरीज रहात नाहींत. सरस व समर्पक उपमा-दृष्टान्त देण्यांत आणि भव्योदात्त रूपकें उभारण्यांत ज्ञानेशांची बरोबरी कोणीही करूं शकणार नाहीं. तत्त्वज्ञानाच्या परिभाषेंतील किंवा काव्यसंकेतांतील ठराविक उपमानें घेऊन त्यांची अभिनव योजना करण्यांत ज्ञानेश्वर कुशल आहेत. तर निसर्ग व लोकव्यवहार यांवर आधारलेल्या मालोपमा, सांगरूपकें आणि उत्प्रेक्षा-व्यतिरेकादि अलंकार यांतूनच ज्ञानेशांचा कल्पनाविलास प्रकट झाला आहे. त्यांच्या अलंकारयोजनेंत अलंकारप्रकार कमी असले तरी विषयाची विविधता पुष्कळ आहे. यच्चयावत् चराचर सृष्टि, लौकिक आचार, सामाजिक समजुती व नानाविध संकेत हीं सर्व उपमान-विषय

म्हणून या कामीं ज्ञानेशांनीं उपयोगिलीं आहेत; त्यामुळें त्यांच्या अलंकारसृष्टीचें महत्त्व काव्याप्रमाणेंच समाजशास्त्रदृष्ट्याहि फार आहे. एका दृष्टान्तानें लौकिक सृष्टींतील एखादें बरेंवाईट चित्र ते डोळ्यांपुढें उभें करतात; म्हणून त्यांची अलंकारसृष्टि तत्कालीन समाजस्थितीच्या दृष्टीनें मोठी बोलकी आहे. यादवकालीन परिस्थितीचें सर्वांगीण चित्र ज्ञानेश्वरींतील अलंकारांच्या पारदर्शक आरशांतून स्पष्ट पहातां येतें.

## ज्ञानेश्वरांची भाषाशैली

ज्ञानेश्वरीमध्यें भाषाप्रौढी, भाषासौष्ठव आणि भाषाविलास ह्या तिन्हींचेंहि सारखेंच दर्शन होतें. 'दाऊं वेल्हाळे देशीं नवी। जे साहित्याते वोजावी। अमृतातें चुकी ठेवी। गोडिसपणें'। या प्रतिज्ञोत्तरांत भाषाप्रभुत्वाबद्दलचा जो अभिमान ज्ञानेशांनीं व्यक्त केला आहे तो अगदीं सार्थ आहे. कोंवळिक दुणावणारें किंवा अमृताला कमीपणा आणणारें माधुर्य खरेंच ज्ञानेशांच्या वाणींत आहे. याची प्रचीति आणून देण्यास त्यांची प्रत्येक ओवी समर्थ आहे. ज्ञानेशांच्या वृत्तींतील लोकोत्तर प्रेमळपणा माधुर्याच्या रूपानें त्यांच्या वाणींत प्रकटला आहे. आपल्या ठिकाणच्या या गुणाचें वर्णनहि अत्यंत कल्पकतेनें व नाजुकतेनें ज्ञानेशांनीं केलें आहे. (४-१५-२२) ज्ञानेश्वर म्हणतात—"या शब्दांच्या कोमलपणापुढें नादाचा कोमलपणा नि सुस्वरतेचे नाना प्रकारहि अपुरे पडतील. सुगंधाची मुग्ध मधुरताहि फिकी पडेल. या शब्दांमध्यें एवढी रसवत्ता आहे कीं, कानाला देखील जिभा फुटतील आणि खरोखर श्रवणांचा विषय असलेला हा शब्द आपलाहि विषय आहे, या भावनेनें साऱ्या इंद्रियांमध्येंच भांडण जुंपेल. पण लहानसें सूर्यबिंब जसें साऱ्या जगाला जागृत करतें, त्याप्रमाणें हा शब्दही साऱ्या इंद्रियांचें समाधान करील." (५-१५-२०) शब्दसामर्थ्याचें असें वर्णन करणाऱ्या ज्ञानेशांनीं खऱ्या कलावंताप्रमाणें नाद, रूप, गंध, रस, स्पर्श, या साऱ्या सौंदर्यविषयांची महति ओळखली होती. म्हणूनच कवीचें साधन किंवा माध्यम जो शब्द त्या शब्दाला 'समर्थ' करावयाचें झाल्यास हे पांचहि गुणधर्म त्याच्या ठिकाणीं असले पाहिजेत; अशीच त्यांची भावना दिसते. आणि खरोखरच त्यांनीं म्हटल्याप्रमाणें, ज्ञानेशांच्या शब्दांमध्यें या पांच गुणांचा प्रत्यय रसिकाला आल्याखेरीज रहात नाहीं.

अर्थगौरव नि पदलालित्य या दोहोंचा मिलाफ ज्ञानेशांच्या भाषेमध्यें झाला आहे. समुद्राहून 'सखोल व अर्थभरित' असे हे 'मऱ्हाठे बोल' असल्याचा दावा ज्ञानेश्वरी वाणीनें खरा करून दाखविला आहे. वेंचक शब्दांत विपुल अर्थ व्यक्त करण्याची हातोटी ज्ञानेश्वरांमध्यें आहे. 'अर्थ बोलाची वाट पाहे। तेथ अभिप्रावो अभिप्रायातेंचि विये।' हेंच ज्ञानेशांबाबत खरें आहे. अर्थगौरवाबरोबरच शब्दांच्या नादगुणाकडे, रंगरूपाकडे लक्ष देऊनच ज्ञानेशांनीं एकेक शब्द निवडला आहे. शब्दाशब्दांत प्रेमळपणा, नादमाधुर्य व रंगसौंदर्य हीं एकवटलीं आहेत. सौकुमार्य व कांतिमत्त्व या गुणांमुळें त्यांचा प्रत्येक शब्द एखाद्या टपोऱ्या मोत्याप्रमाणें किंवा विकसित कुसुमाप्रमाणें पाहाणाराला हर्षभरित केल्याखेरीज रहात नाहीं. ज्ञानेशांच्या ओवीची घडण अगदीं घोटीव व सुटसुटीत आहे. वेंचक शब्दांच्या निवडीनें आपल्या अर्थपूर्ण ओवीला त्यांनीं नादमधुर बनविल्यामुळें 'वोविया होतीं लेणें। साहित्यासी॥' ही ज्ञानेशांची प्रतिज्ञा सिद्धीस गेली आहे.

## ज्ञानेश्वरीच्या रसास्वादाची पद्धति

मात्र कोणत्या विवक्षित पद्धतीनें या ग्रंथाचा आस्वाद घ्यावा यासंबंधीं ज्ञानेशांनीं स्वतःच मार्गदर्शन केलें आहे. त्याकडे लक्ष देऊनच रसिकांनीं या अमृतवाणींतील काव्याची गोडी चाखली पाहिजे. नाहींतर ज्ञानेश्वर म्हणतात त्याप्रमाणें मुक्या-बहिऱ्याच्या गोष्टीसारखें होईल. (एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकया बहिरयाची) 'गीता गौरवांत' ज्ञानेश्वर लिहितात कीं, श्रोत्यांनीं 'अतिहळुवारपण चित्ता। आणुनियां।' 'अनुभवावी हे कथा।' शरद् ऋतूंत चांदण्यांतून अमृतस्राव होतो आणि त्या अमृतस्रावी चंद्रकिरणांवर चकोरपक्षी जगतात; असा कविसंकेत आहे. त्याचाच उपयोग करून आस्वादाच्या हळुवारपणाची आपली कल्पना ज्ञानेश्वर स्पष्ट करीत आहेत. तीवरून ज्ञानेशांच्या कविहृदयाची ओळख पटेल. आदर्श रसिकाबद्दलची त्यांची कल्पनाहि समजून येईल. शरद् ऋतूंतील चांदण्याचे कोंवळे अमृतकण चकोराचीं पिलें ज्या हळुवारपणानें टिपून घेतात, तशा मवाळ (मृदु) अन्तःकरणानें रसिकांनीं गीतेंतील हृदयगम्य तत्त्वज्ञान समजून घेतलें पाहिजे; असा ज्ञानेशांचा

अभिप्राय आहे. याचसारखे आणखी दोन दृष्टांत ज्ञानेश्वर देतात. कमलाच्या पाकळ्यांना कळूंहि न देतां कमळांतील परागकण घेऊन भ्रमर हलक्या पावलानें निघून जातात; तशी या ग्रंथाच्या आस्वादाची पद्धति आहे. भ्रमरांच्या हळुवारपणानें श्रोत्यांनीं गीताग्रंथाचा आस्वाद घ्यावा; असें ज्ञानेशांना येथें सुचवावयाचें आहे. तिसरा दृष्टांत कुमुदिनी-चंद्राचा आहे. त्यांत श्रोत्यांकडून गंभीर वृत्तीची व एकनिष्ठेची अपेक्षा केली आहे. चंद्रविकासी कमलिनी आपलें स्थान न सोडतां, आपल्या जागेवरूनच चंद्राच्या प्रेमाचा आस्वाद घेते. या प्रेमप्रकारांत तिची स्थिरवृत्ति व प्रेमविषयासंबंधींची निष्ठा जशी दिसून येते; त्याप्रमाणेंच रसिकांनीं आपल्या चंचल मनाला स्थिर करून आणि स्वैर वृत्तींना एकनिष्ठ बनवून गीतेचा आस्वाद घ्यावा; असें ज्ञानेश्वर सांगतात. ( ३-७-१२ ) गीतेप्रमाणेंच ज्ञानेश्वरी कशी आस्वादावी हें ज्ञानेशांनीं सहाव्या अध्यायाच्या प्रस्तावामध्यें सांगितलें आहे. गीतेच्या आस्वादपद्धतींतील हळुवारपणाची व इंद्रियातीतपणाचीच येथें अपेक्षा आहे. इंद्रियांना कळूंहि न देतां आत्मज्ञानाच्या प्रकाशांतच मोक्षरूप पक्वान्नाची मेजवानी झोडायची असल्यानें नुसत्या श्रवणानें येथें भागणार नाहीं. कान इथें दुबळे आहेत. तें त्यांचें दौर्बल्य टाकून मनाच्या अंतर्मुखतेनेंच या मेजवानीचा आस्वाद घेतला पाहिजे. शब्दांचें वरवरचें आच्छादन दूर करून स्वत: ब्रह्मरूप होऊनच ब्रह्मसुखाचा आस्वाद घ्यावयाचा आहे. स्वत: सुख होऊनच सुखाचा अनुभव घेण्यासाठीं रसिकाचें अन्त:करण अति मृदु नि कल्पनातरल असलें पाहिजे. आदर्श रसिकाच्या मनोवृत्तीची ही कल्पना केवढी उदात्त आहे ! ह्या उदात्त कल्पनेला अनुसरूनच ज्ञानेशांनीं आस्वाद योग्यतेचा दंडक येथें सांगून टाकला आहे. चकोरच चंद्राचें महत्त्व ओळखतो, कावळ्याला त्याचें कांहींच महत्त्व नाहीं. त्याप्रमाणें ' प्राकृत म्हणजे अज्ञानी जे आहेत त्यांना हा ग्रंथ समजणार नाहीं. ' अधिकारी श्रोत्यांखेरीज अध्यात्मज्ञानाच्या या मेजवानींत दुसऱ्या कोणाला बसतां येणार नाहीं; असें स्पष्ट त्यांनीं म्हटलें आहे. हळुवारपणाशीं पूर्ण फारकत झालेल्या कल्पनाशून्य नि भावनाहीन अशा ' राठ ' अन्त:करणाचे आपण असूं; तर ज्ञानेशांच्या अमृतवाणीचा आस्वाद आपण घेऊं शकणार

नाहीं. त्याप्रमाणेंच केवळ इंद्रियसुखांच्या मागें लागल्यानें निष्काम बुद्धीशीं आपली पूर्ण फारकत होऊन अतींद्रिय अशा ध्येयांची ओळखहि आपल्याला नसेल; तर ज्ञानेशांच्या अमृतवाणीचा आस्वाद घेण्याला आपण अपात्र ठरूं. तेव्हां आपण कुठल्या कोटींत बसतों हें ज्याचें त्यानें स्वतःशीं ठरवूनच मग ज्ञानेशांच्या अमृतवाणीकडे वळलेलें बरें !

'महाभारताची प्रशंसा' (उतारा २) करतांना उत्कृष्ट ग्रंथासंबंधाची जी कल्पना ज्ञानेशांनीं मांडली आहे, त्या कसोटीला उतरणारा असाच ज्ञानेश्वरी हा ग्रंथ आहे. तेव्हां आदर्श ग्रंथाच्या आस्वादासाठीं अधिकारी सहृदयाची अपेक्षा असणें अगदीं वाजवी आहे. महाभारतप्रशंसेवरून महाभारताबद्दल ज्ञानेशांना वाटणारा आत्यंतिक आदर दिसून येतो; त्याप्रमाणेंच उत्कृष्ट साहित्याबद्दलची ज्ञानेशांची उच्चोदात्त कल्पनाहि स्पष्ट होते. ज्ञानेश्वर हे असामान्य प्रतिभेचे कवि तर आहेतच; पण अव्वल दर्जाचे रसिक नि चिकित्सक टीकाकार आहेत; हेंहि यावरून स्पष्ट होतें. ज्ञानेश्वरांसारख्या चिकित्सक व रसिक टीकाकारानें ज्या शब्दांत महाभारताचा गौरव केला आहे; तेच पुढील शब्द त्यांच्या भावार्थदीपिकेलाहि यथार्थतेनें लागू पडतात—

ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्न भांडार । शारदेचें ॥......
म्हणोनि हा 'काव्यांरावो' । ग्रंथ गुरुवतीचा ठावो ।
एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥
तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक
आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥
एथ चातुर्य शहाणें झालें । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥

इतक्या विशेषांनीं युक्त असलेल्या या ज्ञानेश्वरी ग्रंथांतील ज्ञानेशांची वाणी मराठी साहित्याच्या व महाराष्ट्र समाजाच्या दृष्टीनें 'अमृतवाणी' न ठरली तरच नवल !

---

# १ मंगलाचरण

जयजय देव निर्मळ[१] । निजजनाखिलमंगळ ।
जन्मजराजलदजाळ-। प्रभंजन ॥ १

जयजय देव प्रबळ । विदळितामंगळकुळ ।
निगमागमद्रुमफळ । फळप्रद ॥ २

जयजय देव सकळ । विगतविषयवत्सल ।
कलितकाळकौतूहल । कलातीत ॥ ३

जयजय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदबहळ ।
नित्यनिरस्ताखिलमळ[२] । मूळभूत ॥ ४

जयजय देव स्वप्रभ । जगदंबुदगर्भनभ ।
भुवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वंस ॥ ५

जयजय देव निश्चळ । चलितचित्तपानतुंदिल ।
जगदुन्मीलनाविरल-। केलिप्रिय ॥ *६

जयजय देव विशुद्ध । विदुदयोद्यानद्विरद ।
शमदममदनमदभेद । दयार्णव ॥ ७

जयजय देवैकरूप[३] । अतिकृतकंदर्पसर्पदर्प ।
भक्तभावभुवनदीप । तापापह ॥ ८

जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय ।
निजजन[४]जित भजनीय । मायागम्य ॥ ९

---

१ निर्मला. (राजवाडे प्रतींत सर्वत्र ळ ऐवजीं ल असून १ ते ५ ओव्यांतील सर्व विशेषणें आकारान्त आहेत. उदा.-निर्मला, मंगला, प्रबला इ.) २ निरस्ताखिलामंगला. * कांहीं प्रतींत सहावी ओवी चौथी आहे. ३ देवेकरूप (भिडे). ४ निजजय.

जयजय–देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो[5] ।
स्वसंविद्[6]द्रुमबीजप्ररो–। हणावनी ॥ १०

हें काय एकैक ऐसैसें । नानापरिभाषावशें ।
स्तोत्र करूं तुजोद्देशें[7] । निर्विशेषा ॥ ११

जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें ।
हें जाणें मी म्हणोनि लाजें । वानणां इहीं ॥ १२

परी मर्यादेचा सागरु । हा तंवचि तया डगरु ।
जंव न[8] देखे सुधाकरु । उदया आला ॥ १३

सोमकांतु निजनिर्झरीं । चंद्रा अर्घ्यादिक न करी ।
तें तोचि अवधारीं । करवी कीं जी ॥ १४

नेणों कैसी वसंतसंगें । अवचितिया वृक्षाचीं[9] अंगें ।
फुटती तैं तयांहि जोगें । धरणें नोहे ॥ १५

पद्मिनी रविकिरण । लाहे मग लाजे कवण ।
कां जळें शिवतलें लवण । आंग भुले ॥ १६

तैसा तूंतें जेथ मी स्मरें । तेथ मीपण[10] मी[10] विसरें ।
मग जाकळिला ढेंकरें । तृप्तु जैसा ॥ १७

मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण धाडूनि[11] देशें ।
स्तुतिमिषेंच[12] पां पिसें । बांधलें वाचे ॥ १८

ना एऱ्हवीं तरी आठवीं । राहोनि स्तुति जैं करावी ।
तैं गुणागुणिया धरावी । सरोभरी कीं ॥ १९

---

५ अकल्पनाप्य. ६ स्वसंविद्रुम. ७ तुज दोसें (रा. भिडे). ८ नेदखे. ९ आर्डाचि. १० मालातिले जें. ११ दवडूनि. १२ स्तुतिमिषें पांचपिसें (दांडेकर).

तरी[१३] तूं जी एकरसाचें लिंग । केवीं करूं गुणागुणीं विभाग ।
मोतीं फोडोनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ॥ २०
आणि तूं बापु तूंचि माये । इहीं बोलीं ना स्तुति होये ।
डिंभोपाधिक आहे । विटाळु तेथें ॥ २१
जी जालेनि पाइकें आलें । तें गोसावीपण केवीं बोलें ।
ऐसें उपाधी उशिटलें । काइ वानूं ॥ २२
तरी आत्मा तूं एकसरा । हेंही म्हणतां[१४] दातारा ।
आंतुल[१५] तूं बाहेरा । घापतासी ॥ २३
म्हणूनि[१६] साचा तुजलागीं । स्तुती न देखें[१७] जी जगीं ।
मौनावांचूनि[१६] लेणें आंगीं । सुसीना मा ॥ २४
स्तुती कांहीं न बोलणें । पूजा कांहीं न करणें ।
सन्निधीं कांहीं न होणें । तुझां ठायीं ॥ २५
तरी जितलें जैसें भुली । पिसें आलापु[१८] घाली ।
तैसें वानूं तें माउली । उपसाहें तूं ॥ २६
आतां गीतार्थाची मुक्तमुदी[१९] । लावीं माझिये वाग्वृद्धि[२०] ।
जें माने हे सभासदीं । सज्जनांचां ॥ २७
येथ म्हणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुढतपुढती ।
परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ॥ २८
तंव विनवी[२१] ज्ञानदेवो[२२] । म्हणे हो कां जी पसावो ।
तरी अवधान देतु देवो[२२] । ग्रंथा आतां ॥ २९

(अ. १८-१-२९)

---

१३ तरि, परि यांसारखे शब्द राजवाडे प्रतींत सर्वत्र ऱ्हस्वच आहेत. १४ म्हणों जातां. १५ आंतौनि बाहिरा. १६ म्हणूनि, वांचूनि या सारखे शब्द म्हणौनि, वांचौनि असे आढळतात. १७ नेदखे (दांडेकर) पाठभेद क्रमांक आठशीं तुलना करा. १८ आलव. १९ मुदी. २० वागुरिद्धी. २१ विनवितु. २२ वो ऐवजीं ओ.

# २ महाभारत-प्रशंसा

आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां[१] जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ १

ना तरी सर्व सुखांची आदि । जे प्रमेयमहानिधि ।
नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण[२] हे ॥ २

कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्रजातां वसौट[३] । अशेषांचें ॥ ३

ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ४

नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं ।
आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ५

म्हणोनि हा[४] काव्यां रावो[४] । ग्रंथ गुरुत्वतीचा ठावो ।
एथूनि रसां झाला आवो[५] । रसाळपणाचा ॥ ६

तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक[६] ।
आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥ ७

एथ चातुर्य शहाणें झालें । प्रमेय[७] रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ८

माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता ।
रूढपण उचितां । दिसे भलें ॥ ९

---

१ कलाकौतुकां ( रा. ) सकळ कथां ( कुंटे ). २ परिपुर्णु हे (उकारान्त पाठ राजवाडे प्रतींत विशेष आढळतात.) ३ वसैठ ( रा. ) वसिष्ठ ( दांडेकर ).
४ महाकाव्याराउ ५ आहो. ६ भली शास्त्रिक. ७ प्रेम.

एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा ।
म्हणऊनि जन्मेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ १०
आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळीक ।
गुणां सगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥ ११
भानुचेनि तेजें धवळलें[८] । जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें ।
तैसें व्यासमती कवळलें । मिरवे विश्व[९] ॥ १२
कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें ।
तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ १३
ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरची[१०] होईजे ।
तैसें व्यासोक्तितेजें । धवळित सकळ ॥ १४
कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ १५
ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ[११] वनशोभेची खाणी उघडे ।
आदिलापासोनि अपाडें । जियापरी ॥ १६
नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण ।
मग अळंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥ १७
तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें ।
तें जाणोनि काय[१२] आश्रयिलें । इतिहासीं ॥ १८
नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं ।
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ १९
म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं ।
येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ २०
ऐसी सुरस जगीं कथा । ते जन्मभूमि परमार्था ।
मुनि सांगे नृपनाथा । जन्मेजया ॥ २१
जे अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम ।
परम मंगलधाम । अवधारिजो ॥ २२

(अ. १—२८-४९.)

---

८ ढवलले. ९ सकल मिरवे॥ १० नागराचि (दांडेकर). ११ तें. १२ काई.

# ३ गीता-गौरव

आतां भारतीं[1] कमळपरागु । गीताख्यु प्रसंगु ।
जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसी ॥ १

ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथिलेया व्यासबुद्धि
निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ २

मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलें विवेकें ।
पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ ३

जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा[2] अनुभविजे संतीं ।
सोहंभावें पारंगती । रमिजे जेथ ॥ ४

जें आकर्णिजे भक्तीं । जें [3] आदिवंद्य त्रिजगतीं ।
तें भीष्मपर्वीं संगती । सांगिजैल ॥ ५

जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे ।
जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ॥ ६

जैसें शारदीयेचें चंद्रकळे-। माजीं अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळें[4] । चकोरतलगें ॥ ७

तियापरी श्रोता । अनुभवावी हे कथा ।
अतिहळुवारपण चित्ता । आणुनियां ॥ ८

हे शब्देंविण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ९

---

१ भारतकमल परागु. २-३ × (अशी फुली म्हणजे हे शब्द राजवाडे प्रतींत नाहींत.) ४ मौआलें.

जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें+[5] नेणती ।
तैसी परी आहे सेवितीं । ग्रंथीं इये ॥ १०
कां आपुला ठावो न सांडिता । आलिंगिजे चंद्रु प्रगटतां ।
हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥ ११
ऐसेनि गंभीरपणें । थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिला तोचि जाणे । मानूं[6] इये ॥ १२

(अ. १—५०–६१).

× × × ×

एवं सकळसांख्यसिंधु । श्रीभगवद्गीताप्रबंधु ।
हा औदार्यें आगळा वेदु । मूर्तु जाण ॥ १३
वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं ।
जे कानीं लागला तिहीं । वर्णांचाचि[7] ॥ १४
येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां ।
अनवसरु मांडूनियां । राहिला[8] आहे[8] ॥ १५
तरी मज पाहतां[9] तें मागील उणें । फेडावया गीतापणें ।
वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ १६
नव्हे अर्थें रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं ।
जपमिषें[10] वदनीं । वसोनिया ॥ १७
गीतेचा पाठु जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें ।
गीता लिहोनि वाहाणें । पुस्तकमिषें[10] ॥ १८
ऐसैसा मिसकटा । संसाराचां चोहटां[11] ।
गवादी[12] घालीत[12] चोखटा । मोक्षसुखाची ॥ १९

---

५ + नेला. ६ मातु. ७ 'च्या' ऐवजीं 'चा' असेंच रूप सर्वत्र आढळतें. ८ असे नव्हे. ९ पातां. १० मिखें. ११ चौहटा. १२ गवांदी घातली.

परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया ।
रविदीप्ती राहाटावया । आवारु नभ[13] ॥ २०

तेवीं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंहीं न पुसे ।
कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ २१

यालागीं मागिली कुटी । भ्याला[14] वेदु गीतेचां पोटीं ।
रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ २२

म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त[15] जाण श्रीगीता ।
श्रीकृष्णें पांडुसुता । उपदेशिली ॥ २३

परी वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोद्देशें[16]
जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण[17] ॥ २४

चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसिं धांवे ।
तेथ चराचर आघवें । निवालें जेवीं ॥ २५

कां अनन्यगतिकमळा-। लागीं सूर्य ये वेळोवेळा ।
कीं सुखिया होइजे डोळां । त्रिभुवनींचां ॥ २६

तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें ।
संसारायेवढें[18] थोर ओझें[19] । फेडिलें जगाचें ॥ २७

(अ. १८--१४५६-७०).

× × × ×

म्हणौनि मज कांहीं । समर्थनीं आतां विषो नाहीं ।
गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥ २८

---

१३ जैसें. १४ बिहाला. १५ मूर्ति. १६ घरा दोसें. १७ तैसे विश्वा ॥
१८ एसणें. १९ वोझें.

शास्त्र वाच्यें अर्थे फळें । मग आपण मावळे ।
तैसें नव्हे हें सगळें[२०] । परब्रह्मचि[२१] ॥ २९
कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद[२२] सोपा[२३] ।
अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ॥ ३०
चकोराचेनि निमित्तें । तिन्ही भुवनें संततें ।
निववीली कळावंतें । चंद्रें[२४] जेवीं[२४] ॥ ३१
कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळज्वरितादोषें ।
पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥ ३२
तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें ।
दुभीनलीं जगापुरतें । श्रीकृष्णगाय ॥ ३३
येथें जीवें जरी नाहाल । तरी होंचि कीर होआल ।
नातरी पाठमिषें तिंबाल[२५] । जीभचि जरी ॥ ३४
तरी लोह एके अंशें । झगटलिया परिसें ।
येरीकडे आपैसें । सुवर्ण होय ॥ ३५
तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठीं ।
तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ॥ ३६
ना येणेसीं तोंड वांकडे । करूनि ठाकाल कानवडें ।
तरी कानींही घेतां पडे । तेंचि लेख ॥ ३७
जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें ।
जैसा समर्थ[२६] दाता कोणातें । नास्ति न म्हणे[२७] ॥ ३८
म्हणौनि जाणातया[२८] सवा । गीताचि येकी सेवा ।
काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ॥ ३९

(अ. १८—१६८४–९९).

---

२० समूळें. २१ परमतत्व चि. २२ महा आनंदु. २३ सोहपा. २४ जिया परीं ॥ २५ तीमाल. २६ स्थूल. २७ म्हणैल. २८ जिया तिया.

# ४ व्यासाचा मागोवा

आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली[१] जे निराळीं ।
ते श्रीव्यासें केली[२] करतळीं । घेवों ये ऐसी ॥ १

बाळकातें वोरसें । माय जैं जेवऊं बैसे ।
तैं[३] तया ठाकती तैसे । घांस करी ॥ २

कां अफाटा समीरणा । आपैतेपण[४] शाहाणा[४] ।
केले जैसे विंजणा । निर्मूनियां ॥ ३

तैसें शब्दें जे न लभे । तें घडुनियां अनुष्टुभें ।
स्त्रीशूद्रादि प्रतिभें । सामाविलें ॥ ४

स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें ।
तरी अंगीं सुंदराचिये । का शोभते तें ॥ ५

नादु वाद्या न येतां । तरी कां गोचरु होता ।
फुलें न होतां घेपता । आमोदु केवीं ॥ ६

गोडी न[५] होतीं पक्वान्नें । तरी कां फावती रसने ।
दर्पणावीण नयनें । नयनु का दिसे ॥ ७

द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं ।
तरी काह्या उपास्ती । आकळता तो ॥ ८

तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात ।
न होती तरी कोणा येथ । फावों शकतें ॥ ९

मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे ।
कां उमप तें नोहे । ठाकतें कोण्हा ॥ १०

---

१ केली. २ दाविली. ३ तेव्हलिं. ४ आपैतेपणेंसि आणा. ५ नव्हती.

आणि वाचा जें न पवे । तें हे श्लोक न होते बरवे ।
तरी कानें मुखें फावे । ऐसे कां होते ॥ ११

म्हणौनि व्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु ।
श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ १२

आणि तोचि[6] हा मी आतां । व्यासाचीं पदें पाहतां पाहतां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ १३

व्यासादिकांचे उन्मेख । राहाटती जेथ साशंक ।
तेथ मीही रंक येक । वाचाळी करीं ॥ १४

परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा ।
तरी माझीया दूर्वादळा । ना न म्हणे कीं ॥ १५

आणि क्षीरसिंधूचिया[7] तटा । पाणिया येती गजघटा[8] ।
तेथ काय मुरकुटा । वारिजतसे ॥ १६

पांख[9] फुटे पाखिरूं । [10]नुडे तरी नभींच थिरू ।
[10]गगन क्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ[10] ॥ १७

राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया[11] शाहाणें[11] ।
[12]आणिकें काय कोणें । चालावेंचिना[12] ॥ १८

जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें ।
चुळीं[13] चूळपणा ऐसें । भरूनि न निघे[13] ॥ १९

दिवियेचां आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी ।
वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ॥ २०

---

६ तो मियां हा आतां। ७ जेया सिंधुतटा ८ घंटा ९ पांखिकुटें १० गगनीं नुडे तरि काइ करु । नभ क्रमुनि थोरु । गरुडु देखैं ॥ ११ चालावें कवणें । १२ तरि आणिकिं हीं कुंटेपणें । चालावें लागे ॥ (रा.) १२ चूळु चूळ्ळु पाणी ऐसें । घेउनि निघे ॥

जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे ।
थिल्लरीं थिल्लराऐसें । बिंबेचि पैं ॥ २१

तेवीं व्यासादिक महामती । वावरों येती इये ग्रंथीं ।
मा आम्ही ठाकों हे युक्ती[14] । न[14] मिळे कीर ॥ २२

जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें ।
तेथ देखों शफरें येरें । पोहों लाहती[15] ॥ २३

अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे ।
मा भूतळींची न देखे । मुंगी काई ॥ २४

यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता ।
म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ २५

आणि बापु पुढां जाये । [16]ते घेत पाउलाची सोये[16] ।
[16]बाळ ये तरी न लाहे । पावों कायी[16] ॥ २६

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट[17] पुसतु ।
अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ॥ २७

(अ. १८—१६९६-१७०२).

---

१४ युगुति । निमले चि कीर ॥ १५ पव्हों न ल्हांति ॥ १६ देखा उचलतां पायें । आणि बालक हलू हलू ये । तरि तें न पवों काई ॥
१७ × (रा.)

# ५ ज्ञानेशांचें प्रतिज्ञोत्तर

**मग रायातें** म्हणे संजयो । तोचि अभिप्रावो अवधारिजो ।
**कृष्ण सांगती** जो । योगरूप ॥ १

**सहजें ब्रह्मरसाचें** पारणें[1] । केलें अर्जुनालागीं नारायणें ।
**कीं तोचि** अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही ॥ २

**कैसी दैवाची** थोरी नेणिजे । जैसें तान्हेलिया तोय सेविजे ।
**कीं तेंचि**[2] चवी[2] करूनि[2] पाहिजे । तंव अमृत आहे ॥ ३

**तैसें आम्हां** तुम्हां जाहलें । जें आडमुठीं तत्त्व फावलें ।
**तंव धृतराष्ट्रें** म्हणितलें । हें न पुसों तूंतें ॥ ४

**तया संजया** येणें बोलें । रायाचें हृदय चोजवले ।
**जें अवसरीं** आहे घेतलें । कुमरांचिया ॥ ५

**हें जाणोनि** मनीं हांसिला । म्हणे म्हातारा मोहें नाशिला ।
**एऱ्हवीं बोलु** तरी भला जाहला । अवसरीं ये ॥ ६

**परि तें** तैसें कैसेनि होईल । जात्यंधा कैसें[3] पाहेल ।
**तेवींचि येरु** से घेईल । म्हणोनि बिहे[4] ॥ ७

**परि आपण** चित्तीं आपुला । निकियापरी संतोषला ।
**जे तो संवादु** फावला । कृष्णार्जुनांचा ॥ ८

**तेणें आनंदाचेनि** धालेपणें । साभिप्राय अंतःकरणें ।
**आतां आदरेंसीं** बोलणें । घडेल तया ॥ ९

**तो गीतेमाजि** षष्ठींचा । प्रसंगु असे आयणीचा[5] ।
**जैसा क्षीरार्णवीं** अमृताचा । निवाडु जाहला[6] ॥ १०

---

१ पारणें. २ तें च्यिे विकरुनु. ३ कैंचें. ४ भिए. ५ आणिचा. ६ जाला.

तैसें गीतार्थाचें सार । जें विवेकासिंधूचें पार ।
नाना योगविभवभांडार । उघडलें कां ॥ ११

जें आदिप्रकृतीचें विसवणें । जें शब्दब्रह्मासि न बोलणें ।
जेथूनि गीतावल्लीचें ठाणें । प्ररोहो पावे ॥ १२

तो अध्याय हा सहावा । वरि साहित्याचिया बरवा ।
सांगिजेल म्हणोनि परिसावा । चित्त देउनी ॥ १३

## ' माझा मराठाचि बोलु कौतुकें '

माझा मराठाचि[७] बोलु कौतुकें[८] । परि अमृतातेंही पैजासीं जिंके ।
ऐसी अक्षरें[९] रसिकें । मेळवीन ॥ १४

जियें कोंवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग[१०] थोडे[११] ।
वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ १५

ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होति जिभा ।
बोलें इंद्रिया लागे कळंभा[१२] । एकमेकां ॥ १६

सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा ।
परि रसना म्हणे हा रसु आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७

नवल बोलतीये रेखेची वाहणी ।
देखतां[१३] डोळ्यांही पुरों लागे धणी[१४] ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८

जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें ।
बोलु भुजाही आविष्करें[१५] । आलिंगावयां ॥ १९

---

७ मऱ्हाटा. ८ कवतिकें. ९+ चि. १० तरंग. ११ थोकडे. १२ कलसा.
१३ दावितां. १४ आणि. १५ आशे भरे.

ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं ।
झोंबती परि तो सरिसेपणेंचि बुझावी ।
जैसा एकला जग चेववी । सहस्त्रकरु ॥ २०

तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।
पाहातयां[16] भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१

हें असोतु[17] या बोलाचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरलीं ।
ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥ २२

## 'अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवी'

आतां आत्मप्रभा नीच नवी । तेचि करूनि ठाणदिवी ।
जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि फावे ॥ २३

येथ श्रवणाचेनि पांगे— । वीण श्रोतयां व्हावें लागे ।
हे मनाचेनि निजांगें[18] । भोगिजे गा ॥ २४

आहाच बोलाची वालीफ[19] फेडिजे ।
आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे ।
मग सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचिमाजि[20] ॥ २५

ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाईल ।
एर्‍हीं आघवी गोठी होईल । मुकया[21] बहिरयाची[21] ॥ २६

परी तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें कडसावें ।
जे एथ अधिकारिये स्वभावें । निष्कामकाम[22] ॥ २७

जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची कुरोंडी ।
तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक ॥ २८

---

१६ पाठेयां. १७ असो तेयां. १८ चि आंगें. १९ वालीप. २० तेयामाझि. २१ मूकां बोलेतेयाची. २२ पूर्णकाम.

जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा ग्रंथु हा प्राकृतीं नेणिजे ।
आणि तो हिमांशुचि जेविं खाजे । चकोराचें ॥ २९

तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि अज्ञानासी आन गांवो ।
म्हणोनि बोलावया विषय[२३] पहाहो । विशेषें नाहीं ॥ ३०

परि अनुवादला[२४] मी प्रसंगें । तें सज्जनीं उपसाहावें लागे ।
आतां सांगेन[२५] काय श्रीरंगें । निरोपिलें जें ॥ ३१

तें बुद्धीही कळितां सांकडें । म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे ।
परि निवृत्तिकृपादीप[२६] उजियेडें । देखेन मी ॥ ३२

जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे ।
जरी अतिंद्रिय लाहिजे । ज्ञानबळ[२७] ॥ ३३

ना तरी धातुवादाही[२८] न जोडे । ते लोहींचि पंधरें[२९] सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥ ३४

तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५

तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ३६

(अ. ६—१-३६)

× × × ×

## ‘ वाग्विलास विस्तारूं । गीतार्थें विश्व भरूं ’

एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अभ्रांतमती ।
भीष्मपर्वीं शांती[३०] । म्हणितली कथा ॥ ३७

---

२३ विषो. २४ अनुवादलों. २५ सांघेन. २६ दीप × २७ ज्ञानबळें.
२८ धातुवादिया हीं. २९ पन्हरें. ३० संगती. ( भिडे )

तो कृष्णार्जुनसंवादु । नागरीं बोलीं विशदु ।
सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा ॥ ३८

नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा ।
जे श्रृंगाराचां माथां । पाय[31] ठेवी[32] ॥ ३९

दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेपणें ॥ ४०

बोल वोल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणें ।
रसरंगी[33] भुलवणें । नादु लोपी ॥ ४१

खेचराचियाही मना । आणी सात्त्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ४२

तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थे विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ ४३

फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाची जिणी ।
देखो आवडे ते खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ४४

दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोधसुकाळा— । माजीं विश्व ॥ ४५

हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें ।
जे अधिष्ठिला असें परमदेवें[34] । निवृत्ती मी ॥ ४६

म्हणोनि अक्षरीं सुभेद्रीं । उपमा श्लोक[35] कोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ४७

(अ. १३—११६३-६३)

---

३१ पावो. ३२ ठेविती (दांडेकर). ३३ रसुभंगु. ३४ परदेवे. ३५ [illegible]

# ६ गुरुकृपेचें सामर्थ्य

आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावरजंगमा ।
जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ १

जयाचें आंगिकें[1] अंशिकें[2] । तेज लाहोनि अर्कें ।
आंधाराचें सावाइकें । लोटिजत आहे ॥ २

समुद्रा जयाचे तोय । तोया जयाचें माधुर्य ।
माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥ ३

पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ ।
ज्ञान जेणें उजाळ । चक्रवर्ती ॥ ४

वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास ।
हें असो रूपस । विश्व जेणें ॥ ५

तो सर्वोपकारी समर्थु । सदूगुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥ ६

आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥ ७

श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती ।
तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥ ८

चंदनें वेधलीं झाडें । जाली चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मांडली[3] कीं भांडें । भानूसीं शाटी[4] ॥ ९

---

१ आंगें. २ असिकें. ३ मानिली. ४ काठी ( दांडेकर ) षाठी ( राजवाडे ).

मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ॥ १०
आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तैं न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ॥ ११
म्हणोनि माझे नीचें नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे ।
गुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ १२
(अ. १८-१७२३-२४)

× × × ×

म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझां पाउलीं ।
या कारणें मी साउली । न संडी तुझी ॥ १३
अवो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥ १४
म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ।
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥ १५
नवरसां भरवीं सागरु[६] । करवीं उचित रत्नांचे आगरु ।
भावार्थाचे गिरिवरु । निफजवीं माये ॥ १६
साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवीं देशियेचिया आक्षोणी[७] ।
विवेकवेलीची लावणी । हों देईं सैंव ॥ १७
संवादफळनिधानें । प्रमेयाचीं उद्यानें ।
लावीं म्हणे गहनें । निरंतर ॥ १८
पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वादअव्हांटे ।
कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं ॥ १९

---

५ नित्य ( भिडे ). ६ या ओवींतील चरणान्त राजवाडे प्रतीत उकारान्त नाहींत. ७ क्षोणी. ८ दवडी.

श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें ।
राणिवे बैसवीं श्रोते । श्रवणाचिये ॥ २०

मऱ्हाठियेचां नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणें देणें सुखचिवरी । हों देईं या जगा ॥ २१

तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांधुरविशील सदैवें ।
तरि आतांचि हें आघवें । निर्मीन मायें[10] ॥ २२

इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें गुरू कृपा[11]दृष्टी ।
म्हणे गीतार्थेंसीं उठीं । न बोलें बहु ॥ २३

तेथ जी जी महाप्रसादु । म्हणोनि साविया[12] जाला स्वानंदु ।
आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥ २४

(अ. १२-८-१९)

---

८ चरणिं. ९ वेन्हीं. १० मीं. ११ कृपा×. १२ सवियां.

# ७ श्रोत्यांचा अधिकार

तरी अवधान एकवेळें[१] दीजे। मग सर्वसुखासि पात्र होइजे।
हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड ऐका॥ १

परी प्रौढी न बोलें हो जी। तुम्हां सर्वज्ञांचां समाजीं।
देयावें अवधान हे माझी। विनवणी सलगीची॥ २

कां जे ळळेयांचे ळळे सरती। मनोरथांचे मनौरे[२] पुरती।
जरी माहेरें श्रीमंतें होती। तुम्हांऐसीं॥ ३

तुमचेया दिठिवेयाचिये वोले[३]। सासिन्नले प्रसन्नतेचे मळे।
ते साउली देखोनि लोळें। श्रांतु जी मी॥ ४

प्रभू[४] तुम्ही सुखामृताचे डोहो।
म्हणोनि आम्ही आपुलिया स्वेच्छा वोलावों लाहों।
येथही जरी सलगी करूं बिहों। तरी निवों कें पां॥ ५

नातरी बालक बोबडां बोलीं। कां वांकुडां विचुकां पाउलीं।
तें चोज करूनि माउली। रिझे जेवीं॥ ६

तेवीं तुम्हां संतांचा पढियावो। कैसेनि तरी आम्हांवरी हो।
या बहुवा आळुकिया जी आहों। सलगी करित॥ ७

वांचूनि माझिये बोलतिये योग्यते। सर्वज्ञ भवादृश श्रोते।
काय धड्यावरी सारस्वतें। पढों सिकिजे॥ ८

अवधारां आवडे तेसणा धुंधुरु। परि महातेजीं न मिरवे काय करूं।
अमृताचिया[५] ताटीं वोगरूं। ऐसी रससोय[६] कैचीं ॥ ९ ॥

---

१ एकलें. २ मनोरथ (भिडे). ३ खोले. ४ ×(रा.). ५ अमृताचा (षष्ठयन्त रूपें याकारान्त नाहींत.) ६ रसोयें.

अहो हिमकरासी विंजणें । कीं नादापुढें आइकवणें ।
लेणियासि लेणें । हें कहीं आथी ॥ १०

सांगा परिमळें काय तुरंबावें । सागरें कवणे ठायीं नाहावें ।
हें गगनचि आडे आघवें । ऐसा पवाडु कैंचा ॥ ११

तैसें तुमचें अवधान धाये । आणि तुम्ही म्हणा हें होये ।
ऐसें वक्तृत्व कवणा आहे । [7]जेणें रिझा तुम्ही[7] ॥ १२

तरि विश्वप्रगटितया गभस्ती । हातिवेनि न कीजे आरती ।
कां चुळोदकें अपांपती । अर्घ्यु नेदिजे ॥ १३

प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ति । आणि मी दुबळा अर्चितसें भक्ती
म्हणोनि बेर्ले जऱ्ही गंगावती । तऱ्ही स्वीकाराल कीं ॥ १४

बाळक बापाचिये ताटीं रिगे । रिगौनि[9] बापातेंच जेवऊं लागे ।
कीं तो संतोषलेनि वेगें । मुखचि वोडवी ॥ १५

तैसा मी जरी तुम्हांप्रती । चावटी करीतसें बाळमती ।
तरी तुम्हीं तोषिजे ऐसी जाती । प्रेमाची[10] या ॥ १६

आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें ।तुम्ही संत घेतले असा बहुवे[11]
म्हणोनि केलिये सलगीचा नोहे । आभारु[12] तुम्हां ॥ १७

अहो तान्हयाची लागे झटे । तरी अधिकचि पान्हा फुटे ।
रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि ॥ १८

म्हणऊनि मज लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण निदैलें ।
तें चेइलें हें जी जाणवलें । यालागीं बोलिलों मीं ॥ १९

---

७ विचारिजो ॥ ८ बोलु. ९ आणि (मिडे). १० स्नेहाचि एया ॥
११ बौहें. १२ भारु.

एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणी ।
कीं वारया घापत आहे वाहणी ।
हां हो गगनासि गंवसणी । [१३]घालिजे केवीं[१३] ॥ २०

आइकां पाणी वोथिजावें न लगे ! नवनीतीं माथुला न रिगे ।
तेविं लाजिलें व्याख्यान न निगे । देखोनि जयांतें ॥ २१

हें असो शब्दब्रह्म जिये बाजे । शब्द मावळलेया निवांतु निजे ।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पाडु काई ॥ २२

परि ऐसियाही मज धिंवसा । तो पुढतियाचि येकी आशा ।
जे धिटींवा करूनि भवादृशां । पढियंतया होआवें ॥ २३

परि आतां चंद्रांपासोनि निववितें । जें अमृताहूनि जीववितें ।
तेणें अवधानें कीजे वाढतें । मनोरथा माझिया ॥ २४

कां जैं दिठिवा तुमचा वरुषे । तैं सकळार्थसिद्धि मती पिके ।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके । जरी उदास तुम्ही ॥ २५

सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा ।
तरी दोंदें पेलती अक्षरां । प्रमेयाचीं ॥ २६

अर्थ बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावो अभिप्रायातें विये ।
भावाचा फुलौरा होत जाये । मतिवरी ॥ २७

म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे । तरी हृदयाकाश सारस्वतें वोळे ।
आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥ २८

---

१३ गुंफिजतसे ॥

अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये। परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे।
म्हणऊनि वक्ता तो वक्ताचि नोहे । श्रोतेनविण ॥ २९
परी आतां आमुतें गोड करावें । ऐसें हें तांदुळीं कासया विनवावें
साइखडियानें काई प्रार्थावें । सूत्रधारातें ॥ ३०
काय तो बाहुलियांचिया काजा नाचवी ।
कीं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी ।
म्हणऊनि आम्हां या ठेवाठेवी । काय काज ॥ ३१
तंव गुरु म्हणती काइ जाहले । हें समस्तही आम्हां पावले ।
आतां सांगें जें निरोपिलें । नारायणें ॥ ३२
येथ संतोषोनि निवृत्तिदासें । जी जी म्हणऊनि उल्हासें ।
अवधारां श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ॥ ३३

(अ. ९-१-३३)



# ८ भोगासक्त कर्मठ

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती ।
परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ॥ १

म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादि कर्म[1] कीजे ।
मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ २

एथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि[2] नाहीं ।
ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि तें ॥ ३

देखें कामना[3] अभिभूत । होऊनि कर्में आचरत ।
ते केवळ भोगीं ।चित्त । देऊनियां ॥ ४

क्रियाविशेषें बहुतें । न लोपिती विधीतें ।
निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ॥ ५

परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकामु मनीं धरिती ।
यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ ६

जैसा कर्पूराचा राशि कीजे । मग अग्नि लाऊनि दीजे ।
का मिष्टान्नीं संचरविजे । काळकूट ॥ ७

दैवें[4] अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला ।
तैसा नासिती धर्मु निपजला । हेतुकपणें ॥ ८

सायासें पुण्य अर्जिजे । मग संसारु कां अपेक्षिजे ।
परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ॥ ९

---

१ यजन. २ सुलभ. ३ मना. ४ देखें.

जैसी रांधवणी रससोय[5] निकी । करूनियां मोलें विकी ।
तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्मु ॥ १०

म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा ।
तयां वेदवादरतां । मनीं वसे ॥ ११

(अ. २–२४५-५५)

× × × ×

देख पां गा किरीटी । आश्रमधर्माचिया राहाटी ।
विधिमार्गा कसवटी । जे आपणचि होती ॥ १२

यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुके ।
क्रिया फळेंसि उभी ठाके । पुढां जयां ॥ १३

ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप[6] ।
तींहीं तया पुण्याचेनि नांवें पाप । जोडिलें देखें ॥ १४

जे श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी यज्ञ करूनि ।
यजिलिया मातें चुकोनि । स्वर्गु वरिती[7] ॥ १५

जैसें कल्पतरुतळवटीं । बैसोनि झोळिये पाडी[8] गांठी ।
मग निदैव निघे किरीटी । दैन्यचि करूं ॥ १६

तैसें शतक्रतू यजिलें मातें । कीं ईप्सितातें स्वर्गसुखातें ।
आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ॥ १७

म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्गु । तो अज्ञानाचा पुण्यमार्गु ।
ज्ञानिये तयातें उपसर्गु । हानि म्हणती ॥ १८

एऱ्हवीं तरी नरकीचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख ।
वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरूप माझें ॥ १९

---

५ रसोय. ६ रूप. ७ वरंति. ८ देतसे ( भिडे ).

मज येतां पैं सुभटा । या द्विविधा गा अव्हांटा ।
स्वर्गु नरकु या वाटा । चोरांचिया ॥ २०

स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे ।
मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥ २१

आणि मजचिमाजीं असतां । जेणें मी दूरी[९] होय[९] पांडुसुता ।
तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे[१०] काई ॥ २२

परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरी ते दीक्षित ।
त्यजुनि मातें याचित । स्वर्गभोगु ॥ २३

मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे ।
तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती ॥ २४

जेथ अमरत्व हेंचि सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन ।
राजधानी भुवन[११] । अमरावती ॥ २५

जेथ महासिद्धीचीं भांडारें । अमृताचीं कोठारें ।
जियें गांवीं खिल्लारें[१२] । कामधेनूंची ॥ २६

जेथ वोळगे[१३] देव पाइका । सैंध चिंतामणीचिया भूमिका ।
विनोदवनवाटिका । सुरतरूंचिया ॥ २७

गंधर्वगान गाणीं । जेथ रंभेऐशिया नाचणी ।
उर्वशी मुख्य विलासिनी । अंतौरिया ॥ २८

मदन वोळगे शेजारें । जेथ चंद्र शिंपे सांबरें ।
पवना ऐसें म्हणियारें । धांवणें जेथ ॥ २९

---

९ दुन्हावे. १० झडे. ११ भवन. १२ क्षीरारें. १३ उलिगे.

पैं बृहस्पति+[१४] आपण । ऐसे[१५] स्वर्स्तीश्रियेचे ब्राह्मण ।
ताटियेचे[१६] सुरगण । विकार[१७] जेथें ॥ ३०

लोकपाळरांगेचे । राउत जिये पदीचे ।
उच्चैःश्रवा खांचे । खोलणिये[१८] ॥ ३१

हें बहु असो जे ऐसे । भोग इंद्रसुखाहिसरिसे[१९] ।
ते भोगिजती[२०] जंव असे । पुण्यलेशु ॥ ३२

मग तया पुण्याची पाउटी[२१] सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे ।
आणि येऊं लागती माघारें । मृत्युलोका ॥ ३३

जैसा वेश्याभोगीं[२२] कवडा वेंचे । मग दारही चेपूं न ये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ॥ ३४

एवं थितिया मातें चुकले । जींहीं पुण्यें स्वर्ग कामिले ।
तयां अमरपण तें वावों जालें । आतां मृत्युलोकु ॥ ३५

मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्टेचां दाथरीं ।
उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ॥* ३६

अगा स्वप्नीं निधान फावे । परी चेईलिया हारपे[२३] आघवें[२४] ।
तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञाचें ॥ ३७

अर्जुना वेदविद[२५] जऱ्ही जाहला । तरी मातें नेणतां वायां गेला ।
कणु सांडनि उपाणिला । कोंडा जैसा ॥ ३८

( अ. ९-३०७-३३४ )

---

१४+ मुख्य १५ × १६ भाटियेचे. १७ विकर. १८ मागिलीकडे. १९ ब्रह्मसुखासरिसे. २० भोगीत. २१ पाहूती. २२ भाडिचा. * ही ओवी राजवाडे प्रतींत नाहीं. २३-२४ राहांत पावे. २५ वेदु. (दांडेकर, राजवाडे)

# ९ अज्ञानी भक्त

आणि माझां ठायीं भक्ती[१] । फळालागीं जया आर्ती[२] ।
धनोद्देशें[३] विरक्ती । नटणें जेवीं ॥ १

कां कांताचां मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी ।
राहाटे जारेसीं[४] । जावयालागीं[४] ॥ २

तैसी मातें किरीटी । भजती गा पाउटी ।
करूनि जो दिठी । विषो सूये ॥ ३

आणि भजिन्नलियासवें । तो विषो[५] जरी न पवे ।
तरी सांडी म्हणे आववें । टवाळ हें ॥ ४

कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी ।
आदिलाची परवडी[६] । वरी तया[६] ॥ ५

तया गुरुमार्गा टेंके । जयाचा सुगरवा[७] देखे ।
तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे ॥ ६

प्राणिजातेंसी निष्ठुरु । स्थावरी बहु भरु ।
तेवींचि नाहीं एकसरु । निर्वाहो जया ॥ ७

माझी मूर्ति निफजवी[८] । ते घराचीं कोनीं बैसवी ।
आपण देवो देवी । यात्रे जाय ॥ ८

नीच[९] आराधन माझें । काजीं कुळदेवता भजे ।
'पर्वविशेषें कीजे[१०] । पूजा आना ॥ ९

---

१ भगती. २ आथी. ३ घना दोसें. ४ आणिकेसी । जावेया लागि. ५ विषयो. ६ पिढी । करी तेयांतें ॥ ७ सुगुरुवां. ८ आपजवी. ९ नित्य (भिडे). १० मोजें.

माझें अधिष्ठान घरीं । आणि वोक्से[११] आनाचे करी ।
पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥ १०

एकादशीचां दिवसीं । जेतुला पाडु आम्हांसी ।
तेतुलाचि नागांसी । पंचमीचां दिवशीं ॥ ११

चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये ।
चावदसी म्हणे माये । तुझाच वो दुर्गे ॥ १२

[१२]नित्य नैमित्तिकें कर्मे सांडी[१२] । मग बैसे नवचंडी ।
आदित्यवारीं वाढी । भैरवां पात्रीं[१३] ॥ १३

पाठी सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे ।
ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ १४

ऐसा अखंड भजन करी । उगा नसे[१४] क्षणभरी ।
आघवेनि गांवद्वारीं । अहेव जैसी ॥ १५

तैसेनि जो गा भक्तु । सैरा[१५] देखसी[१५] धांवतु
जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो ॥ १६

(अ. १३—८०७-२२)

---

११ वोसे. १२ नवमोतें मांडी। १३ बहिरवां भरीं. १४ न राहे.
१५ वेखासिं सैरा.

# १० पढिक पंडित

आणि आत्मा गोचरु होये । ऐसी जे विद्या आहे ।
ते आइकोनि डौर वाहे । विद्वांसु जो ॥ १
उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे ।
अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥ २
आत्मचर्चा एकी आथी । ऐसिये बुद्धीची भिंती ।
पाहूनि जयाची मती । वोढाळ जाहली ॥ ३
कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें ।
ज्योतिषीं तो म्हणे । तैसेंचि होय ॥ ४
शिल्पीं अति निपुण । सूपकर्मीही प्रवीण ।
विधि आथर्वण । हातीं आथी ॥ ५
कोकीं नाहीं ठेलें । भारत[१] तरी[२] म्हणितलें ।
आगम आफाविले[३] । मूर्त होती ॥ ६
नीतिजात[४] सुझे । वैद्यकहीं[५] बुझे ।
काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥ ७
स्मृतींची चर्चा । दंशु जाणे गारुडियाचा ।
निघंटु प्रज्ञेचा । पाइकी करी ॥ ८
व्याकरणीं चोखडा । तर्कीं अति गाढा ।
परि एक अध्यात्मज्ञानीं[६] फुडा । जात्यंधु जो ॥ ९
तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं । सिद्धान्तनिर्माणधात्री[७] ।
परी जळो तें मूळनक्षत्रीं[८] । न पाहें गा ॥ १०

---

१-२ भरतु करी. २ कीर (भिडे). ३ उपासिले. ४ जात. ५ वैदिक. ६ आत्मज्ञानी. (भिडे) ७ सिद्धांत निर्वाणसूत्री. ८ 'मूळ' हें नक्षत्रनाम राजवाडे प्रतींत नाहीं.

मोराचां आंगीं असोसें[९] । पिसें आहाति डोळसें ।
परी एकली दिठी नसे । तैसें तें गा ॥ ११

जरी परमाणूएवढें । संजीवनीमूळ जोडे ।
तरी बहु काय गाडे-। भरणें येरें[१०] ॥ १२

आयुष्येंवीण लक्षणें । सिसेंवीण अळंकरणें ।
वोहरेंवीण वाधावणें । तो विटंबु गा ॥ १३

तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण ।
अध्यात्मज्ञानेंविण । एकलेनी ॥ १४

यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाचां ठायीं ।
जया नित्यबोधु[११] नाहीं । शास्त्रमूढा ॥ १५

तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बीं विरूढलें ।
तयाचें व्युत्पन्नत्व[१२] गेलें । अज्ञानवेलीं ॥ १६

तो जें जें बोले । तें अज्ञानाचि फुललें ।
तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञानची गा ॥ १७

आणि अध्यात्मज्ञान कहीं । जेणें मानिलेंचि नाहीं ।
तो ज्ञानार्थु न देखे काई । हे बोलावें असे ॥ १८

ऐलीचि थडी न पवतां । पळे जो माघौता ।
तया पैलद्वीपीची वार्ता । काय होय[१३] ॥ १९

(अ. १३—८२६-४३)

---

९ असोषें. १० केवि. ११ निश्चयबुद्धि. १२ वित्पात्तित्व (दांडेकर).
१३ केवि जाणवे ॥

# ११ आसुरी प्रकृतीचे दीक्षित

(तैसिया) प्रवृत्तिनिवृत्ति दोनी । नेणिजती आसुरीं जनीं ।
आणि शुचित्व[1] स्वप्नीं । न[2] देखती ते ॥ १

काळिमा सांडील कोळसा । वरी चोखी होईल वायसा ।
राक्षसही मांसा । विटों शके ॥ २

परी आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया ।
पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया ॥ ३

वाढविती विधीची आस । कां पाहाती[3] वडिलांची वास ।
आचाराची[4] भाष । नेणतीचि ते ॥ ४

जैसें चरणें शेळियेचें । कां धांवणें वारियाचें ।
जाळणें आगीचें । भलतेउतें ॥ ५

तैसें पुढां सूनि स्वैर[5] । आचरती ते आसुर ।
सत्येंसि वैर । सदाचि तयां ॥ ६

जरी नांगिया आपुलिया । विंचू करी गुदगुलिया[6] ।
तरी साचा बोलिया । बोलती ते ॥ ७

अपानाचेनि तोंडें । जरी सुगंधा येणें घडे ।
तरी सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥ ८

ऐसें ते न करितां कांहीं । आंगेचि वोखटे पाहीं ।
आतां बोलती ते नवाई । सांगिजेल ॥ ९

---

१ शौच. २ नेदरवती. ३ पाहांतां. ४ आचरिजे हे. ५ शरीर.
६ गुतकुलिया.

एऱ्हवीं करेयाचां[७] ठायीं[८] चांग । तें[९] तयासि कैंचें नीट आंग[९]।
[१०]तैसा असुरांचा प्रसंग । प्रसंगें परिस[१०] ॥ १०

उधवणीचें जेवी तोंड । उगळी धुंत्राचे उभड ।
हें जाणिजे तेवीं उघड । सांगों ते बोल ॥ ११

तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो ।
चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेदु ॥ १२

वेदीं अन्यायीं पडे । तो निरयभोगें दंडे ।
सन्यायी तो सुखाडें । स्वर्गीं जिये ॥ १३

ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था ।
इयेतें म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ॥ १४

यज्ञमूढ ठकिले[११] यागीं । देवपिसे प्रतिमालिंगी ।
नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ १५

तेथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळें[१२] ।
हें वांचोनि कें[१३] वेगळें । पुण्य[१४] आहे ॥ १६

ना अशक्तपणें आंगिकें । वेगळवेंटाळीं न टके ।
ऐसा गादिजे वीण[१५] विषयसुखें[१६] । तेंचि पाप ॥ १७

प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें ।
तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं ॥ १८

बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय ।
तरी मासया कां न होय । निसंतान ॥ १९

आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं ।
मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ २०

---

७ कऱ्हेयाचां. ८ खांदु. ९ मग येर काइ आंग । १० परिस जो प्रसंग। प्राप्ती कीं॥ ११ मुसिले. १२ वेगले. १३ नीकें आगलें। १४ शून्य. १५ ×. १६ दुःखें.

तरी पशुपक्षादि जाती । जया मिती नाहीं संतती ।
तयां कोणें प्रतिपत्ती । विवाह केलें ॥ २१

चोरियेचें धन आलें । तरी तें कोणासि विष जालें ।
[16]वालभें परद्वार केलें[16] । कोढी कोणी होय ॥ २२

म्हणोनि देवो गोसावी । तो धर्माधर्मु भोगवी ।
आणि परत्राचां गांवीं । करी तो भोगी ॥ २३

परी परत्र ना देवो । न दिसे म्हणोनि तें वावो ।
आणि कर्ता निमे मा ठावो । भोग्यासि[17] कवणु ॥ २४

येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं ।
तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु श्लाघे ॥ २५

म्हणौनि नरक स्वर्गु । नव्हे पापपुण्यभागु ।
जे दोहीं ठायीं सुखभोगु । कामाचाचि तो ॥ २६

याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में ।
मिळती तेथ जन्मे । आववें जग ॥ २७

आणि जें जें[18] अभिलाषें । स्वार्थालागीं हें पोषें ।
पाठी परस्परें द्वेषें । कामचि नाशी ॥ २८

एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं ।
ऐसें बोलती पाहीं । आसुर ते ॥ २९

आतां असो हें किडाळ । बोली न करूं पघळ ।
सांगतांचि सफोल । होतसे वाचा ॥ ३०

(अ. १६-२८४-३१३)

× × × ×

---

१६ वालभाचिये रती जालें । १७ मा भोगी कोणु ॥ १८ निर्जे.

म्हणे आजि मियां । संपत्ति बहुतेकांचिया ।
आपुलां[19] हातीं[20] केलिया । धन्यु ना मी ॥ ३१

ऐसा श्लाघों जंव जाये । तंव मन आणीकही वाहे ।
सर्वेंचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ॥ ३२

हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें ।
लाभा घेईन उरलें । चराचर हें ॥ ३३

ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया ।
मग दिठी पडे तया । उरों नेदी ॥ ३४

हे मारिले ते वर थोडे । आणीकही साधीन गाढे ।
मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ॥ ३५

माझीं होतील कामारीं । तियेंवांचूनि येरें मारीं ।
किंबहुना चराचरीं । ईश्वरु तो मी ॥ ३६

मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो ।
म्हणोनि इंद्रुही वावो । मातें पाहूनि ॥ ३७

मी मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे ।
कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ॥ ३८

तंवंचि बळिया काळु । जंव न दिसें मी अतुर्बळु[21] ।
सुखाचा कीर निखळु । रासिवा[22] मीचि ॥ ३९

कुबेरु आथिला होये । परी तो नेणे माझी सोये ।
संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही[23] ॥ ४०

---

१९-२० आपुलिया होंतिया. २१ अतुल. २२ राशी चि मीं ॥ २३ श्रीनिवासु.

माझिया कुळाचा उजाळू । कां जातिगोतांचा मेळू ।
पाहतां ब्रह्माही हळू[24] । उणाचि दिसे ॥ ४१

म्हणोनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे[25] ।*
नाहीं मजसीं सरी पावे । ऐसें कोण्ही ॥ ४२

आतां लोपला अभिचारु । त्याचा करीन मी जीर्णोद्धारु ।
प्रतिष्ठीन परमारु[26] । यागवरी ॥ ४३

मातें गाती वानिती । नटनाचें[27] रिझविती ।
तयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ४४

माजिरा अन्नपानीं । प्रमदांचां आलिंगनीं ।
मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकारु[28] ॥ ४५

काय बहु सांगों ऐसें । ते आसुरीप्रकृतीपिसें ।
तुरंबति असोसें । गगनौळें तियें ॥ ४६

(अ. १६–३४८--३६३)

---

२४ अलू. २५ सावें. * हा चरण राजवाडे प्रतींत तिसरा आहे. २६ मरमारु.
२८ नाचें नटें. २९ आनंदकरु.

# १२ कामक्रोधांचें दुवाडपण

तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांचीहि स्थिति भ्रंशे ।
मार्गु सांडुनि अनारिसे । चालत देखों ॥ १

सर्वज्ञुही जे होती । हे उपायहि[१] जाणती ।
तेही परधर्मे व्यभिचरति । कवणें गुणें ॥ २

तंव हृदयकमळआरामु[२] । जो योगियांचा निष्काम[३] कामु ।
तो म्हणतसे पुरुषोत्तमु । सांगेन आइक ॥ ३

तरी हे काम क्रोधु पाहीं । जयांतें कृपेची सांठवण[४] नाहीं ।
हे कृतांताच्या ठायीं । मानिजति ॥ ४

हे ज्ञाननिधीचे भुजंग[५] । विषयदरींचे[६] वाघ ।
भजनमार्गीचे मांग । मारक जे ॥ ५

हे देहदुर्गीचे धोंड । इंद्रियग्रामींचे कोंड ।
यांचें व्यामोहादिक बंड[७] । जगात्ररी ॥ ६

हे रजोगुण मानसाचे । समूळ आसुरियेचे[८] ।
धायपण ययांचें । अविद्या केलें ॥ ७

हे रजाचे कीर जाहले । परी तमासी पढियंते भले ।
तेणें निजपद यां दिधलें । प्रमादमोहो ॥ ८

हे मृत्युच्या नगरीं[९] । मानिजति निकियापरी ।
जे जीविताचे वैरी । म्हणऊनियां ॥ ९

---

१ हेयोपादेयही (भिडे). हेय उपादेय (रा.) २ हृदयकमलरामु. ३ ×. ४ सांटोवा. ५ भूवंग. ६ रानिचे. (रा.) दरांचे (दांडेकर). ७ धवड. ८ ऐसे आसलिचे. ९ हान घरीं.

जयांसि भुकेलियां आमिषा[१०] । हें विश्व न पुरेचि घांसा ।
कुळवाडि यांची आशा । चाळीत[११] असे ॥ १०

कौतुकें कवळितां मुठी । जिये चौदा भुवनें थेंकुटीं ।
तेये भ्रांति तिये धाकुटी । वाल्हीदुल्ही[१२] ॥ ११

जे लोकत्रयाचें भातुकें । खेळतांचि[१३] खाय कवतिकें ।
तिच्या दासीपणाचेनि बिकें । तृष्णा जिये ॥ १२

हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें घेपे दीजे ।
जेणें जग आपुलेनि भोजें । नाचवीत असे ॥ १३

जेणें[१४]सत्याचा भोकसा काढिला । मग अकृत्य[१५] तृणकुटा भरिला ।
तो दंभु+[१६] रूढविला । जगीं इहीं ॥ १४

साध्वी शांति नागविली । मग माया मांगी शृंगारिली ।
तियेकरवीं विटाळविलीं । साधुवृंदें ॥ १५

इहीं विवेकाची त्राय फेडिली । वैराग्याची खाली[१७] काढिली ।
जितया मान मोडिली । उपशमाची ॥ १६

इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले ।
आनंदरोप सांडिलें । उपडूनियां ॥ १७

इहीं बोधाचीं रोपें[१८] लुंचिलीं[१९] । सुखाची लिपि पुसिली ।
जिव्हारीं आगी सूदली । तापत्रयाची ॥ १८

हे आंगा तंव घडलें । जीवींची आथी जडले ।
परी नातुडती गिंवसिले । ब्रह्मादिकां ॥ १९

---

१० आंविसा. ११ चालिजत. १२ म्हणौनि सेर॥ १३ फार करीति. १४ नेणसि. १५ असत्य ( कुंटे ). १६ + नव्हे. १७ खाल (रा.) साल. १८-१९ चोपि लूसिली.

हे चैतन्याचे शेजारी । वसती ज्ञानाच्या एका हारीं ।
म्हणोनि प्रवर्तले महामारी । सांवरती ना ॥ २०

हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।
न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ २१

हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती ।
ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥ २२

हे चिखलेंवीण रोंविती । पाशिकेंवीण गोंविती ।
हे कवणाजोगें[२०] न होती । आंतौटेपणें[२१] ॥ २३

(अ. ३-२३२-३३; २३९-४९)

---

२० कोण्हा हीं जोगे. २१ आंतुवटपणें.

# १३ मायानदीची दुस्तरता

आतां महदादि[१] हे माझी माया। उतरोनियां धनंजया।
मी होइजे हें आया। कैसेनि ये॥ १

जिये ब्रह्माचळाचां आवाडां। पाहिलिया संकल्पजळाचा उभडा।
सवेंचि महाभूतांचा बुडबुडा। साना आला॥ २

जे सृष्टिविस्ताराचेनि[२] वोवें। चढत काळकलनेचेनि[३] वेगें।
प्रवृत्तिनिवृत्तीचीं तुंगें। तटें सांडी॥ ३

जे गुणघनाचेनि वृष्टिभरें। भरली मोहाचेनि महापूरें।
घेऊनि जात नगरें। यमनियमांची॥ ४

जे द्वेषाचां आवर्ती दाटत। मत्सराचे वळसे[४] पडत।
माजी प्रमदादि[५] तळपत[५]। महामीन॥ ५

जेथ प्रपंचाची वळणें। कर्माकर्मांचीं वोभाणें।
वरी तरताती वोसाणें। सुखदुःखांची॥ ६

रतीचिया बेटा। आदळती कामाचिया लाटा।
जेथ जीवफेन संघाटा। सेंघ[६] दिसे॥ ७

अहंकाराचिया चळिया। वरि मदत्रयाचिया उकळिया।
जेथ विषयोर्मीच्या आकळिया[७]। उल्हाळे घेती॥ ८

उदोअस्ताचे लोंढे। पाडीत जन्ममृत्युचे चोंढे।
जेथ पांचभौतिक बुडबुडे। होती जाती॥ ९

---

१ महानदी. २ संचाराचेनि. ३ कलांचेनि. ४ हकरे. ५ प्रमादादि तलपु अंत.
६ सीघ. ७ कलिया.

संमोह विभ्रम[८] मासे। गिळित धैर्याचीं आविसें[९]।
तेथ देव्हडे भोंवत वळसे। अज्ञानाचे॥ १०

भ्रांतीचेनि खडुळें। रेवले आस्थेचे अवगाळे।
रजोगुणाचेनि खळाळें। स्वर्गु गाजे॥ ११

तमाचे धारसे वाड[१०]। सत्त्वाचें स्थिरपण जाड।
किंबहुना हे दुवाड। मायानदी॥ १२

पैं पुनरावृत्तीचेनि उभडें। झळंबती सत्यलोकींचे हुडे।
घायें गडबडती धोंडे। ब्रह्मगोळकाचे॥ १३

तया पाणियाचेनि वहिलेपणें। अज्ञुनी न धरिती वोभाणें।
ऐसा मायापूर हा कवणें। तरिजेल गा॥ १४

येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणोपावो।
तो तो अपावो। होय तें ऐक॥ १५×

एक स्वयंबुद्धीचां बाहीं। रिगाले तयांची शुद्धीचि नाहीं।
एक जाणिवेचां डोहीं। गर्वोचे गिळिले॥ १६

एकीं वेदत्रयाचिया[११] सांगडी। घेतलिया अहंभावाचिया धोंडी।
ते मदमीनाचां तोंडीं। सगळेचि गेले॥ १७

एकीं वयसेचें जाड बांधलें। मग मन्मथाचिये कासे लागले।
ते विषयमगरीं सांडिले। चघळुनियां॥ १८

आतां वार्धक्याच्या[१२] तरंगा—। माजीं मतिभ्रंशाचा जरंगा।
तेणें कवळिजताति पैं गा। चहूंकडे॥ १९

---

८ भ्रम. ९ आमिषें ( भिडे ). १० काढ. × ही ओवी राजवाडे प्रतींत नाहीं. ११ विद्येचिया. १२ वृद्धाप्याचिया ( दांडेकर ).

आणि शोकाचां कडा उपडत । क्रोधाचां[13] आवर्ती दाटत ।
आपदागिधीं चुंबिजत । उधवला ठायीं ॥ २०

मग दु:खाचेनि बरबटें बोंबले । पाठीं मरणाचिये रेवे रेवले ।
ऐसे कामाचिये कांसे लागले । ते गेले वायां ॥ २१

एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं ।
ते स्वर्गसुखाचां कपाटीं । शिरकोनि[14] ठेले ॥ २२

एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा ।
परि ते पडिले वळसां । विधिनिषेधांचां[15] ॥ २३

जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे ।
वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपायें तो ॥ २४

ऐसें जीवाचिये आंगवणें । इये मायानदीचें उतरणें ।
हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥ २५

जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसि दुर्जनाची बुद्धि ।
कीं रागी सांडी रिद्धी[16] । आली सांती ॥ २६

जरी चोरां सभा दाटे । अथवा मीना गळु घोटे ।
ना तरी भेडा उलटे । विवसी जरी ॥ २७

पाडस वागुर करांडी । जरी मुंगी मेरु वोलांडी ।
तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥ २८

म्हणऊन गा पंडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता ।
तैसी मायामय हे सरिता । न तरवे[17] जीवां ॥ २९

———

१३ रोगाचा. १४ भरोनि. १५ विधिबोधाचा. १६ सिद्धी. १७ टके.

# १४ ‘नाहीं श्रुतीपरौती माउली जगा’

याकारणें पैं बापा। जया आथी आपली कृपा।
तेणें वेदांचिया निरोपा। आन न कीजे॥ १

पतीचिया मता[1]।अनुसरोनि पतिव्रता।
अनायासें आत्महिता। भेटेचि ते॥ २

नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना।
शिष्य आत्मभुवना-। माजी पैसे॥ ३

हें असो आपुला ठेवा। हाता आथी जरी यावा।
तरी आदरें जेवीं दिवा। पुढां कीजे॥ ४

तैसा अशेषांही पुरुषार्थां। जो गोसावी हों म्हणे पार्था।
तेणें श्रुतिस्मृति माथां। बैसणें घापे॥ ५

शास्त्र म्हणेल सांडावें। तें राज्यही तृण मानावें।
जें घेववी तें न म्हणावें। विषही विरुद्ध[2]॥ ६

ऐसिया वेदैकनिष्ठा। जालिया जरी सुभटा।
तरी कें आहे अनिष्टा। भेटणें गा॥ ७

पैं अहितापासूनि काढिती। हित देउनी वाढविती।
नाहीं श्रुतीपरौती। माउली जगा[3]॥ ८

म्हणौनि ब्रह्मेंसी मेळवी। तंव हे कोणें न संडावी।
अगा तुवांही ऐसीचि भजावी। विशेषेंसी॥ ९

जे आजि अर्जुना तूं येथें। करावया सत्य[4] शास्त्रें सार्थें।
जन्मलासि बळार्थें। धर्माचेनि॥ १०

---

१ मता. २ वीद्ध. ३ जगीं. ४ × (रा.).

**आणि** धर्मानुज हें ऐसें । ओवेंचि[५] आलें आपैसें ।
**म्हणौनि** अनारिसें । करूं नये ॥ ११

**कार्याकार्यविवेकीं** । शास्त्रेंचि करावीं पारखीं ।
**अकृत्य** कुडें तें लोकीं । वाळावें गा ॥ १२

**मग** कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपलेनि आंगें ।
**आचरौनि** आदरें चांगें । सारावें गा ॥ १३

**जे विश्वप्रामाण्याची** मुदी । आजि तुझां हातीं असे सुबुद्धी ।
**लोकसंग्रहासि** त्रिशुद्धी । योग्यु होसी ॥ १४

( अ. १६–४५५–६८ )

× × × ×

**जरी** वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ।
**तऱ्ही** आपण हित आपुलें । तेंचि घेपे ॥ १५

**जैसा प्रगटलिया** गभस्ती । अशेषही मार्ग दिसती ।
**तरी** तेतुलेही काय चालिजती । सांगें मज ॥ १६

**कां** उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ ।
**तरी आपण** घेपे केवळ । आर्तीचजोगें ॥ १७

**तैसे** ज्ञानीये जे होती । ते वेदार्थातें विवरिती[६] ।
**मग** अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत[७] जें ॥ १८

( अ. २–२६०–६३ )

---

५ **बोवेंचि** ( दांडेकर-राजवाडे ). ६ विचारिति. ७ ससार.

# १५ अश्वत्थ वृक्षाचें उत्पाटन

एवं तुज अलौकिकु । हा अधोर्ध्वशाखु[१] ।
सांगितला भवरुखु । ऊर्ध्वमूलु ॥ १

आणि अधींचीं हीं मूळें । उपपत्तीं[२] परिसविलीं[३] सविवळें[४] ।
आतां परिस उन्मळे । कैसेनि हा ॥ २

परी तुझां हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी ।
जे एवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ॥ ३

कें ब्रह्मयाचां शेवटवरी । उर्ध्व शाखांची थोरी ।
आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥ ४

हा स्थावराही तळीं । फांकत असे अधींचां डाळीं ।
माजी धांवतसे दुजां मूळीं । मनुष्यरूपीं ॥ ५

ऐसा गाढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु ।
तरी झणीं[५] हा हळुवटु । धरिसी भावो ॥ ६

परी हा उन्मूळावया दोषें[६] । येथ सायासचि कायिसे ।
काय बाळा बागुल देशें । दवडावा[७] आहे[८] ॥ ७

गंधर्वदुर्ग कायीं[९] पाडावे । काय शशविषाण मोडावें ।
होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ॥ ८

तैसा संसारु हा वीरा । रूख नाहीं साचोकारा ।
मा उन्मळणीं दरारा । कायिसा तरी ॥ ९

---

१ अधोर्ध. २ उपरति. ३ दाविलीं. ४ बळें (कुंटे). ५ झने. ६ दोखें.
७-८ देव्हडा वाहे. ९ कां न.

आम्हीं सांगितली जे परी । मूळडाळांची[१०] उजरी ।
ते वांझेचि घरभरीं । लेंकुरें[११] जशीं ॥ १०

काय कीजती चेहलेपणीं । स्वप्नींची तियें बोलणीं ।
तैशी जाण ते काहाणी । दुगळीचि[१२] ते ॥ ११

वांचूनि आम्ही निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें ।
आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥ १२×

तरी कोणाचेनि संतानें । निपजती या उन्मूळणें ।
काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ॥ १३×

म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें[१३] रूप तें माया[१३] ।
कासवीचेनि तुपें राया । वोगरिलें [१४]जैसें ॥ १४

मृगजळाचीं गा तळीं । तियें दिठी दुरूनिचि न्याहाळीं ।
वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई ॥ १५

मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें ।
म्हणोनि संसाररुख सत्य[१५] कें । वावोचि गा ॥ १६

आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजे[१६] जें कांहीं ।
तेंहीं साचचि पाहीं । परी येकी ॥ १७

तरी प्रबोधु जंव नोहे । तंव निद्रे काय आंतु आहे ।
[१७]कीं रात्री न सरे तंव न पाहे[१७] । तया आरौतें ॥ १८

तैसा जंव पार्था । विवेकु नुधवी माथा ।
तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या ॥ १९

---

१० डाहालांची. ११ लेकुरुवें. १२ दुबलेयाची. × ह्या ओव्या राजवाडे प्रतींत नाहींत. १३ वानिली ते रूपमाया. १४ ×. १५ सतिकें. १६ वाखाणिजे. १७ कीं राति सरैल पाहे ।

वाजतें वारें निवांत। जंव न राहे जेथिंचें तेथ।
तंव तरंगता अनंत म्हणावीचि कीं ॥ २०×

म्हणौनि सूर्य जै हारपे। तैं मृगजळाभासु लोपे।
कां प्रभा जाय दीपें। मालवलेनि ॥ २१×

तैसें मूळ अविद्या खाये। तें ज्ञान जै उभें होये।
तैंचि यया अंतु आहे। एऱ्हवीं नाहीं ॥ २२×

तेंवींचि हा अनादी। ऐसी आथी शाब्दी।
तो आलु[18] नोहे नुरोधी[19]। बोल[20] तया ॥ २३

जे संसारवृक्षाचां ठायीं। साचोकारा तंव नाहीं।
मा नाहीं तया आदि काई। कोण होईल ॥ २४×

जो साच जेथूनि उपजे। तयातें आदि हें साजे।
आतां नाहीचि तो म्हणिजे। कोठूनियां ॥ २५×

म्हणौनि जन्मे ना आहे। तैसिया सांगो कवण माये।
यालागीं नाहीपणेंचि होये। अनादि हा ॥ २६

वांझेचिया लेका। कैंची जन्मपत्रिका।
नभीं निळी भूमिका। कें कल्पूं पां ॥* २७

व्योम कुसुमाचा पांडवा। कवणें देंठ तोडावा।
म्हणौनि नाहीं ऐसिया भवा। आदि कैंची ॥ २८

जैसें घटाचें नाहींपण। असतचि असे केलेनिवीण।
तैसा समूळ वृक्षु जाण। अनादि हा ॥ २९

अर्जुना ऐसेनि पाहीं। आद्यंतु ययासि नाहीं।
माजीं स्थिती आभासे कांहीं। परी टवाळ ते गा ॥ ३०

---

१८ आलुकी. १९ अनुरोधी (भिडे) २० बोलातें एया. * २७ ते ३९ व × अशी फुली असलेल्या ओव्या राजवाडे प्रतींत नाहींत.

ब्रह्मगिरीहूनि न निगे । आणि समुद्रींही कीर न रिगे ।
तरी माजीं दिसे वाउगें । मृगांबु जैसें ॥ ३१

तैसा आद्यंतीं कीर नाहीं । आणि साचाचि नोहे कहीं ।
परि लटिकेपणाची नवाई । पडिभासे गा ॥ ३२

नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।
तैसा नेणतया आपजे । आहे ऐसा ॥ ३३

ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे ।
लाघवी हरी मेखळे । लोकु जैसा ॥ ३४

आणि नसतीचि श्यामिका । व्योमीं 'दिसे तैसी दिसो कां ।
तरी दिसणेंही क्षणा एका । होय जाय ॥ ३५

स्वप्नींही मानिलें लटिकें । तरी निर्वाहो कां एकसारिखें ।
तेवीं आभासु हा क्षणिके । रीतीचा गा ॥ ३६

देखतां आहे आवडे । घेऊं जाइजे तरीं नातुडे ।
जैसा टिकु कीजे माकडें । जळामाजीं ॥ ३७

तरंगभंगु सांडीं पडे । विजूही न पुरे होडे ।
आभासासि तेणें पाडे । होणें जाणें गा ॥ ३८

जैसा ग्रीष्मशेषींचा वारा । नेणिजे समोर कीं पाठमोरा ।
तैसी स्थिती नाहीं तरुवरा । भवरूपा यया ॥* ३९

एवं आदि ना अंत स्थिती । ना रूप यंयासि आथी ।
आतां कायसी कुंथाकुंथी । उन्मूळणीं गा ॥ ४० ॥

आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवला किरीटी ।
तरि आतां आत्मज्ञानाचेनि लोटीं । खांडेनि गा ॥ ४१

वांचूनि ज्ञानेंवीण[21] एकें । उपाय करिसी जितुके ।
तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ॥ ४२

मग किती खांदोखांदी । यया हिंडावें उर्ध्वी अधीं ।
म्हणौनि मूळाचि अज्ञान छेदीं । सम्यकज्ञानें ॥ ४३

एऱ्हवीं दोरीचिया उरगा । डांगा मेळवितां पैं गा ।
तो वावोचि भारु[22] गा । केला होय ॥ ४४

तरावया मृगजळाची गंगा । डोणी लागीं धांवतां दांगा- ।
माजीं वोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं ॥ ४५

तेवीं नाथिलिया संसारा । उपायीं जाचतया वीरा ।
आपणपें लोपे वारा । विकोपी जाय ॥ ४६

म्हणोनि स्वप्नींचेया भया[23] । ओखद चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ४७

(अ. १५—२०८-२१४)

---

२१ ज्ञानेन विण. २२ फारु (?). २३ घाया.

# १६ गुणातीतत्व

पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपणपें गुणासारिखें ।
देखोनि कार्यविशेखें[१] । अनुकरे गा ॥ १

जैसें कां स्वप्नचिनि[२] राजे । जैं [३]परचक्र देखिजे[३] ।
तैं हारी जैत होइजे । आपणाचि ॥ २

तैसे मध्योर्ध्वअध । हे जे गुणवृत्तिभेद[४] ।
ते [५]दृष्टीवांचूनि शुद्ध । वस्तुचि असे ॥ ३

परी हे वाहणी असो । तरी आन न दिसो ।
परिसें तें सांगतसों । मागील गोठी ॥ ४

तरी ऐसें निजनिजें । सामर्थ्यें तिन्ही सहजें ।
होती देहव्याजें । गुणचि हे ॥ ५

इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे ।
कां अवगे तरुवरें । भूमिरसु ॥ ६

नाना दहियाचेनि मिसें । परिणमे दूधचि जैसें ।
कां मूर्त होय ऊंसें । गोडी जेवी ॥ ७

तैसे हे सांतःकरण । देहचि होती त्रिगुण[६] ।
म्हणोनि बंधा कारण । घडे कीर ॥ ८

परी चोज हें धनुर्धरा । जे एवढा गुंफिरा ।
मोक्षाचा संसारा । [७]उणा नोहे[७] ॥ ९

---

१ विशेषें. २ परिव्राजें. ३ राॐमी हें देखिजे । ४ त्रिभेद. ५ वृत्ती. ६ गुण. ७ गुणा न्हवे ॥

गुण आपुलालेनि धर्मे । देहींचे माघुत साउमें ।
चाळितांही न खोमे । गुणातीतता ।। १०

ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज ।
जे तूं ज्ञानांबुज- । द्विरेफु की ।। ११

आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मागें ।
बोलिलों तें खागें । तेवींचि हें ।। १२

तरी पार्था जें ऐसें । बोधलेनि जीवें दिसें ।
स्वप्न कां जैसें । चेइलेनी ।। १३

नातरी आपण जळीं । बिंबलों [८]तीरोनी न्याहाळी[८] ।
चळण होतां कल्लोळीं । अनेकधा ।। १४

कां नटलेनि लाघवें । नटु जैसा न झकवें ।
तैसें गुणजात देखावें । न होनियां ।। १५

पैं ऋतुत्रय[९] आकाशें । धरूनियांही जैसें ।
नेदिजेचि येवो वोसें । वेगळेपणा ।। १६

तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें ।
तिये अहं बैसे अहंते । मूळकेचिये ।। १७

तैं तेथूनि मग पाहातां । म्हणे साक्षी मी अकर्ता ।
हे गुणचि क्रियाजातां । नियोजना[१०] ।। १८

सत्वरजतमांचां । भेदीं पसरु कर्माचां ।
होत असे तो गुणांचा । विकारु हा ।। १९

---

८ तीरींहुनि कली. ९ रितु. १० नियोगी ना.

यथामाजीं मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा ।
वनलक्ष्मी विलासा । हेतुभूत ॥ २०

कां तारागणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें ।
कमळीं विकासावें ! जावें तमें ॥ २१

ये कोणाचीं काजीं कहीं । सविता जैसा नाहीं ।
तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ २२

मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे ।
ययाचेनि निःशेखे । उरे तें मी ॥ २३

ऐसेनि विवेकें जया । उदो होय धनंजया ।
ये गुणातीतत्व तया । [11]उर्धपंथें ॥ २४

आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक ।
जे ज्ञानें केलें टीक[12] । तयाचिवरी ॥ २५

किंबहुना पंडुसुता । ऐसा तो माझी[13] पावे[13] सत्ता ।
पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ २६

नलिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला ।
तैसा मूळ अहंते वेढिला[14] । तो म्हणौनियां ॥ २७

अगा अज्ञानाचिया निदा । जो घोरत होता बदबदा[15] ।
तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा[16] । चेइला कीं ॥ २८

(अ. १४—२७६-३०३)

---

११ अर्घ (दांडेकर). १२ ठीक. १३ माझिया. १४ ठेला. १५ तत्त्वधा. १६ प्रबोधा.

# १७ कर्मफळत्याग

तरी आपुलीये सोडवणें । जो मुमुक्षु जागों म्हणे ।
तया सर्वस्वें करणें । हेंचि एक ॥ १

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्में जियें आवश्यकें ।
तियें न सांडावीं पांथिकें । पाउलें जैसीं ॥ २

हारतलें न देखिजे । तंव मागु न संडिजे ।
कां न धातां न लोटिजे । भाणें जेवीं ॥ ३

नाव थडी न पवतां । न सांडिजे केळी न फळतां ।
का ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ॥ ४

तैसी आत्मज्ञान विखीं । जंव निश्चिती नाहीं निकी ।
तंव नोहावें यागादिकीं । उदासीना ॥ ५

पै स्वाधिकारानुरूपें । तियें दानें याग तपें ।
अनुष्ठावींचि [1]साक्षेपें । अधिकेंवर ॥ ६

जें चालणें वेगावत जाये । तो वेगु बैसावयाचि होये ।
तैसा कर्मातिशयो[2] आहे । नैष्कर्म्यालागीं ॥ ७

अधिकें जंव जंव औषधी । सेवेचि[3] मांडी[4] बांधी ।
तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ ८

तैसीं कर्में हातोपातीं । जैं कीजती यथानिगुती ।
तैं रजतमें झडती । [5]झाडा देऊनी[5] ॥ ९

---

१ आक्षेपें (दांडेकर). २ अतिसो. ३ सेवनेची (रा.) सेवायाची (कुंटे).
४ मांडे. ५ दोन्हीं एथ ॥

का पाठोवाटीं[६] पुटें । भांगारा खारु[७] देणें घटे ।
तैं कीड झडकरी तुटे । निर्व्याजु होय ॥ १०

तैसें निष्ठा केलें कर्म । झाडी[८] करूनि[८] रजतम ।
सत्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ ११

म्हणोनिया धनंजया । सत्त्वशुद्धी गिंवसितया ।
तीर्थाचिया सावाया । आली कर्मे ॥ १२

तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्मे अभ्यंतर उजळे ।
एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेचि ॥ १३x

तृषार्ता मरुदेशीं[९] । झळे अमृतें वोळली जैसी ।
कीं अंधालागीं डोळ्यांसीं । सूर्यु आला ॥ १४

बुडतया नदीच[१०] धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवाळिली ।
निमतया मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धि[११] ॥ १५

तैसें कर्मे[१२] कर्मबद्धता[१२] । मुमुक्षु सोडविले[१३] पंडुसुता ।
जैसा रसरीति मरतां । राखिला विषें ॥ १६

तैसीं एके हातवटिया । कर्मे केली धनंजया ।
बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ॥ १७

आतां तेचि हातवटी । तुज सांगो गोमटी ।
जया कर्मासि किरीटी । कर्मीच रुसे ॥ १८

तरी महायागप्रमुखें । कर्मे निफजतांही अचुकें ।
कर्तेपणाचें न ठाके[१४] । फुंजणें आंगीं ॥ १९

जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें ।
ऐसी श्लाघाचि[१५] नोहे । तोषु जीवीं ॥ २०

---

६ पाठिचा वाटीं. ७ x. ८ सांडूनि. x ही ओवी राजवाडे प्रतींत नाहीं. ९ मरुत देसीं. १० नइ चि. ११ रिद्धी. १२ कार्मे बांधतां. १३ सूटले. १४ टके. १५ श्लाघ्यता.

कां मुद्रा समर्थाचिया । जो एकटु झोंबे राया ।
तो मी जिणता ऐसिया । गर्वा नये ॥ २१

जो कांसे लागोनि तरे । तया पोहती उर्मी नुरे ।
पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ २२

तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें ।
कृत्यजाताचीं निरहरें[१६] । सारीजती ॥ २३

आणि केलां कर्मी पांडवा । जो आथी फळाचा यावा ।
तया मोहरा हों[१७] नेदावा । मनोरथु ॥ २४

आधींचि फळीं आस तुटिया । कर्मे आरंभावीं धनंजया ।
परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ २५

पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा ।
तैसिया फळनिराशा । कीजती कर्मे ॥ २६

सांडूनि दुधाची टकळी[१८] । गोंवारी गांवधनें वेंटाळी ।
किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ २७

ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी ।
आपुलिया आपण गांठी । लाहेचि तो ॥ २८

म्हणोनि फळीं लागु । सांडोनी देहसंगु ।
कर्मे करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥ २९

जो जीवबंधें शिणला । सुटके[१९] जाचे आपला ।
तेणें पुढतपुढतीं[२०] या बोला । आन न कीजे ॥ ३०

(अ. १८—१४८-१७७)

---

१६ मोहिरें. १७ न व्हावा. १८ टकुली. १९ सूटिकें. २० पुढुतीं.

# १८ अभेद भक्ति

यालागीं[१] सुभद्रापती । हे भाव इया[२] माझिया विभूती ।
आणि यांचिया[३] व्याप्ती । व्यापिलें विश्व[४] ॥ १

म्हणोनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरीं[५] ।
मीवांचूनि दुसरी । गोठी नाहीं ॥ २

ऐसें जाणें जो साचें । तया चेहरें जाहालें ज्ञानाचें ।
म्हणोनि उत्तममध्यम[६] भेदाचें । [७]दु:स्वप्न तया[७] ॥ ३

मी माझिया विभूती । आणि विभूतीं [८]व्यष्टलिया व्यक्ती ।
हें आघवें योगप्रतीती । [९]एकचि मानी ॥ ४

म्हणोनि निःशंकें येणें[१०] महायोगें[१०] । मज मीनला मनाचेनि आंगें ।
एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी [११]जाहला ॥ ५

कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी ।
तयाचिये भजनाचिये नाटीं । सूती मज ॥ ६*

म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु ।
करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें षष्ठी ॥ ७

तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा ।
साद जाली तरी परियेसा । बोलिजेल ॥ ८

तरि मीचि एक सर्वां । या जगा जन्म पांडवा ।
आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाहो यांचा ॥ ९

---

१ पैं. २ ×. ३ येया. ४ जग. ५ मज लागौनि पिपीलिकावे=ही । ६ उत्तमाधम. ७ स्वप्न हिं न देखे ॥ ८ अधिष्ठिलिया. ९ इयेची. १० ××. ११ जाण. * ओव्या ६ ते १९ राजवाडे प्रतींत नाहींत.

कल्लोळमाळा अनेगा । जन्म जळींचि पैं गा ।
आणि तयां जळचि आश्रयो तरंगा । जीवनही जळ ॥ १०

ऐसें आघवांचि ठायीं । तया जळचि जेविं पाहीं ।
तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये ॥ ११

ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें ।
परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ १२

देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न ।
जैसा वायु होऊनि गगन । गगनींचि विचरे ॥ १३

ऐसेनि जे निजज्ञानीं । खेळत सुखें त्रिभुवनीं ।
जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें ॥ १४

जें जे भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ १५

चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले ।
जीवों मरों विसरले । बोधाचिया सुली ॥ १६

मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें ।
आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥ १७

जैशीं जवळिकेंचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासि धवळारें । तरंगचि होती ॥ १८

तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी ।
तेथ बोध बोधाची लेणीं । बोधेंचि मिरवी ॥ १९*

जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या[१२] क्षेम[१३] दिधलें ।
नातरी सरिसेनि पाडें मीनले । दोनी वोघ ॥ २०

१२ चंद्रमेयासि. १३ खेंव.

तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसाण तरत[१४] सात्त्विकाचें ।
ते संवादचतुष्पथींचे । गणेश जाहले ॥ २१

तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये[१५] गांवाबाहेरें[१६] ।
मियां घाले तेणें उद्गारें । लागती गाजों[१७] ॥ २२

पैं गुरुशिष्यांचां[१८] एकांतीं । जे अक्षरा एकाचि वदंती ।
ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती[१९] सैंघ[१९] ॥ २३

जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों[२०] नेणे ।
दे राया रंका पारणें । आमोदाचें ॥ २४

तैसोंनि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत ।
मग तया विसरामाजीं[२१] विरत । आंगें जीवें ॥ २५

ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें[२२] । नाहीं राती दिवो[२३] जाणणें ।
केलें माझें सुख अव्यंगवाणें[२४] । आपणपेयां जिहीं ॥ २६

तयां मग जें आम्हीं कांहीं । द्यावें[२५] अर्जुना पाहीं ।
ते ठायींचीच तिहीं । घेतली सेल ॥ २७

कां जे[२६] ते जिया वाटा । निगाले गा सुभटा ।
ते सोय पाहोनि[२७] अव्हांटा । स्वर्गापवर्ग ॥ २८

म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें ।
परि आम्हीं देयावें हेंहि[२८] केलें । तिहींचीं[२९] म्हणियें[२९] ॥ २९

आतां[३०] यावरी येतुलें घडे । जें तेंचि सुख[३१] आगळें वाढे ।
आणि काळाची दिठी न पडे । हें आम्हां[३२] करणें ॥ ३०

---

१४ तरंगत आहे. १५ निगति. १६ बोधें बाहिरें. १७ गर्जों. १८ गुरु-शिष्यसंबंधु. १९ गर्जत असे. २० राहों. २१ विसरलेयामाझि. २२ बौह. २३ दियो. २४ आवडणें. २५ देयावें. २६ X. २७ पां येउनि. २८ तें इहीं चि. २९ आपणपें चि पैं ॥ ३० X. ३१ प्रेम. ३२ साम्य.

लळेयाचिया बाळका किरीटी। गवसणी करूनि[३३] स्नेहाचिया दिठी
जैसी खेळतां पाठोपाठीं[३४]। [३५]माउली धांवे[३५] ॥ ३१

तें जो जो खेळ दावी। तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी।
तैसी उपास्तीची पदवी। पोषित मी जायें ॥ ३२

जिये पदवीचेनि पोषकें। ते मातें पावती यथासुखें।
हे पाळती मज विशेखें। आवडे करूं ॥ ३३

[३६]पैं गा भक्तासि[३६] माझें कोड। मज तयाचें अनन्यगतीची चाड।
कां जे प्रेमळांचें सांकड। आमते घरीं ॥ ३४

पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले। दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी[३७] केले[३७]।
आम्हीं आंगही शेषा वेंचिलें। लक्ष्मीयेसी ॥ ३५

परि आपणपेंवीण जें एक। तें तैसेंचि[३८] सुख[३९] साजुक।
सप्रेमळालागीं देख। ठेविलें जतन ॥ ३६

हा ठायवरी किरीटी। आम्ही प्रेमळु घेवों आपणयासाठीं।
या बोलीं बोलिजत गोष्टी[४०]। तैसिया नव्हती गा ॥ ३७

(अ. १०-१०४-१४०)

---

३३ घालूनु आपलेया. ३४ वाटी. ३५ माता निहाली ॥ ३६ आगा या विश्वासि मी. ३७ वाहाणी आहाति ठेविलें। ३८ सवियां. ३९ बरवें. ४० गोठी.

# १९ भक्ताचीं लक्षणें

पार्था जयाचां ठायीं । वैषम्याची वार्ता[१] नाहीं ।
रिपुमित्रां दोहीं[२] । सरिसा पाडु ॥ १

कां घरिचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा ।
हें नेणेचि गा पांडवा । दीपु जैसा ॥ २×

जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥ ३

नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ।
गाळितया[३] कडु । नोहेचि जेवीं[३] ॥ ४

अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भावो ऐसा ।
मानापमानीं सरिसा । होतु जाय ॥ ५

तिहीं[४] ऋतूंसमान । जैसें कां गगन ।
तैसें एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ ६

दक्षिण[५] उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता ।
तैसा सुखदुःखप्राप्ता । मध्यस्थु जो ॥ ७

माधुर्ये चंद्रिका । सरिसी राया रंका ।
तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ ८

आघवियां जगा[६] एक । सेव्य जैसें उदक ।
तैसें [७]तयातें तिन्हीं[६] लोक । आकांक्षिती[८] ॥ ९

---

१ परि. २ दोन्हीं. × ही ओवी राजवाडे प्रतींत नाहीं. ३ गालितेया ही तो चि पाडु। येकु चि गा ॥ ४ साई. ५ दक्षिणोत्तर. ६ ×. ७ जेयातें. ८ आसंसीति.

जो सबाह्यसंगु । सांडोनिया लागु ।
एकाकी असे[९] [९]आंगु । आंगीं सूनी ॥ १०

जो निंदेते नेघे । स्तुति न श्लाघे ।
आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ ११

तैसें निंदे आणि स्तुती । मानु करूनि एके पांती ।
विचरे[१०] प्राणवृत्ती । जनीं वनीं ॥ १२

साच लटिकें दोन्ही । [१२]बोलोनि न बोले जाहला मौनी[१२] ।
जे भोगितां उन्मनी । आरायेना[१३] ॥ १३

जो यथालाभें न तोखें । अलाभें न पारुखे ।
पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ १४

आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ।
तैसा न धरीच केंही । आश्रयो जो ॥ १५

आघवाचि आकाशस्थिति । जेवीं वायूसि नित्य वसति ।
तेवीं जगचि विश्रांति- । स्थान जया ॥ १६

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १७

## श्रीकृष्णाचें भक्तवात्सल्य

मग[१४] याहीवरी पार्था । माझां भजनीं आस्था ।
तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ १८

उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक ।
परि मानु करिती तिन्ही[१४] लोक । पायवणियां ॥ १९

---

९ असंगु. १० विचारें. ११ मौनी. १२ न बोलेल मौनि । १३ आरायना ॥ १४ X.

तरि श्रद्धावस्तूसि आदरु । करिता जाणिजे प्रकारु ।
जरी होय श्रीगुरु । सदाशिवु ॥ २०

परि हें असो आतां । महेशातें वानितां ।
आत्मस्तुति होता[16] । संचारु असे ॥ २१

ययालागीं हें नोहे[17] । म्हणितलें रमानाहें ।
अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ २२

जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलां हातीं ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ २३

कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी ।
कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २४

म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही[17]माथां[17] मुकुट करूं ।
तयाची टांच[18] धरूं । [19]हृदयीं आम्ही ॥ २५

तयाचिया गुणांचीं लेणी । लेववूं आपुलिये वाणी ।
तयाची कीर्ति श्रवणीं । [20]आम्ही लेऊं ॥ २६

तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें[21] । पुजूं तयातें ॥ २७

दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी ।
आलिंगावया लागुनी । तयाचें आंग ॥ २८

तया संगाचेनि सुरवाडें । मज[22] विदेहा[22] देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २९

---

१६ करितां. १७ ×. १८ टांक. १९ कंठिं. २० आइकों आम्हीं ॥
२१ करकमळें. २२ आह्मां.

तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र[२३] ।
परि तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ ३०

तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । [२४]प्रशंसिती ॥ ३१

जें हें अर्जुना साद्यंत । सांगितलें प्रस्तुत ।
भक्तियोगु [२५]समस्त । योगरूप ॥ ३२

जें मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं ।
येवढी थोरी । जया स्थितीये ॥ ३३

ते हे गोष्टी[२६] रम्य । अमृतधारा[२७] धर्म्य ।
करिती[२८] प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥ ३४

तैसीचि श्रद्धेचेनि[२९] आदरें । जयांचां ठायीं विस्तरे ।
जीवीं जया थारे । जे अनुष्ठिती ॥ ३५ ०

परि निरूपली जैसी । तैसीच स्थिति +[३०]मानसीं ।
मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥ ३६

परि मातें परम करूनि । इये अर्थी प्रेम धरूनि ।
हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ ३७×

पार्था गा जगीं । तेचि[३१] भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तयालागीं । अखंड मज ॥ ३८

---

२३ पां चित्र. २४ आसंसीति. २५ संमत. २६ गोठि. २७ अमृताधारधर्म्य । २८ प्रेरीति. २९ श्रद्धा करूनि. ३० +रमत. × ही ओवी राजवाडे प्रतींत नाहीं. ० ३५।३६ ओव्यांचे क्रमांक राजवाडे प्रतींत उलट आहेत.

ते तीर्थ ते क्षेत्र। जगीं तेचि पवित्र।
भक्तिकथेसी मैत्र। जयां पुरुषां॥ ३९*
आम्ही तयाचें करूं ध्यान। तो आमुचे देवतार्चन।
तेवांचूनि आन। गोमटें नाहीं॥ ४०
तयाचें आम्हां व्यसन। तो आमुचें निधि[३१]निधान।
किंबहुना समाधान। तो मिळे तैं॥ ४१
पैं प्रेमळाचि वार्ता। जे अनुवादती[३२] पांडुसुता।
ते मानूं परम[३३]देवता। आपुली आम्ही॥ ४२
ऐसें निजजनानंदें। तेणें जगदादिकंदें।
बोलिलें मुकुंदें! संजयो म्हणे॥ ४३
राया जो+[३४] निर्मळु। निष्कल लोककृपाळु।
शरणागतां प्रतिपाळु[३५]। शरण्यु जो॥ ४४
जो धर्मकीर्तिधवळु। अगाध दातृत्वें सरळु।
अतुलबळें प्रबळु। बळिबंधनु॥ ४५
जो पैं सुरसहायशीळु[३६]। लोकलालनलीळु।
प्रणतप्रतिपाळु। हा खेळु जयाचा॥ ४६
जो भक्तजन[३७]वत्सलु। प्रेमजन[३८] प्रांजळु।
सत्यसेतु सरळु[३९]। कलानिधि॥ ४७
तो कृष्णजी वैकुंठींचा। चक्रवर्ती निजांचा।
सांगतुसे[४०] येरु दैवाचा। आइकतु असे॥ ४८

(अ. १२-१९७-२४४)

---

३१ ×. ३२ अनुमोदिती. ३३ परदेवता. ३४ + निज. ३५ स्नेहाळु. ३६ ०सील. ३७ ×. ३८ प्रेमल. ३९ सकल. ४० सांघे.

* ३९ व्या ओवीनंतर ४६ व ४७ या दोन ओव्या राजवाडे प्रतीत आहेत. पण त्या स्पष्टपणें पुढीलच होत.

# २० नामघोषगौरव

तरी जयांचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ।
जयां निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ १

जयांचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा ।
जयांचें मन ओलावा । विवेकासी ॥ २

जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसि आले । पालव नवे ॥ ३

जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥ ४

जयां भक्तीची येतुली प्राप्ती[1]। जे कैवल्यातें परौतें[2] सर म्हणती ।
जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ ५

जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं[3] लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥ ६

ऐसे जे महानुभाव । जे दैविये प्रकृतीचें दैव ।
जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ ७

मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे ।
परि दुजेपण मनोधर्मे । शिवतलें[4] नाहीं ॥ ८

ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा ।
परी नवलावो तो सांगावा । असे आइक ॥ ९

तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे ।
जे नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ १०

---

१ प्रीति. २ पऱ्हां. ३ संयतिची. ४ सीतले.

यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं ।
यमलोकीं खुंटिली[5] । राहाटी आघवी ॥ ११

यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें[6] ।
तीर्थें म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं ॥ १२

ऐसे माझेनि नामघोषें । नाहीं करिती विश्वाचीं दुःखें ।
अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ १३

ते पाहांटेविण पाहावित[7] । अमृतेंवीण जीववित ।
योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ॥ १४

परि राया रंका पाड धरूं । ने णती सानेयां थोरां कडसणी करूं ।
[8]एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥ १५

कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।
ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ १६

तेजें सूर्य तैसे सोज्ज्वळ[9] । परि तोहि अस्तवे हें किडाळ ।
चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ॥ १७

मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न[10] पुरे ।
हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ॥ १८

जयांचे[11] वाचेपुढां भोजे । [12]+नाम नाचत असे माझें ।
जें जन्मसहस्त्रीं[13] वोळगिजे[13]। एकवेळ मुखासि यावया[14]॥ १९

तो मी वैकुंठीं नसें । एक वेळ भानुबिंबींही न दिसें ।
वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि[15] जाय ॥ २०

---

५ यमलोकिंची ठाकविली । ६ शोषावें. ७ पाहाटवित. ८ एकरसें. ९ उजल. १० नुपकरे. ११ तेयाचिये. १२ +अखंड ( कुंटे ). १३ जन्मशातीं ७० लगिजे । १४ एकोल यावया ॥ १५ सांडूनि.

परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला[16] गिंवसावा ।
जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे[17] ॥ २१

कैसे माझां गुणीं धाले[18] । देशकाळातें विसरले ।
कीर्तनसुखें झाले । आपणपांचि ॥ २२

कृष्ण विष्णु हरि[20] गोविंद । या नामाचे निखळ[21] प्रबंध ।
माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २३

हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारीं ।
एक विचरती चराचरीं । पांडुकुमरा ॥ २४

(अ. ९—१८८-२११)

---

१६ हारतला. १७ माझा. १८ भरले. १९ सुखावले (कुंटे). २० X.
२१ निखिल.

# २१ 'हृदया हृदय येक जालें'

जेणें सप्रपंच अज्ञान जाये । येकु मी गोचरु होये ।
तें उपपत्तीचेनि उपायें[1] । गीतारूप हें ॥ १

मियां ज्ञान तुज आपुलें । नानापरी उपदेशिलें ।
येणें अज्ञानजात सांडीं वियालें । धर्माधर्म जें ॥ २

आशा जैसी दुःखातें । व्याली निंदा दुरितें ।
हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्व[2] ॥ ३

तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक ।
तें सांडूनि घाली अशेख । ज्ञानें येणें ॥ ४

हातीं घेऊनि तो दोरु । सांडिजे जैसा सर्पाकारु ।
कां निद्रात्यागें घराचारु । स्वप्नींचा जैसा ॥ ५

नाना सांडिलेनि कवळें । चंद्रींचें धुपे[3] पिंवळें ।
व्याधित्यागें कडुवाळें- । पण मुखाचें ॥ ६

अगा दिवसा पाठी देउनी । मृगजळ घापे त्यजुनी ।
कां काष्ठत्यागें वन्ही । त्यजिजे जैसा ॥ ७

तैसें धर्माधर्माचें टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ ।
तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ ८

मग अज्ञान निमालिया । मीचि येकु असें अपैसया ।
सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें ॥ ९

तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं ।
सोऽहं[4]बोधें तयाचां ठायीं । अनन्यु होय ॥ १०

---

१ उपायें. २ दुर्भरत्व. ३ लोपे. ४ स्वयंबोधें.

पैं आपलेंनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण ।
तयाचिं[5] नांव[6] शरण । मज येणें गा ॥ ११

म्हणौनि घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे ।
मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ १२

सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळु जैसा पाणिया ।
तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ १३

वांचूनि सागराचां पोटीं । वडवानळु शरण आला[7] किरीटी ।
जाळूं न ठाके तया गोठी । [8]वाळूनि दे पां[8] ॥ १४

मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे ।
धिगू बोली यिया न लजे । प्रज्ञा केवीं ॥ १५

अगा प्राकृताही राया । आंगीं पडे जें धनंजया ।
तें दासिरूंही कीं तया । समान[9] होय ॥ १६

मा मी विश्वेश्वरु भेटे । आणि जीवग्रंथी न सुटे ।
हे बोल नको वोखटे । कानीं लाऊं ॥ १७

म्हणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें ।
तें करीं हाता येतें । ज्ञानें येणें ॥ १८

मग ताकौनिया काढिलें । लोणी मागौतें ताकीं घातलें ।
परी न घेपे कांहीं केलें । तेणें[10] जेवीं ॥ १९

लोह उभें खाय मातीं । तें परिसाचिये संगती ।
सोनें जालया पुढती । न शिविजे[11] मळें ॥ २०

---

५ त्या चि. ६ नावें. ७ X. ८ जाली देख पां ॥ ९ मान्य होये ॥
१० ताकें. ११ लिंपिजे.

हें असो काष्ठापासोनी । मथूनि घेतालिया वन्ही ।
मग काष्ठेंही कोंडोनि । न ठके जैसा ॥ २१

तैसें अद्वयत्वें[१२] मज । शरण रिघालिया तुज ।
धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥ २२

अर्जुना काय दिनकरु । देखत आहे अंधारु ।
कीं प्रबोधीं होय गोचरु । स्वप्नभ्रमु[१३] ॥ २३

तैसें मजसीं येकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां ।
आन कांहीं उरावया । कारण असे ॥ २४

म्हणौनि तयाचें कांहीं । चिंतीं ना आपुलां ठाईं ।
तुझें पापपुण्य पाहीं । मीचि होईन ॥ २५

जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा ।
तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥ २६

तेथ सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दुजेपणें ।
तें माझां बोधीं वायाणें । होऊनि जाईल ॥ २७

येतुलेनि आपैसया । सुटलाचि आहासी धनंजया ।
घेईं मज प्रकाशोनियां । सोडवीन तूतें ॥ २८

याकारणें पुढती । हे आधी न वाहें चित्तीं ।
मज एकासि ये सुमती । जाणोनि शरण ॥ २९

ऐसें सर्वरूपरूपसें । सर्वदृष्टिडोळसें ।
सर्व देश[१४]निवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ ३०

मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दाक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु[१५] तो ॥ ३१

---

१२ अद्वैतत्वें. १३ संभ्रमु. १४ देव. १५ भगत.

न[१६] पवतां[१६] जयातें । काखेसूनि बुद्धीतें ।
बोलणें मागौतें । वोसरलें ॥ ३२

ऐसें जें कांहीं एक । बोला बुद्धीसीही अटक ।
तें द्यावया मिख । खेवाचें[१७] केलें ॥ ३३

हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥ ३४×

दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु[१८] तो जाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ ३५

तेव्हां[१९] सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया ।
तेथ वाडु तऱ्हीं बुडोनियां । ठेला देवो ॥ ३६

सिंधु सिंधू तें पावों जाये । तें पावणें[२०] ठाके दुणा होये ।
वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥ ३७

तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ।
किंबहुना नारायणें । विश्व कोंदलें ॥ ३८

एवं वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र ।
श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ ३९

(अध्याय १८—१३८८-१४२६)

---

१६ तन्मयता. १७ क्षेमाचें. × ही ओवी राजवाडे प्रतींत नाही.
१८ परिसखंगु. १९ तेधवा. २० पाहणें ठाकणें दूण होए ।

# २२ पसायदान

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि[१] मज द्यावें[२] । पसायदान हें ॥ १

जे खळाची व्यंकटी[३] सांडो । तया सत्कर्मी[४] रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ २

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो[५] जें[५] वांछील तो[५] तें लाहो । प्राणिजात ॥ ३

वर्षत सकळ[६]मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत[७] भूमंडळी । भेटतु भूतां ॥ ४

चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ५

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६

किंबहुना सर्वसुखी । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं[८] । अखंडित ॥ ७

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें होआवें जी ॥ ८

येथ म्हणे विश्वेशरावो[९] । हा होईल [१०]दानपसावो ।
येणें वरें[११] ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ ९

(अ. १८—१७९३-१८०१)

---

१ तोखौनि. २ देयावें. ३ वांकुडें. ४ सत्संगीं. ५ ××. ६ सर्व. ७ अनव्रत. ८ पुरुषीं. ९ विश्वेसरीं राऊ. १० दाओ. ११ वचनें.

# १ मंगलाचरण

प्राचीन ग्रंथकारांच्या प्रथेप्रमाणें ग्रंथारंभीं ज्ञानेशांनीं विघ्नहर्ता गणेश व विद्यादात्री सरस्वती यांना वंदन केलें आहे. पुढें मात्र अनेक अध्यायांच्या (अ. २, ३, ५, ७, ८ हे वगळून) प्रारंभीं नाथसंप्रदायी ज्ञानेश्वर एकट्या गुरूलाच नमन करतात. आणि आपल्या ग्रंथपूर्तीसाठीं त्याच्याच आशीर्वादाची अपेक्षा करीत असलेले दिसतात. हीं सारींच नमनें ज्ञानेशांच्या व्यक्तित्वावर प्रकाश टाकणारीं असल्यानें अभ्यसनीय आहेत. प्रस्तुत मंगलाचरण तर शैलीदृष्ट्याहि उल्लेखनीय आहे. पहिल्या १० ओव्यांचें 'पंडिती' वळण व पुढील 'बाळबोध' रचना यांतील विरोध चिन्त्य व हृद्य वाटतो. अ. १० व अ. १६ यांतील मंगलाचरणें या दृष्टीनें प्रस्तुत मंगलाचरणाशीं तुलून पाहण्याजोगीं आहेत.

(१–१०)—प्रारंभींच्या दहा ओव्यांत परमात्मस्वरूपी गुरूच्या सामर्थ्याचें व कर्तृत्वाचें वर्णन करून कवीनें त्याचा जयजयकार केला आहे. प्रत्येक ओवीच्या सुरुवातीला 'जयजय देव' अशीं पदें आहेत. दहाव्या ओवींत 'जयजय देव श्रीगुरो' असें म्हटलें आहे. म्हणजे देवस्वरूप गुरूलाच हें नमन आहे हें उघड होतें. ही देवस्वरूप गुरुमूर्ति निर्मळ, प्रबळ, निष्कळ, निश्चळ अशी असून ती मूलभूत, स्वप्रभ आणि केलिप्रिय आहे, असें ज्ञानेश्वर सांगतात. उपनिषदांनीं केलेल्या ब्रह्माच्या वर्णनाशीं हें वर्णन तंतोतंत जुळणारें आहे. तेव्हां ज्ञानेशांची गुरुमूर्ति परमात्मस्वरूपीच आहे, असें यावरून स्पष्ट होतें. आणि ही कल्पना ज्ञानेशांच्या अद्वैती दृष्टिकोनाला अगदीं साजेशी अशीच आहे.

(१) **निज + जन + अखिल + मंगल** = आपल्या भक्तांचें सर्व मंगल (**कल्याण**) करणारा असा (देव = श्रीगुरु). **जन्म + जरा + जलद** (**मेघ**) + **जाळ** (**समुदाय**) + **प्रभंजन** (**वारा**) = जन्म नि वार्धक्यरूपी मेघांच्या गर्दीला पिटाळून लावणारा जणूं झंझावातच.

(२) विदळित + अमंगळ + कुळ = अशुभांच्या समुदायाचा ज्यानें नाश केला आहे असा. निगम ( वेद ) + आगम ( शास्त्रें ) + द्रुमफळ = वेद व शास्त्रें या वृक्षांचें फळ असणारा व तें फल देणारा (फलप्रद)

(३) विगत + विषय + वत्सल = विषयवासना सोडून देणारांचा कैवार घेणारा. ( वैराग्यवान पुरुषांसंबंधीं प्रेमभाव बाळगणारा ) कलित (ग्रसित)+काळ + कौतूहल = काळाच्या क्रीडेला ज्यानें अंकित ठेवलें आहे असा. कला + अतीत = अंशादि विभागांपलीकडला. म्हणजे सदोदित पूर्ण असणारा.

(४) निष्कळ = अखंड, पूर्ण. स्फुरत् + अमंद + आनंद + बहळ ( विपुल ) = ज्याच्या ठिकाणीं विपुल आनंद जोरानें स्फुरण पावत आहे असा. नित्य + निरस्त + अखिल + मळ ( दोष ) = ज्यानें सर्व दोषांचें कायमचें निर्मूलन केलें आहे असा.

(५) जगत्+अंबुद ( मेघ ) गर्भ+नभ=( श्रीगुरु म्हणजे ) जगरूपी ढगाचा गर्भ ज्यांत संभवतो असें जणूं कांहीं आकाशच. भुवन + उद्भव + आरंभ + स्तंभ = स्वर्गादि लोकांच्या उत्पत्तीचा जणूं आधारभूत खांबच. भव + ध्वंस = संसाराचा फडशा पाडणारा.

(६) चलित + चित्त + पान + तुंदिल = चंचल अशा अंतःकरणांचें पान केल्यामुळें ज्याचें पोट वाढलें आहे असा. (भक्तांच्या अन्तःकरण-वृत्ति, त्यांचे विकार, ईश्वर स्वतःच्या ठिकाणीं केंद्रित करून घेतो, यावर तुंदिलत्वाची कल्पना आधारली आहे. जगत् + उन्मीलन + अविरल ( दाट, अखंड, सतत ) + केलि ( क्रीडा ) + प्रिय = विश्वोत्पत्तीचा खेळ सतत खेळण्याची आवड असणारा.

(७) विदु + उदय + उद्यान + द्विरद = ज्ञानोदयरूपी ( बगीचा ) अरण्यांतील जणूं हत्तीच. शम + दम + मदन + मद + भेद = शांती आणि संयम यांच्या साधनानें मदनाच्या गर्वाचें खंडन करणारा.

(८) देव + एकरूप = परमात्म्याशीं एकत्व पावलेला. अतिकृत + कंदर्प + सर्प + दर्प = मदनरूपी सर्पाच्या गर्वावर मात करणारा. ( घमेंड

धुळीस मिळवणारा ) **भक्त + भाव + भुवन + दीप** = भक्ताच्या श्रद्धारूपी घरांतील जणूं कांहीं दिवाच. **ताप + अपह** = भक्ताचा सांसारिक ताप नाहींसा करणारा. आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक अशा तीन प्रकारच्या दुःखांना 'तापत्रय' अशी संज्ञा आहे. या त्रिविध त्रासांतून ईश्वर भक्ताला मुक्त करितो अशी कल्पना.

(९) **परिणत + उपरम + एकप्रिय** = परिपक्व झालेल्या वैराग्यवानांचेंच प्रेम असणारा. **निज + जन + जित** = आपल्या भक्तांकडून जिंकला गेलेला असा. **माया + अगम्य** =मायेला (सांसारिकांना, अज्ञान्यांना) आकलन न होणारा.

(१०) **अकल्पन + आख्य + कल्पतरू** = कल्पनारहित म्हणून म्हटल्या जाणाऱ्या ( आख्य ) परमात्मस्वरूपास मिळवून देणारा जणूं कांहीं इच्छावृक्षच. ( इच्छिलेलें देणारा तो कल्पतरु ) **स्व + संवित् + द्रुम + बीज + प्ररोहण + अवनी** ( भूमि ) = स्वरूपज्ञान किंवा आत्मज्ञान रूपी वृक्षाचें बीं वाढण्याची जणूं कांहीं जमीनच.

(११) **नाना + परिभाषा + वशें** =अनेक पारिभाषिक शब्दांच्या योगानें. ( आध्यात्मिक तत्त्वज्ञानांतील विशिष्ट शब्दांनींच वरील ओव्यांत गुरुस्तुति केली आहे ) **तुज + उद्देशें** = तुला उद्देशून [ **तुज दोसें** ( पाठभेद ) = तुझ्यासाठीं ] **निर्विशेष** = विशेषरहित, भेद-रहित. ( पुढील ओवींतील कल्पना लक्षांत घेतां 'विशेषणरहित' असा येथें अर्थ घेऊन त्यावर ज्ञानेश्वरांनीं लगेच पुढील ओवींत कोटी लढविली आहे; असेंहि म्हणतां येईल ).

(१२) कोणत्याहि विशेषणानें दर्शविलेलें दृश्यस्वरूप तुझें रूप होऊं शकत नाहीं. ( कारण तूं 'निर्विशेष' आहेस ) हें ठाऊक असल्यामुळें वरील प्रकारच्या विशेषणांनीं तुझें वर्णन ( **वानणां** ) करतांना माझी मलाच लाज वाटतें असें ज्ञानेश्वर विनीतभावानें म्हणतात.

(१३–१६) चंद्रदर्शनानें समुद्राला उधाण येणें व चंद्रकांत मण्याला पाझर सुटणें, वसंतागमनानें वृक्ष पल्लवित होणें, सूर्यकिरणांच्या स्पर्शानें

कमलांचें विकसित होणें किंवा मिठाचें पाण्यांत विरघळून जाणें या वस्तुस्थितींचा दृष्टांतासाठीं उपयोग करून घेतांना त्यावर कल्पनेचा साज कवीनें येथें कसा चढविला आहे; हें मुळांतूनच पहाण्याजोगें आहे. (१३) **डगरु** = प्रसिद्धी. (१५) **अवचितिया** = एकाएकी. (१६) **शिवतलें** = स्पर्श केलेलें. (१७) **जाकळिला** = व्यापला. (१८) **पां पिसें** किंवा **पांचपिसें** दोहोंचा अर्थ 'वेड' असाच होतो.

(१९) निर्विशेषाची स्तुति वेडेपणांतच केली जाणार. शुद्धीवर राहून ( **आठवीं राहोनी** ) स्तुति करायची म्हणजे गुण व गुणातीत ( **गुणागुणिया** ) यांची बरोबरी ( **सरोभरी** ) केल्यासारखेंच होणार.

(२०) पण तूं तर एकरसाची मूर्ति आहेस; त्या तुझ्या ठिकाणीं गुण व गुणातीत असे भाग कसे करूं ? मोती न फोडतांच चांगलें दिसतें कीं फोडून सांधल्यावर चांगलें दिसेल ?

(२१–२४) तुला बाप, माय, स्वामी या उपाधींनीं विटाळणें कांहीं योग्य नाहीं. ( कारण तूं निरुपाधिक आहेस.) अंतर्बाह्य व्यापून राहिलेल्या तुला 'आत्मा' असें म्हणणें म्हणजे आंतून बाहेर घालविण्यासारखेंच होणार. तेव्हां आतां स्तुति नकोच. मौन हाच तुझा अलंकार. तूं दुसरा अलंकार अंगावर धारण करीत नाहींस. ( **सुसीना मा** ) (२१) **डिंभ** = लेकरूं. **उपाधी** = नातें किंवा त्रास. (२२) **गोसावीपण** = धनीपणा. **उशिटलें** = उष्टें केलें. (२३) **घापतासी** = घालविला जातोस. (२६) **जिंतलें** = जिंकलेलें. **आलाप** (आलव) = बडबड. **उपसाहे** = सहन कर.

(२७) "सज्जन श्रोत्यांना मान्य होईल अशा प्रकारें माझ्या गीतार्थाच्या विस्तारावर ( **वाग्वृद्धि** = व्याख्यानावर ) आपल्या मान्यतेचें शिक्कामोर्तब कर. ( **मुक्तमुद्री लावीं** ) किंवा गीतार्थाची मुक्तमुदी म्हणजे गीतेंतील भावार्थाचा शिक्का माझ्या व्याख्यानावर उमटवा." अशी विनंती ज्ञानेश्वर निवृत्तिनाथांना करतात.

(२८) " परिसावर लोखंड वारंवार घासावें लागतें काय ?" हा प्रश्न विचारण्यांत 'पुनः पुनः तूं कृपाप्रसादाची याचना करूं नकोस' असेंच निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरांना सांगत आहेत. (२९) **पसाव** = प्रसाद. **अवधान** = लक्ष.

---

# २ महाभारत-प्रशंसा

पहिल्या अध्यायाच्या प्रास्ताविक भागांत शब्दब्रह्मस्वरूपी गणेश, विश्वमोहिनी शारदा व हृदयस्थ गुरु यांना वंदन केल्यावर पुढील बावीस ओव्यांत ज्ञानेशांनीं महाभारत ग्रंथाची थोरवी वर्णिली आहे. उत्कृष्ट साहित्याबद्दलची ज्ञानेश्वरांची कल्पना या उताऱ्यावरून स्पष्ट होते.

(१) **सकळां कौतुकां** = सर्व चमत्कारांची खाण (**जन्मस्थान**) (पाठ-भेद = सर्व कथांचें किंवा सर्व कलांच्या क्रीडेचें उगमस्थान). **अवधारा** = ऐका. **विवेकतरूचें उद्यान**=सारासार विचाररूपी वृक्षांचा बगीचा. महाभारतांत आध्यात्मिक प्रश्नांचा विचार आला आहे.

(२) **आदि** = प्रारंभ, उगम. **प्रमेय + महा + निधि** = सर्व शास्त्रांतील सिद्धांतांचा मोठा सांठा. महाभारतांत धर्म, नीति, समाज, अध्यात्म इत्यादि संबंधीचे सिद्धांत (कथांच्या द्वारां) सांगण्यांत आले आहेत. **नवरस + सुधा + अब्धि** = काव्यांतील शृंगारवीरकरुणादि नऊ रस म्हणजे अमृतच होय. त्या अमृताचा सागर म्हणजे हा ग्रंथ; म्हणूनच पुढें या ग्रंथाला 'काव्यारावो' असें म्हटलें आहे. (३) **परमधाम** = श्रेष्ठ स्थान, मोक्ष. **मूळपीठ** = प्रारंभस्थान. **वसौट** (वसैठ) = वसतिस्थान. 'वरिष्ठ, वसिष्ठ' हे पाठ बरोबर वाटत नाहींत. वसैठ हा पाठ महानुभाव वाङ्मयांतहि आढळतो. (४) धर्म, नीति, काव्य या तिहींचें आगर म्हणजे महाभारतग्रंथ होय, असा या ओवीचा आशय आहे. **सज्जनांचें जिव्हार** (= अन्तःकरण) म्हणजे हा ग्रंथ होय. हें वचन महाभारतांतील सदाचाराच्या (नैतिक) शिकवणुकीला अनुलक्षूनच घेतलें पाहिजे. (५) **भारती** = वाणी, सरस्वती. **महामती** = विशालबुद्धि, प्रतिभा. व्यासमहर्षींच्या प्रतिभा-बळानें प्रत्यक्ष सरस्वतीच कथारूपानें येथें अवतीर्ण झाली असा भाव.

(६) **काव्यारावो** = काव्यग्रंथांचा राजा, सर्वश्रेष्ठ ग्रंथ. **गुरुवतीचा ठावो** = गांभीर्याचें आश्रयस्थान. **आवो** = डौल, प्रतिष्ठा.

(७) एथूनि **शब्दश्री सच्छास्त्रिक** = महाभारतामुळेंच शब्दसंपत्तीला निर्दोष किंवा चांगली (भली-पाठभेद) शास्त्रीयता प्राप्त झाली. सांख्य, योग, वेदांत या शास्त्रांची परिभाषा महाभारतानें लोकांत रूढ केली असा भावार्थ. **महाबोधीं कोंवळीक दुणावली** = ब्रह्मज्ञानाची मृदुता वाढली. तर्ककर्कश युक्तिवाद करण्याऐवजीं महाभारतानें कथांच्या द्वारां महाबोध ( वेदान्तज्ञान) लोकांपुढें ठेवला. ललित भाषेंत हें ज्ञान मांडल्यानें तें रंजक, आकर्षक झालें असा भाव. पुढील '**प्रमेय** रुचीस आलें' या चरणाचा अर्थ हाच आहे. (८) पण चातुर्य, सुख याबरोबर 'प्रमेय ऐवजी प्रेम' हाच पाठ बरा वाटतो. महाभारतांत चातुर्य, प्रीति व सुख यांचा परमोत्कर्ष झाला आहे, असा अर्थ.

(९) **पोखलें** = पुष्ट झालें, वाढलें. **सुरेखता** = रेखीवपणा. **रूढपण उचिता दिसे भलें** = आचरणयोग्य अशा गोष्टीना रुळवून या ग्रंथानेंच लोकमान्यता मिळवून दिली.

(१०) **कळाविदपण** = कलेचें ज्ञान, कौशल्य. **आगळा** ( ळी ) = अधिक, विशेष. **अवलीळा** = सहज. महाभारतामुळें कलाभिज्ञता वाढली. पुण्याचें सामर्थ्य वाढलें; म्हणूनच सर्पसत्रामध्यें जी सर्पहत्या झाली त्या पापांतून जन्मेजय राजा महाभारत श्रवणानेंच मुक्त झाला.

(११) **नावेक** = क्षणभर. **आगळिक** = अधिकपणा, प्रकर्ष, रंगाच्या ठिकाणीं सुरंगतेची वाढ झाली. ( रंग म्हणजे वर्ण कीं आनंद ? ) **सुरंगता** = गहिरेपण. रंगाच्या ठिकाणीं अधिक गहिरेपण आलें. **बिक** = तेज किंवा बळ. **बहुवस**=पुष्कळ. गुणांना सद्‌गुणाचें बळ ( चांगुलपणाचें सामर्थ्य ) येथेंच प्राप्त झालें. गुणांचा गुणपणा महाभारतानेंच पटवून दिला. त्यामुळें सद्‌गुणांची मान्यता वाढली.

(१२–१८) या ओव्यांत सुंदर दृष्टांत देऊन व्यासांच्या कर्तृत्वाची महति वर्णिली आहे. व्यासांच्या वाणीनें सारें विश्व सुसंस्कृत नि तेजस्वी करून टाकलें आहे, असा भाव. (१२) **धवळलें** = प्रकाशमान झालें. शोभायमान व तेजस्वी दिसूं लागलें. **कवळलें** = व्यापलें. (१३) **सुरवाडलें** =

सुखी झालें. **अर्थजात** = सारे विषय. (१४) **नागर** = सुसंस्कृत. (१५) **प्रथमवयसाकाळीं** = तारुण्याच्या प्रथमावस्थेंत. **नव्हाळी** = नवा बहर. (१६) **माधवी** = जाईची वेल. **आदिलापासोनि अपाडें** = पहिल्यापेक्षां अधिक. (१७) **घनीभूत सुवर्ण** = सोन्याची लगड किंवा चीप, पाटयाच्या स्वरूपांतलें सोनें. (१८) व्यासवाणीनें अलंकृत झाल्यावर अपेक्षित असा चांगलेपणा (**बरवेपण**) प्राप्त होतो; हें जाणूनच जणूं कांहीं पूर्वींपासून चालत आलेल्या कथांनीं (**इतिहासीं**) महाभारताचा आश्रय केला.

(१९) **पुरतिये** = पूर्ण. **सानीव** = लहान रूप. **आख्यान** = कथा गोष्ट. पद्म, अग्नि, भविष्य इत्यादि अनेक पुराणांतील कथा महाभारतांत लहान लहान आख्यानांच्या रूपानें आल्या आहेत; त्याला अनुलक्षून कवीनें ही कल्पना मांडली आहे.

(२०) **व्यासोच्छिष्ट जगत्रय** = वेद, शास्त्रें, कला, इतिहास, पुराणें या सार्‍यांचा कमी अधिक आशय महाभारतांत असल्यानें त्यासंबंधीं पुढें जें लिहिलें गेलें तें सारें 'व्यासोच्छिष्ट'च होय, अशा अर्थानें हा वाक्प्रचार रूढ झाला. मुक्तेश्वरानें आदिपर्वाच्या प्रास्ताविक भागांत याच कल्पनेचा अनुवाद केला आहे. 'म्हणोनी भारतीं न दिसे कांहीं । तें ब्रह्मसृष्टींत जन्मलें नाहीं । शब्दब्रह्मीं असें तें पाहीं । सांठवलें भारतीं ॥ ( आदिपर्व—१–१११ )

(२१) **परमार्थ** = श्रेष्ठ अर्थ (ध्येय) = मोक्ष. (२२) मोक्षदायी अशी ही रसाळ कथा वैशंपायन मुनीनें जन्मेजय राजाला सांगितली. ती अलौकिक, सर्वोत्कृष्ट, परमपवित्र व मंगलकारक अशी कथा आतां ऐका ( **अवधारिजो** ).

---

# ३ गीता-गौरव

ज्ञानेश्वरीच्या वाचकांना मूळ गीतेची महति पटवून देणें इष्ट असल्यानें ज्ञानेश्वरीमध्यें ठिकठिकाणीं गीतेविषयीं गौरवाचे उद्गार ज्ञानेशांनीं काढले आहेत. त्यांपैकीं पहिल्या व शेवटल्या अध्यायांतील कांहीं भाग या ठिकाणीं घेतला आहे.

— १ ते १२ ओव्या —

पहिल्या अध्यायांतील प्रास्ताविक भागांत महाभारताची प्रशंसा केल्यानंतर ज्ञानेश्वरीचा आधारग्रंथ अशी जी गीता तिचा गौरव ज्ञानेश्वरांकडून केला ज.णें उचितच ठरतें. मागील उताऱ्याच्या पुढेंच (अ. १–५०–५५) एक दोन रूपकांच्या आधारें भगवद्गीतेचें वैशिष्ट्य त्यांनीं वर्णिलें आहे.

(१) भारतकमलपरागु = (हा पाठ रूपकाच्या दृष्टीनें अधिक सार्थ वाटतो.) भारतरूपी कमलांतील पराग म्हणजे गीता. महाभारतांतील भीष्मपर्वांतर्गत गीतेचें मध्यवर्ति स्थान लक्षांत घेतां कमलाच्या गाभ्यांतील पुष्परजाचें रूपक अगदीं योग्य वाटतें. गीताख्यु = गीता नांवाचा. (२–३) व्यासांच्या प्रतिभेनें शब्दब्रह्म (वेद) रूपी सागराचें मंथन करून महाभारतासारखें नवनीत वेगळें काढलें. तें ज्ञानाग्नीवर चांगलें काळजीपूर्वक कढविल्यावर त्याचें गीतारूप साजूक तूप बनलें, असें हें सांग रूपक आहे. अगोदरच्या रूपकांतील क्रम (भारत = कमल. पुष्परज = गीता) लक्षांत घेतां 'नवनीत हें' याचा संबंध गीतेऐवजीं महाभारताकडेच लावणें इष्ट वाटतें. नवनीताचा अर्क किंवा परिपाक म्हणजे तूप त्याप्रमाणें महाभारताचें सार किंवा परिपाक म्हणजे गीता. निरवधि = अमर्याद. कडसणें = कढविणें. विवेकें = सारासार विचारानें, काळजीपूर्वक. (४) विरक्त, संत, जीवन्मुक्त अशा सर्वांचाच गीता हा आवडता ग्रंथ आहे. साजूक तुपाची मागणी जशी सारे लोक

करतात, मोठमोठ्यांकडून त्याचा आस्वाद घेतला जातो. तसेंच **गीतेचें** आहे असा भावार्थ. **सोहंभावें** = सः अहं = 'तेंच मी आहे' अशा भावनेनें. **पारंगती** = भवसागराच्या पार गेलेले जीवन्मुक्त. **रमिजे जेथ** = ज्या आत्मपदाच्या ठिकाणीं रमतात. ४-५ ओव्यांतील 'जें...तें' हीं सर्वनामें गीतेचा विषय जो 'आत्मा' त्याचा निर्देश करतात. (६) **ब्रह्मेश** = ब्रह्मा आणि शंकर. **सनकादिक** = सनक, सनंदन, सनत्सुजात व सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र होत. महाभारतांत एक सनत्सुजातीय पर्व आहे. गीतेचे प्राचीन अभ्यासक म्हणून त्यांचा येथें उल्लेख आला आहे.

(७-१२) यापुढील सहा ओव्यांत गीतेचा आस्वाद कसा हळुवार पद्धतीनें घ्यावा हें अगदीं काव्यमय भाषेंत ज्ञानेश्वर सांगत आहेत. या ओव्यांवरून ज्ञानेशांच्या कविहृदयाची ओळख पटेल व त्यांची रसिकांबद्दलची कल्पनाहि समजून येईल. (प्रस्तावना पहा). (७) **मवाळें मनें** = मौआलें = मृदु, हळुवार मनानें. **तलगें** = पिलें. (९) गीतेंतील तत्त्वज्ञान इंद्रियगम्य नसून हृदयगम्य आहे. शब्दांची त्याला जरूरी नाहीं. बोलायच्या आधींच त्यांतील सिद्धान्तांना एकाग्र व हळुवार अन्तःकरणानें आत्मसात् करून घेतां येतें. **झोंबिजे**–लगटले जातात. (१०) अहिंसेच्या वर्णनाचे वेळीं या सारखाच दृष्टांत ज्ञानेश्वर देतात. पहा—'कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबैल केसर। इया शंका ॥' (अ. १३-२४६) (११) **कुमुदिनी** = चंद्रविकासी कमलिनी. (१२) **थिरावलेनी** = स्थिरावलेल्या, शांत झालेल्या (मनानें). **इयें मानूं** = गीतेला जाणूं शकतो.

—१३ ते २७ ओव्या—

**'सर्वधर्मान् परित्यज्य' या श्लोका— (अ. १८-६६) वरील व्याख्यानाचा 'एवं वेदाचें मूळसूत्र...श्रीकृष्णें गीताशास्त्र। प्रकट केलें ॥' असा समारोप केल्यावर 'वेदाचे तिन्ही भाग। गीते उमटले असती चांग' हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठीं ज्ञानेश्वरांनीं प्रत्येक अध्यायांतील आशयाची माहिती देणाऱ्या अशा वीस एक ओव्या**

लिहिल्या आहेत. (१८-१४३५-१४५५) त्यानंतरच्या पंधरा ओव्या येथें घेतल्या आहेत. यापूर्वीच्या भागांत ' वेदांचें मूळसूत्र ' किंवा 'गीता मूळभूत वेदां' असे उल्लेख आलेच आहेत. येथेंहि ' हा औदार्यें आगळा वेदु ' असें गीतेचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. त्याचें स्पष्टीकरणच प्रस्तुतच्या उताऱ्यांत पाहावयास मिळतें.

(१३) **सकळ + सांख्य + सिंधु** = सर्व ज्ञानाचा समुद्र. ( सांख्ययोग= ज्ञानयोग ). **आगळा** = विशेष, अधिक. (१४) चार वर्णांपैकी शूद्रांना वेदपठणाचा अधिकार नाहीं. वेद हे त्रैवर्णिकांपुरतेंच ज्ञान देतात म्हणून ते कृपण. (१५) **अनवसरू** = ( अनधिकारित्व हीं ) अडचण. (१६) **भलतेणें** = वाटेल त्यानें. **वेठणें** = मूर्त होणें, आकारास येणें.

(१७-१८) श्रवण, पठण, अर्थ-विवरण, लेखन अशा कोणत्याहि प्रकारें व कोणींहि गीतेची सेवा केली तरी गीता मोक्षच देते, हें गीतेचें औदार्य. (१९) गीतेनें जणूं कांहीं सांसारिकांसाठीं मोक्षसुखाचें चांगलें अन्नछत्रच उघडलें आहे. कोणींहि यावें आणि तृप्त होऊन जावें. **मिसकट** = निमित्त. **चोहटा** = चव्हाटा. **गवादी** = अन्नछत्र. **चोखटें** (डें) = शुद्ध, चांगलें. (२०) पक्षी, प्राणी किंवा रविकिरण यांना आकाशाकडून समान दृष्टीनेंच वागविण्यांत येतें असा भावार्थ. (२१) **कैवल्य** = मोक्ष. **सरिसें** = सारखें. (२२) **कुटी** = निंदा. **गोमटी** = चांगली. (२४) **वत्साचेनि वोरसें** = गाईच्या वासरासाठीं गाईला जो पान्हा फुटतो त्यामुळें. (२५) **कणव** = दया. **चराचर** = सर्व स्थावरजंगम जग. (२६) **अनन्यगती** = एकनिष्ठ. (२७) **व्याजें** = मिषानें, निमित्तानें. **एसणें** ( पाठभेद ) = एवढें.

[ ओव्या २४, २५, २६ यांमध्यें ज्या प्रकारचे दाखले दिले आहेत तसेच दाखले पुन्हां ३१-३२ या ओव्यांमध्यें आले आहेत. अर्जुनाच्या निमित्तानें श्रीकृष्णानें गीता सांगितली पण तिच्यामुळें जगाचा उद्धार झाला; हाच विचार या पुढील उताऱ्यांत सांगितला आहे. दोन्ही उतारे एकाच अध्यायांतील आहेत. मात्र दोहोंत दोनशेंच्यावर ओव्यांचें

अंतर आहे. तरी विचार, कल्पना, दृष्टान्त यांची पुनरावृत्ति किंवा यांतील सादृश्य लक्षणीय आहे. ]

—२८ ते ३९ ओव्या—

अध्याय १८ मधील शेवटच्या समारोपाच्या भागांतील या ओव्या आहेत. 'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः' या गीतेच्या शेवटल्या श्लोका—(अ. १८-७८) वरील टीकेचा 'व्यासशिष्य संजयाचा। पूर्णोद्गारू जो ॥ (१८-१६६२) असा समारोप ज्ञानेश्वरांनीं केला आहे. या एका श्लोकाचें महत्त्व वर्णन करतां करतां यापुढील भागांत गीतेच्या ७०० श्लोकांची महति वर्णन करण्यासाठीं उत्प्रेक्षांची सुंदर मालाच ज्ञानेशांनीं येथें गुंफिली आहे. (१६६४–१६७६) पण या श्लोकामध्यें श्रेष्ठत्वाच्या दृष्टीनें 'पहिलें सरतें' असा किंवा दुसरा कांहीं भेदाभेद करणें योग्य नाहीं; हा विचार सुचून 'येथें जें अर्थें तेंचि पाठें' अशी फलश्रुति ज्ञानेश्वर सांगतात. त्याप्रमाणेंच वाच्य व वाचक असा भेदहि येथें करून उपयोगी नाहीं; कारण दोन्हीहि एक श्रीकृष्ण परमात्माच आहे. एवढें अद्वैत साधणारी ही गीता आहे तेव्हां तिचें आणखी समर्थन किंवा महत्त्ववर्णन काय करावयाचें ? असा सवाल विचारून पुन्हां गीतेचा गौरव ज्ञानेश्वर करूं लागले आहेत. प्रस्तुत उतारा (अ. १८–१६८४-९५) त्याच ओघांतील आहे.

(२८) गीता ही श्रीकृष्णाची शब्दमय मूर्तिच होय. (२९) गीता म्हणजेच परमात्मा किंवा परब्रह्म होय. अद्वैताची परमावधि साधण्यासाठीं ही कल्पना ज्ञानेश्वर मांडतात. पण ग्रंथकर्तृत्व व व्यक्तित्व यांचें एकरूपत्व साहित्यिक दृष्टीनेंहि मान्य होण्यासारखें आहे.

(३०–३३) अर्जुनाच्या निमित्तानें निर्माण झालेल्या गीतेनें साऱ्या विश्वासाठीं ब्रह्मानंद सुलभ करून ठेवला आहे. याला दिलेले दाखले मोठे समर्पक आहेत. (तुलना पहा—ओव्या २४, २५, २६.) (३०) **कळावंतें चंद्रें** = कलांनीं युक्त अशा चंद्रानें. (३१) **गौतम**– एका ऋषीचें नांव.

भगीरथाप्रमाणेंच या ऋषीनें तप करून शंकरास प्रसन्न करून घेतलें व गोहत्येच्या क्षालनार्थ गंगा मागितली. शंकरानें गौतमास गंगा दिली. शंकरांनीं जटेंतील गंगा खालीं टाकली; ती गंगाद्वारांतून वाहात येऊन कुशावर्तांत पडत आहे. तीच गौतमी नदी होय. अशी कथा पद्मपुराणांत दिली आहे. ( अधिक माहितीसाठीं पद्मपुराण उत्तरखंड २६८-५२-५४ पाहा. किंवा ज्ञानेश्वरी—दांडेकर-प्रत पान ८६४ पहा). (३३) या ओवीं-तील वत्स = पार्थ. गाय = श्रीकृष्ण. गीता = दूध. हें रूपक पुढील संस्कृत श्लोकांतील रूपकावरून सुचलें असेल काय ? कीं ज्ञानेशांच्या ओवीवरून पुढील श्लोक संस्कृतज्ञ पंडितानें जुळविला असेल ? श्लोकाचा काल अनिश्चित म्हणून निर्णय करणें अशक्य. 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः। पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥' ज्ञानेशांनीं या रूपकांतील कल्पनेचा अनेक ठिकाणीं जरा भिन्नार्थानें उपयोग करून घेतलेला दिसतो. ( प्रस्तुत उतारा ओंवी २४ पहा ).

(३४–३७) कोणच्याहि रूपांत गीतेची तुमच्याकडून भक्ति घडली तरी मोक्ष हेंच फल तिच्याकडून तुम्हाला मिळणार. हाच विचार पुन्हां एकदां येथें स्पष्ट केला आहे. ( ओव्या १८–१९ तुलून पाहा. ) (३४) **तिंबणें** ( तिमणें ) = भिजविणें. **कीर** = खरोखर, निश्चयानें. (३५) सुवर्ण—परिस यासंबंधींच्या दृष्टांतांतील कल्पना पहिल्या उताऱ्यांतील 'परिसीं लोहा घृष्टीं किती। वेळवेळां कीजे गा ?' ( मंगलाचरण ओवी २८ ) या ओवींतील कल्पनेशीं जुळती आहे. या सवालाचें उत्तरच प्रस्तुत ओवीनें दिलें आहे. **एकें अंशें** = एका भागानें, एका बाजूनें. **आपैसें** = आपोआप. (३६) **श्लोकपाद**—श्लोकाचे चरण. **ब्रह्मतेची पुष्टी** = ब्रह्मरूप-तेचें बाळसें. (३७) **ठाकाल कानवडे** = एका अंगावर पडून रहाल; तोंड फिरवून बाजूला झाल्यानें कान गीतेकडे होतील तेव्हां पठण नाहींतर श्रवण तरी घडेलच असा भाव. या ठिकाणीं शाब्दिक कोटी केली आहे. (३८) **आरौतें**–( मोक्षाच्या ) अलीकडलें ( फल ), = कमी प्रतीचें फल. (३९) **जाणतया सवा** = ज्ञान्याबरोबर. **येरीं शास्त्रीं** = इतर शास्त्रें.

---

# ४ व्यासाचा मागोवा

गीतेचा महिमा वर्णन केल्यानंतर त्याच ओघांत ज्ञानेशांनीं गीताकार श्रीव्यास महर्षी यांची थोरवी गाइली आहे. मागील उताऱ्याच्या पुढचाच भाग येथें घेतला आहे. (अ. १८-१६९६-१७२३) व्यासांबद्दलचा आदरभाव, त्यांच्या श्रेष्ठ कार्याबद्दलची कृतज्ञताबुद्धि, आणि अभिजात विनित वृत्ति, ज्ञानेशांच्या या गुणांचें मोठें विलोभनीय दर्शन या उताऱ्यामध्यें रसिकांना घडेल.

(१) **मोकळी गोठी** = मनमोकळ्या गोष्टी. गीता संवादात्मक आहे. संवादामध्यें तसा बांधिवपणा नसतो. उलट त्या गप्पांमध्यें मनमोकळेपणा असतो, त्या अभिप्रायानें 'मोकळी' हा शब्द येथें योजला असावा. (गोठी) **चावळिली निराळी** = वेगवेगळ्या गोष्टी बडबडल्या (बोलल्या गेल्या). चवलणें = बडबड करणें. [**वच** > **वाचाळी** (ओवी १४ पहा) > **चावळी** ] 'वच' पासून वर्णविपर्ययानें हा शब्द सिद्ध झाला असावा. 'ज्वराचेनि आटोपें। रोगी भलतैसें जल्पे। **चावळती** (चंवलती) संकल्पें। जाण तैसे' (१६-३६४)

(२) **वोरसें** = प्रेमानें (वोरस = पान्हा, प्रेम). (३) **आपैतेपण** = स्वाधीन असें. **विंजण** = पंखा. (४) शब्दांपलिकडचें आत्मज्ञान स्त्रीशूद्रादिकांच्या बुद्धीला समजेल असें गीतेनें सोपें केलें असा भावार्थ. या संदर्भात 'वेदु वेठला भलतेणें। सेव्य होआवया' किंवा 'म्हणौनि वेदाची सुसेव्यता। ते हे मूर्त जाण श्रीगीता' या गीता-गौरवाच्या ओळी लक्षांत घ्याव्या. या एकाच कारणासाठीं गीतेची महति व व्यासांची थोरवी ज्ञानेश्वरांना वाटते असें दिसतें. व्यासांचें हें कर्तृत्व केवळ्या योग्यतेचें आहे, हें सांगण्यासाठीं मोठे काव्यमय दृष्टांत पुढील तीन-चार ओव्यांत ज्ञानेशांनीं दिले आहेत.

(६) **गोचरु** = दिसणारा, प्रत्यक्ष अनुभवाचा (इंद्रियग्राह्य) विषय. घेपता = घेतां (येणें). **आमोदु** = सुवास.

(७) **फावती** = प्राप्त होती. (फाव = अनुभव. फावणें = अनुभवास येणें).

(८) **उपास्ती** = उपासना, आचरण. **आकळणें** = जाणणें. **काह्या** = कशाकरितां. **द्रष्टा** = पहाणारा आत्मा. आत्मस्वरूप अशा गुरुमूर्तीनें दृश्याच्या मार्गांत प्रवेश केला नसतां (म्हणजे सगुण, साकार स्वरूप धारण केलें नसतें) तर तिला उपासना मार्गानें कसें जाणून घेतां आलें असतें !

(९) **वस्तु** = ब्रह्म. **असंख्यात** = अपार, अमर्याद. **फावों शकतें** = अनुभवास येऊं शकलें असतें.

(१०) **उमप तें नोहे । ठाकतें कोण्हा** = जें अमर्याद (उमप) आहे तें कोणाला प्राप्त करून घेतां येत नाहीं. (**ठाकणें** = प्राप्त होणें)

(११) **वाचा जें न पवे तें** = वाणीला जें प्राप्त होत नाहीं तें. ब्रह्म वाणीच्या आटोक्यापलीकडचें आहे (शब्दें जें न लभे) 'यतो वाचो निवर्तन्ते ।' तें गीतेच्या ७०० श्लोकांत आल्यामुळें काना-तोंडानें आस्वादतां येण्यासारखें झालें, असा अर्थ.

(१२) कृष्णार्जुन संवादाचा गीताग्रंथ हें व्यासांचें कर्तृत्व विश्वावर उपकार करणारें आहे—हीच व्यास-महर्षींची थोरवी होय.

(१३) 'व्यासाचा मागोवा घेतु'—या चरणाचें हें स्पष्टीकरणच होय. 'व्यासाचीं पदें पाहतां पाहतां' असें जरी म्हटलें असलें तरी कांहीं ठिकाणीं स्वतंत्र दृष्टीनें ज्ञानेशांनी गीतेच्या शब्दांचा अर्थ केला आहे. (उदा० अ. २–२६०–६३. उतारा १४ पहा.)

(१४–२५)—व्यासकर्तृत्व आणि आपलें कर्तृत्व यांची तुलना करतांना ज्ञानेशांनीं आपल्याकडे कमालीचा कमीपणा घेतला आहे. त्यांच्या व्यक्तित्वांतील शालीनतेचेंच हें द्योतक आहे. मात्र गीतेवर टीका करण्याचें केलेलें आपलें धाडस समर्थनीय आहे; हें पटवून देण्यासाठीं ज्ञानेशांनीं लढविलेला काव्यमय युक्तिवाद मोठा पहाण्याजोगा आहे. शेवटीं गीतेचें मराठीकरण ही गोष्ट अनुचित म्हणतां येत नाहीं, असें स्पष्टपणें ज्ञानेश्वर सांगतात.

(१४) **उन्मेख** = ज्ञान. (१५) **ले** = धारण करी. (१६) **गजघटा** = हत्तींचा समुदाय. **मुरकुट** = चिलटें. (१७) **पांखफुटें** = पंख फुटलेलें.

(१९) **अवकाश** = पोकळी. (२०) **दिवियेचा** = दिवटीचा, मशालीचा. (२१) **पैसें** = विस्तार. **थिल्लर** = डबकें. (२२) **महामती** = विशाल बुद्धीचे, प्रतिभावान्. **ठाकों** = थांबावें. (२३) **मंदराकारें** = मंदार पर्वता-एवढें. **शफर** = एक प्रकारचा लहान मासा. (२५) **प्राकृतां** = सामान्य लोकांना, मराठी भाषिकांना.

(२६) **न लाहे पावो कायी** = पोहचतां येणार नाहीं काय ?

(२७) **भाष्यकारातें** (पाठभेद) = शंकराचार्यांना. भाष्यकारांतें = शंकर, रामानुज, इत्यादि भाष्यकारांना. ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानावर रामानुजादिकांचीहि छाप आहे; असें एक मत आहे. ( श्री. पांडुरंग शर्मांचे लेख पहा—चित्रमयजगत्. वर्ष १२ वें इ. स. १९२१ ऑगस्ट—सप्टेंबर—डिसेंबर.)

# ५ ज्ञानेशांचें प्रतिज्ञोत्तर

ग्रंथलेखनाची आपली भूमिका बहुधा प्रत्येक अध्यायांत ज्ञानेशांनीं स्पष्ट केली असली; तरी त्या दृष्टीनें सहाव्या अध्यायाचा प्रस्ताव विशेष महत्त्वाचा वाटतो. म्हणून तोच भाग पहिल्यांदा येथें घेतला आहे. त्यानंतर १३ व्या अध्यायांतील 'वाग्विलास विस्तारूं गीतार्थें विश्व भरूं' अशी घोषणा असलेला ११ ओव्यांचा एक ल्हानसा भाग याच उताऱ्याला जोडण्यांत आला आहे. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाच्या सुरुवातीला 'हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड ऐका' असें ज्ञानेशांनीं म्हटलें आहे. त्यांतील 'प्रतिज्ञोत्तर' या शब्दाचा प्रस्तुत उताऱ्याला मथळा देतांना उपयोग केला आहे.

(१) **योगरूप अभिप्रावो** = सहाव्या अध्यायांत हठयोगाचें विस्तारानें विवेचन आलें आहे. पहिल्या ओवींतच प्रस्तुत अध्यायांतील त्या विषयाचें सूचन ज्ञानेशांनीं केलें आहे.

(२-९) कृष्णार्जुन संवादांतून ज्ञानामृताची मेजवानी संजयाला मिळत होती. त्याबद्दलचा आनंद तो येथें व्यक्त करीत आहे, परंतु मुलांविषयींच्या मायेनें घेरला गेलेल्या धृतराष्ट्राला तें कांहीं मानवत नाहीं. तेव्हां 'म्हातारा मोहें नाशिला' असा स्पष्ट अभिप्राय संजयाच्या तोंडीं ज्ञानेशांनीं घातला आहे. सहज जातां जातां धृतराष्ट्राची व्यक्तिरेखा रेखाटण्याचें कवीचें कौशल्य येथें दिसून येतें.

(२) **ब्रह्मरसाचें पारणें** = आत्मज्ञानाची मेजवानी. [**पारणें** = (अज्ञान-रूपी) उपवासानंतरचें जेवण.] (४) **आडमुठी** = अनायासें. **फावलें** = प्राप्त झालें; अनुभवास आलें. (५) **चोजवलें** = समजलें. (६) **अवसरीं (ये)** = या वेळीं. (७) **जात्यंधा कैसें पाहेल** = जन्मांधाला कसें उजाडेल ? **से घेईल** = राग धरील. **बिहे** = भ्यायला. (८) **निकियापरी** = चांगल्या प्रकारें. (९) **धालेपणें** = तृप्तीनें. **साभिप्राय अंतःकरणें** = मनामध्यें सारा आशय सांठवून.

(१०–१३) सहाव्या अध्यायाचें महत्त्व या ओव्यांत सांगितलें आहे. ‘ आत्मसंयमयोगो नाम षष्ठोध्यायः ’ असें गीतेनें या अध्यायाचें नामकरण केलें आहे. त्याचेंच स्पष्टीकरण येथें आहे. (१०) **आयणी** = चातुर्य, बुद्धि. (११) **पार** = किनारा. **योगविभवभांडार** = अष्टांग योगाच्या ऐश्वर्याचें कोठार. या ओवींतील ‘ विवेकसिंधू ’ हा शब्द मुकुंदराजांच्या ग्रंथाची आठवण करून देणारा आहे म्हणून हा उल्लेख चिन्त्य वाटतो. (१२) **आदिप्रकृति** = मूळमाया. **ठाणें** = उत्कर्ष. **प्ररोहो पावे** = वाढीस लागतें. (१३) **साहित्याचिया बरवा सांगिजेल** = साहित्याच्या दृष्टीनें देखील तो (अध्याय) सुंदर करून सांगितला जाईल. ही प्रतिज्ञा ज्ञानेशांनीं खरी करून दाखविली आहे. हठयोगासंबंधीचें इतकें काव्यमय व सोपें व्याख्यान इतरत्र कुठेंहि पहायाला मिळणार नाहीं.

(१४–२२) या ओव्यांवरून ज्ञानेशांची साहित्यिक दृष्टि स्पष्ट होते. ( प्रस्तावना पाहा. ) अमृताहूनहि रसभरित अशी मराठी भाषा सहजपणानें लिहून दाखविण्याची ज्ञानेशांची प्रतिज्ञा सर्वविश्रुत आहे. आणि त्या प्रतिज्ञे-नुसार खरोखरच त्यांनीं मराठी भाषेचें तें अलौकिक सामर्थ्य आपल्या ज्ञानेश्वरी ग्रंथांत प्रकट केलें आहे, याबद्दल कुणाचेंहि दुमत नाहीं.

(१४) **पैजासीं** = पैजेनें, प्रतिज्ञेनें. (१५) **पाडें** = मानानें, तुलनेनें. **नादींचे रंग** = सुस्वरांचे निरनिराळे प्रकार. **बीक** = बळ, सामर्थ्य. **वेधें** = चित्ताकर्षकपणानें. (१६) **कळंभा** = भांडण. (१७) **विषो** = विषय. **भावो जाय** = भावना होते, अस्तित्व जाणवतें. (१८) **बोलतीये रेखेची वाहणी** (मार्ग) = बोलण्याच्या (ओळीची) वाक्याची पद्धत, शैली. **धणी पुरों लागे** = तृप्तीचा पुरवठा होऊं लागतो, तृप्ती होते. (२०) **आपुलालिया भावीं** = आपापल्या इच्छेप्रमाणें **चेववी** = जागृत करी. (२१) **पाहतयां** = पाहणाराला, विचार करणाराला **भावज्ञां** = अभिप्राय जाणणारा; गुणज्ञ. **फावती** = अनुभवास येती **चिंतामणी** = सर्व इच्छा पूर्ण करणारें रत्न. (२२) **वोगरलीं** = वाढलीं **प्रतिपत्ति** = मेजवानी. **कैवल्यरस** = मोक्षरूप पक्वान्न.

(२३-३०) गीतेचा आस्वाद कसा घ्यावा हें ज्ञानेशांनीं पहिल्या अध्य

याच्या प्रस्तावांत जसें सांगितलें आहे; (अ. १-५६-६१) तसेंच ज्ञानेश्वरी कशी आस्वादावी हें अ. ६ मधील या ओव्यांत ते सांगत आहेत. मात्र केवळ आस्वाद घेण्याची रीतच तेवढी येथें सांगितली नसून आस्वाद-योग्यतेचा दंडकहि त्यांनीं सांगितला आहे. अधिकारी श्रोत्यांखेरीज अध्यात्मज्ञानाच्या या मेजवानीत दुसऱ्या कोणाला बसतां येणार नाहीं, असें त्यांनीं स्वच्छ म्हटलें आहे. काव्यमय दृष्टांत व मृदुमधुर भाषा नेहमीं-प्रमाणें त्यांनीं येथें वापरली असली तरी श्रोत्यांच्या पात्रापात्रतेबद्दलचा त्यांचा इषारा अगदी स्पष्ट व पूर्णपणें न्यायनिष्ठुर वृत्तीचा द्योतक असाच आहे. ' अध्यात्मशास्त्रीं इयें। अंतरंगचि अधिकारिये । (अ. १८-१७४९) हाच मुद्दा त्यांनी ओव्या २८, २९, ३० यांमध्यें मांडला आहे. गीतेच्या आस्वाद-पद्धतीत ज्या हळुवारपणाची व इंद्रियातीतपणाची अपेक्षा आहे तसलीच अपेक्षा येथेंहि असल्याचें ओव्या २३ ते २६ यांवरून दिसून येतें. ( गीता-गौरवांतील ७ ते १२ ओव्यांशीं प्रस्तुतचा भाग तुलून पाहावा. )

(२३) **ठाणदिवी** = एके ठिकाणींच असणारा स्थान-दिवा. (२४) **पांगेंवीण** = दौर्बल्यविरहित, इंद्रियांना न कळत आत्मज्ञानाच्या प्रकाशां-तच मोक्षरूप पक्कान्नाची मेजवानी झोडायची असल्यानें नुसत्या श्रवणानें येथें भागणार नाहीं. कान इथें दुबळे आहेत. तें दौर्बल्य टाकून मनाच्या अंतर्मुखतेनेंच या मेजवानीचा आस्वाद घ्यावयाचा आहे. (२५) **आहाच** = वरवरची. **वालीफ** (वालीप) = आच्छादन, गवसणी. **सुरवाडिजे** = रंगून जावें. शब्दांचें वरवरचें आच्छादन दूर करून ब्रह्म-रूपच व्हायचें म्हणजे मग सुखामध्येंच सुखानें रंगून जातां येतें असा भाव. (२६) **उपेगा** = उपयोग. (२७) **कडसावें** = निवडावें. कामना-शून्य अन्तःकरणाचे लोकच या विषयांत अधिकारी आहेत, तेव्हां श्रोत्यां-मध्यें निवडानिवड करण्याची जरूरी नाहीं. सारेच निरपेक्ष बुद्धीनें येथें आले आहेत. श्रोत्यांना हें प्रशस्तीपत्रच आहे.

(२८) **कुरोंडी** = कुरवंडी, ओवाळून टाकून देण्याचा बळी.

(२९) **प्राकृत** = अज्ञानी. **हिमांशु** = चंद्र. **खाजें** = खाद्य. अशाच संद-

भांत इतरत्र चकोराचाच दृष्टांत आला आहे. उदा०—'चंद्रातें आंगवणें। भोगूनि चकोर शाहाणे' (अ. १८-१७४८).

(३०-३१) जाणत्यांना ठाऊक असलेलाच हा विषय आहे. पण अज्ञानी लोकांना मात्र एखाद्या अनोळख्या ठिकाणासारखा हा वाटणारा आहे. त्यामुळें विशेष बोलण्यासारखा हा विषय नाहीं. पण प्रसंगानें या विषयाचा अनुवाद मी केला आहे. संतश्रोत्यांनीं त्याबद्दल क्षमा करावी. अशी विनवणी करून पुन्हा सहाव्या अध्यायांतील विषयाचें (हठयोगाचें) काठिण्य ज्ञानेश्वर वर्णन करूं लागतात. त्याबरोबर गुरुकृपेची महतीहि ते सांगतात.

(३२) सांकडें = (संकटासारखें) कठिण. विपायें = कदाचित्, क्वचित्.

(३३) इंद्रियांच्या आटोक्यापलीकडचें ज्ञानबळ गुरुकृपेनें प्राप्त झालें की चर्मचक्षूंना न दिसणाऱ्या गोष्टीहि दिसूं लागतात.

(३४) गुरूच्या बाबतीत परिसाचा दाखला अनेकदां दिलेला आढळतो. (उतारा १-२८; पहा) धातुवाद = किमया. (साडें) पंधरें = उत्तम, शंभर नंबरी सोनें. (३५) आपु = आपलेसें होणें, प्राप्त होणें.

(३६) अलोट अशी गुरुकृपा आपल्या पाठीशी आहे, अशा विश्वासानेंच ज्ञानेश्वर ही प्रतिज्ञा करित आहेत, कीं अरूप अशा ब्रह्माचें रूप मी येथें स्पष्ट करीन व इंद्रियातीत असलेलें ब्रह्मसुख इंद्रियांचा विषय करीन.

—ओव्या ३७ ते ४७—

**तेराव्या अध्यायांतील समारोपाच्या भागामध्यें पुन्हां ज्ञानेशांनीं प्रतिज्ञा-वचनांचा उच्चार केला आहे. आपल्या गीताटीकेचें वैशिष्ट्यहि स्वतःच ते वर्णन करीत आहेत. त्यावरून त्यांचा स्वतःबद्दलचा जबरदस्त आत्मविश्वास दिसून येतो.**

(३७) अप्रांतमति=अमर्याद (विशाल) बुद्धि. (३८) नागरीं बोलीं = सुसंस्कृत, सुंदर शब्दांनीं. प्रबंधु = काव्यग्रंथ. (३९) आणिजेल वाक्पथा = (शांतरसपूर्ण कथा) वाणीच्या मार्गास आणली जाईल; शब्दांनीं सांगि-

तली जाईल. (४०) **वेल्हाळ** = सुंदर. **वोजावी** = सजवी, तेजस्वी करी. (४१) **वोल्हावणें** = शांत होणें. **उमाणे**=बरोबरी (करी). **रसरंगीं** = रसोत्कर्षांत. **भुलवणें** = भूल घालणारी मोहक शक्ति. (४२) **खेचर** = आकाशमार्गे भ्रमण करणाऱ्या गंधर्व किन्नरविद्याधरादि योनी. पिशाचादि अन्न योनी. **सुमना** = शुद्ध अंतःकरणाच्या लोकांना.

(४३) **वाग्विलास** = वाणीचा विलास, काव्य ( लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ।। अ. १८–१७५० ) गीता-टीकेचा उद्देश सारें विश्व गीतार्थमय करणें हाच. 'आनंदाचें आवारूं । मांडूं जगा' ('अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक'–ज्ञानदेव गाथा अभंग २२ व ५७५). ही प्रतिज्ञा ज्ञानेशांच्या जीवितध्येयाशीं सुसंगत आहे.

(४४–४५) या दोन ओव्यांत जणूं कांहीं **पसाय** (प्रसाद) **दानच** मागितलें आहे. (४४) **फिटो** = उघडो. **जिणी** = जन्माची सफलता, जगण्याचें सार्थक. (४५) **रिघो** = प्रवेश करो. **पाहो** = उजाडो. (पाहणें = उजाडणें). (४७) **सुभेदीं अक्षरीं** = मर्मग्राही अशा शब्दांनीं. **उपमा श्लोक** ( श्लेष- –पाठभेद ) = उपमादि ×अलंकारांची म्हणजेच काव्याची रेलचेल ( कोंदाकोंदी ) करून, **झाडा देईन प्रतिपदीं** = प्रत्येक पदाचा अर्थ स्पष्ट करीन.

# ६ गुरुकृपेचें सामर्थ्य

ज्ञानेशांनीं आपलीं प्रतिज्ञावचनें गुरुकृपेच्या बळावरच सिद्धीस जाणार असा विश्वास प्रस्तुतच्या उताऱ्यांत व्यक्त केला आहे. अठराव्या अध्यायांतील समारोपाच्या भागांत गुरूच्या व्यापक सामर्थ्याचें वर्णन ज्ञानेश्वर करीत आहेत, त्यांपैकीं १२ ओव्या येथें घेतल्या आहेत. गीतागौरवांतील शेवटचा भाग व व्यासाचा मागोवा यांना जोडूनच या ( १७२३–३४ ) ओव्या आहेत.

(१–५) गुरुकडूनच क्षमाशीलता प्राप्त झाल्यामुळें तिच्या बळावर पृथ्वी न कंटाळतां सर्व चराचर सृष्टीचें ओझें धारण करतें. तसेंच चंद्राची शीतलता, सूर्याची प्रकाशमानता, समुद्राचा जलसंचय, पाण्याची गोडी, माधुर्याची सुंदरता, वाऱ्याचा जोर, आकाशाचा विस्तार, ज्ञानाची उज्वलता, वेदांचें वक्तृत्व, सुखाचा आनंद, विश्वाची साकारता इत्यादि मूर्त-अमूर्त गोष्टींचीं तीं तीं वैशिष्ट्यें गुरुकृपेमुळेंच त्यांना प्राप्त झालीं आहेत. सारांश, सर्वांचें अस्तित्व, सर्वांचा आधार श्रीगुरुच होय असा भावार्थ.

(१) नुबगे = कंटाळत नाहीं. (२) आंगिक अंशिकें = अंगचें अंशभर ( तेज ) . अर्क = सूर्य. सावाइकें = अडचण. (३) तोय = पाणी. (४) पवन = वारा. पघळ = विस्तृत. उजाळ = उज्ज्वल, प्रकाशमान. चक्रवर्ति = सार्वभौम, सर्वश्रेष्ठ. (५) सुभाष = चांगलें बोलणारा. सोल्लास–आनंद, प्रसन्नता. (६) रिघोनियां = प्रवेश करून. (७) भंगीं = रीतीनें, शैलीनें.

(६–९) अशा हृदयस्थ सद्गुरूच्या बळावर मी मराठींत गीतार्थ सांगतों आहे, यांत काय आश्चर्य ? असे कित्येक चमत्कार श्रीगुरूंनीं करून दाखविले आहेत त्यांपैकीं दोन पौराणिक कथांचा निर्देश ज्ञानेश्वर करतात.

(८) एकलव्य नांवाच्या एका कोळ्याला धनुर्विद्या शिकविण्याला द्रोणाचार्यांनीं नकार दिला. तेव्हां त्यानें द्रोणाचार्यांची मातीची प्रतिमा करून तिच्यापासून निष्ठेच्या बळावर सारी धनुर्विद्या उत्कृष्टपणें संपादिली.

तो पांडवांपेक्षां बलिष्ठ होऊं नये यासाठीं द्रोणाचार्यांनीं गुरुदक्षिणा म्हणून त्याच्या उजव्या हाताचा अंगठा तोडून मागितला तो त्यानें दिला. एकलव्याची ही स्मृति ठेवण्यासाठीं तेव्हांपासून कोळी–किरात हे आंगठा न लावतां बाण मारतात, असें सांगतात. कोळियें = कोळ्यानें, हा एकलव्याचा उल्लेख आहे. येकवद = एकवाक्यता. (त्रैलोक्याची मान्यता एकमतानें त्यानें मिळविली.) (९) वसिष्ठ गुरूंनीं आपल्या छाटीकडून (किंवा काठीकडून) सूर्याचें प्रकाश देण्याचें काम करवून घेतलें अशी एक कथा आहे. तिचा निर्देश करून ज्ञानेश्वर म्हणतात कीं, चंदनवृक्षाच्या आसपास असलेलीं इतर झाडेंहि चंदनाप्रमाणें सुगंधी होतात, ( 'यद्वत् श्रीखंडवृक्ष प्रसृत परिमले नाभितोऽन्येपि वृक्षाः '–शतश्लोकीः २ त्याप्रमाणेंच गुरूच्या सान्निध्यानें काठी किंवा छाटी यांसारखे निर्जीव पदार्थही सामर्थ्यवान् होतात.

(१०) गुरु नुसत्या कृपादृष्टीनें शिष्याला आपलें स्वतःचें पद प्राप्त करून देतात ( 'आपणासारिखें करिती तात्काळ' । ) दादुला = धनी, मालक. आथिला = ऐश्वर्यसंपन्न ( हृदयस्थ गुरुमुळें माझें चित्त ऐश्वर्यसंपन्न झालें आहे असा भाव.) (११) देखणी दिठी = डोळस किंवा प्रभावी दृष्टि. (१२) गुरुकृपेनें काय होणार नाहीं ! माझे क्षणाक्षणाचे श्वासोछ्वासहि गुरुकृपेच्या बळानें काव्यग्रंथ होतील; ( होआवे = व्हावेत ) अशी आपली उत्कट श्रद्धा ज्ञानेशांनीं येथें व्यक्त केली आहे.

—१३ ते २४ ओव्या—

बाराव्या अध्यायाच्या मंगलाचरणांत गुरुकृपादृष्टीला माउलीची उपमा ( १–७२ ) देऊन ज्ञानेश्वर तिचा जयजयकार करीत आहेत. त्या वेळीं हठयोगाच्या परिभाषेंतून आईच्या वात्सल्याचें रूपकात्मक दृश्य त्यांनीं उभें केलें आहे, तें मुळांतूनच पाहिलें पाहिजे. त्यापुढील बारा ओव्यांत ( ८–१९ ) गुरुकृपादृष्टीच्या बळावर उत्कृष्ट साहित्य निर्माण करीन व मऱ्हाटीच्या नगरींत ब्रह्मविद्येचा सुकाळ करून टाकीन; असा आत्मविश्वास ज्ञानेशांनीं प्रकट केला आहे. तोच भाग येथें घेतला आहे.

(१३) **साधकां** = भक्तांना. **सारस्वत** = वाङ्मय किंवा सर्व विद्या.

(१४) **कारुण्य** = करुणा, कृपा. **धाता** = निर्माता, ब्रह्मदेव.

(१५) **निज + जन + कल्पलता** = आपल्या भक्तांची इच्छा पूर्ण करणारी कल्पलता. ( अकल्पनाख्यकल्पतरो–उतारा १–१० )

(१६–२१) साहित्याच्या घटकांचा उल्लेख या ओव्यांत आला आहे. ज्ञानेशांच्या साहित्यविषयक कल्पना त्यावरून स्पष्ट होतात. (प्रस्तावना पहा)

(१६) **आगर** = खाण, मळा. '**रत्न**' या शब्दानें साहित्यांतील शब्दार्थालंकारांचा उल्लेख येथें अभिप्रेत असावा. **भावार्थ** = आशय. **निफजवीं** = उत्पन्न कर. (१७) **देशियेचिया क्षोणी** = मराठीभाषारूपी भूमीमध्यें. **सैंघ** = पुष्कळ. (१८) **गहन** = दाट. **संवाद** = 'सम्यक् वाद' अर्थनिर्णायक अशी प्रश्नोत्तररूप चर्चा; हठवाद्यांचा वितंडवाद नव्हे. **फळनिधानें** = फळांचा सांठा. **प्रमेयाचीं उद्यानें** = सिद्धांतरूपी झाडांच्या बागा. (१९) **पाखांड** = नास्तिक ( अवैदिक ) मतें. **दरकुटे** = दऱ्या. **वाग्वाद** = वितंडवाद. **अव्हांटे** = आडवाटा. **सावजें** = श्वापदें, हिंस्त्र जनावरें. **फेडीं.** = हुसकून लाव. (२०) **राणिवे** = राज्यावर. **श्रीकृष्णगुणीं** = श्रीकृष्णाच्या गुणवर्णनांत. **सरते करी** = समर्थ कर. (२१) **मऱ्हाठियेचां** = मराठी भाषेच्या (नगरांत). **ब्रह्मविद्या** = अध्यात्मज्ञान. ( 'अध्यात्मविद्या विद्यानाम्' ) **सुखाचि वरी** = केवळ सुखाचीच ( देवघेव व्हावी ).

(२२) वरील ओव्यांत आपल्या साहित्यविषयक अपेक्षा व्यक्त केल्यावर ज्ञानेश्वर 'आतांचि हें आघवें । निर्मीन माये' असें प्रतिज्ञावचन बोलून जातात; पण गुरुमाउलीनें आपल्या प्रेमाचें पांघरूण घातलें तरच हें शक्य आहे अशी अटहि त्यांनीं सांगून टाकली आहे. (२३) पण ज्ञानेशांसारख्या शिष्याची ती अट कोण पुरविणार नाहीं ? 'पाल्हाळ पुरे, आतां गीतार्थ सांग' या शब्दांनीं गुरु त्यांना प्रोत्साहन देतात. (२४) तोच आशीर्वाद ( महाप्रसाद ) असें मानून आनंदभरित होत्साते ज्ञानेश्वर म्हणतात कीं, 'आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥'

---

# ७ श्रोत्यांचा अधिकार

नवव्या अध्यायाच्या प्रस्तावांत ज्ञानेश्वर श्रोत्यांची विनवणी करीत आहेत. वक्ता, त्याचें वक्तृत्व आणि रसिक श्रोते यांच्यांतील परस्पर संबंधाबद्दलची ज्ञानेशांची कल्पना त्यांच्या साहित्यविषयक दृष्टिकोनाचाच एक भाग म्हणून लक्षांत घेतली पाहिजे. या दृष्टीनें हा उतारा महत्त्वाचा वाटतो.

(१–२) या ओव्यांतील आत्मविश्वासाशीं संगत असलेला विनयभाव उल्लेखनीय आहे. (३–५) माहेर, साउली व सुखरूपी अमृताचा डोह या शब्दांनीं श्रोत्यांबद्दलचा आदरभाव स्पष्ट होतो. (३) **लळेयांचे** = हट्ट घेणारांचे लळे (हट्ट). **मनोरे** = डोलारे. (४) **वोल**–(वोलावों) = ओलावा, गारवा. **सासिन्नले** = टवटवित झाले. (५) **निवों कें पां** = शांत कोठें व्हावें ? (कें > क).

(६–७+१५) लहान मूल आपल्या आईबापांशीं जशी सलगी करतें, तशी सलगी श्रोत्यांशीं आपण करीत आहोंत असा भाव. स्वतःकडे बालकाची भूमिका घेण्यांत ज्ञानेशांनीं दाखविलेली शालीनता त्यांच्या कवि-हृदयाचें सौंदर्यच स्पष्ट करीत नाहीं काय ? (६) **नातरी** = अथवा. **विचुक** = अडखळणारें. **चोज** = कौतुक. **रिझणें** = आनंदित होणें, समाधान पावणें. (७) **पढियावो** (पढिअ–य) = प्रेमभाव. **आलुकी** = तीव्र इच्छा.

(८) **वांचूनि** = नाहीं तर, एरवीं. **भवादृश** = आपल्यासारखे. **सारस्वतें** = सरस्वतिपुत्रानें. **सिकिजे** = शिकावें. (विध्यर्थी रूप सिक् > शिक्ष् ) श्रोत्यांना सर्वज्ञ म्हणतांना स्वभावतःच हुषार असलेल्या सरस्वतीच्या मुलाचा येथें दाखला दिला आहे. " घडा घालून घेऊन त्याला शिकावें लागत नाहीं, तसेंच तुमचें आहे. त्यामुळें 'अवधान एकवेळ दीजे' (ओवी १) हें माझें बोलणें तुम्हाला साजेसें नाहीं;" असा भावार्थ.

(९–१२) तुमचें समाधान करील एवढें वक्तृत्व आपल्याजवळ नाहीं असें म्हणतांना श्रोत्यांचा अधिकार व आपली योग्यता यांतील अंतर फार

मोठें आहे. हीच गोष्ट या ओव्यांतील दाखल्यांनीं ज्ञानेश्वर स्पष्ट करीत आहेत. पण असें असूनहि आपापल्या सामर्थ्यानुरूप प्रत्येकानें चांगली गोष्ट करणें इष्टच आहे हा भाव पुढील ओवींत आला आहे.

(९) **आवडे तेसणा** = हवा तसला; वाटेल तेवढा. **धुंधुरु** = काजवा. **वोगरूं** = वाढूं ( वोगर = अन्न वाढणें ). **रससोय** (रसोय) = पक्वान्न. (रसोई–गुजराथी). (१०) **हिमकर** = शीतकिरण, चंद्र. **विंजण** = पंखा. **कहीं** = कधीं; कोठें (>कदा अपि). (११) **तुरंबणें** = वास घेणें. **आडे** (अडे) = व्यापलें जाणें, मावणें. **पवाडु** = विस्तार (प्र+वृध्). (१२) **धाये** >धा ( ध्रै ) = तृप्त होणें.(१३) **हातिवा** ( >हस्तवर्तिका ). = काड-वात, फुलवात. **अपांपति** = समुद्र. (१४) बेल जऱ्ही **गंगावती** = निरगुडी. शंकराला बेलाप्रमाणेंच निरगुडीचीं पानेंही आवडतात. तीं भक्तीनें अर्पण केलीं, तर त्यांचाहि स्वीकार शंकर प्रेमानें करतो. **बोलु** ( पाठभेद **जऱ्ही गंगावती** = ( > गंगाव = घोटाळणें, अस्पष्ट होणें ). माझें बोलणें अडखळत असलें, अस्पष्ट असलें तरी दुबळ्याची भक्ति त्यांतून स्पष्ट होत आहे, म्हणून तुम्ही त्यांचा स्वीकार करालच असा आशय. परंतु महेशाच्या रूपकाबरोबर 'बेल, निरगुडी' यांचा उल्लेख येणें सहाजिक वाटतें; म्हणून पहिलाच पाठ योग्य ठरतो.

(१५) **वोडव** ( ओडव ) = पुढें करणें. **रिगे** ( रिग>रिगृ ) = प्रवेश करी. (१६) **चावटी** ( टै ) = बडबड ( >चर्वितता ). (१७) **बहुवें** = फार, अतिशय. **मोहें घेतले असा** = प्रेमानें घेरलेले आहांत. **आभारु** = ओझें. (१८) **झटे** = लगटणें, भिडणें, ( वासराची ढुशी ). **दुणवटे** = दुप्पट होते. **पढियंता** = आवडता. (१९) **निदैलें** = झोपलेलें. **चेइलें** = जागें झालें. ( चेइ = जागें होणें ).

(९–१९) पहिल्या ओवींत श्रोत्यांना 'अवधान दीजे' अशी जी विनंति केली, त्या आपल्या धाष्टर्याचें समर्थन या दहा ओव्यांत ज्ञानेशांनीं अति नम्रपणानें केलें आहे. आपण अनधिकारी असलों तरी बाळमतीनें ही बडबड करीत असल्यानें आईवडिलांच्या प्रेमळ दृष्टीनें संतश्रोते त्या-कडे पाहतील व कौतुकच करतील असा विश्वास ज्ञानेशांनीं येथें प्रगट केला आहे.

(२०) **चेपणी** = अढी. ( > चपन ) चांदणें आंब्यांप्रमाणें अढींत पिकवितां येतें काय ? **घापत** ( घापणें = घालणें ) = घालत; **वाहणी** = प्रवाह, ओघ. वाऱ्याला प्रवाहांत घालतां येतें काय ( गति देतां येते काय ? ). **गवसणी** = आच्छादन. गगनाला आच्छादन कसें घालायचें ?

(२१) **वोथिजावें**–( प्रयोजक > वोथिज ) = पातळ करणें. **माथुलां** = लहान रवी. (२२) **पाडु** = सामर्थ्य.

(२३) **धिंवसा** = धैर्य, साहस, किंवा तीव्र इच्छा. **धिटीव** = धिटाई.

(२०–२२) गीतार्थाच्या मोठेपणापुढें आपलें वक्तृत्व फार दुबळें आहे, हा भाव या ओंव्यांतील दृष्टांतांनी स्पष्ट केला आहे. असें असूनहि श्रोत्यांच्या प्रेमासाठीं हें धाडस आपण करीत आहों असें ज्ञानेश्वर म्हणतात. वेद ( शब्दब्रह्म ) कुंठित झाल्यावर ते गीतारूपी बाजेवर निवान्त निजतात. ( २२ ) ही कल्पना गीता-गौरवांतील ‘ वेदु गीतेचा पोटीं रिगाला ’ या कल्पनेशीं जुळती आहे.

(२४–२९) श्रोत्यांच्या अवधानाची वक्तृत्वाच्या दृष्टीनें केवढी महति आहे, त्याचें वर्णन यामध्यें आहे. ज्ञानेशांची साहित्यविषयक दृष्टिहि या ओंव्यांवरून स्पष्ट होते. ( प्रस्तावना पाहा )

(२५) **दिठिवा** = दृष्टिपात. **कोंभेला** = अंकुरलेला. **उन्मेषु** = बुद्धि, ज्ञान. (२६) **चारा** = खाद्य. **प्रमेयाचीं दोंदें** = सिद्धान्ताची ओझीं ( दोंदें = मोठीं पोटें ) **अक्षरा पेलतीं** = शब्दांना सहन करतां येतील. ( पेल = दाट भरणें, घट्ट ) दोंदें सुटतील. (२७) **भावाचा फुलारा** = भावफुलांचा बहर.

( २६–२७ ) श्रोत्यांचें अवधानरूपी खाद्य मिळाल्यावर वक्त्याच्या शब्दांना सिद्धान्तांची योग्यता येते. बोलापाठोपाठ अर्थ धांवत येतो. कल्पनेपाठोपाठ कल्पना स्फुरतात. वक्त्याच्या बुद्धीला भावपुष्पांचा बहर येतो. (२८) **सुवावो** = चांगला वारा. **ढल** = हलणें, चलित होणें. **दुश्चित** = क्षुब्ध चित्त, थाऱ्यावर नसलेली स्थिति. श्रोता नि वक्ता यांच्यांतील सुसंवाद हाच कोणी वारा; तो वहात असेल तर वक्त्याचें हृदयाकाश

साहित्यानें ( साहित्यरूपी मेघांनीं ) भरून जाईल. पण श्रोता जर क्षुब्ध चित्त असेल तर व्याख्यानाच्या चढलेल्या रंगाचाहि भंग होईल.

(२९) वक्ता हा चंद्रकांतमणी असला तरी त्याला पाझरविणारा चंद्र श्रोताच आहे. श्रोत्यांखेरीज वक्ता हा वक्ता कसा होईल ? ( सुवायें मेघु सांवरे। जैसा चंद्रें सिंधु भरे। तैसा मातुला रसु आदरें। श्रोतयाचेनि ॥ १३-११५१ ).

(३०-३१) इतका श्रोत्यांचा अनुनय केल्यावर अशी विनवणी करण्याचेंहि कारण नाहीं, ही गोष्ट ध्यानांत येऊन ज्ञानेश्वर म्हणतात कीं, ( माझ्यासारख्या ) कळसूत्री बाहुल्यानें ( साइखेडिया ) सूत्रधाराची विनवणी कां करावयाची ? ( तांदुळांनीं खाणाराची प्रार्थना कशाकरितां करावयाची ? ) तो आपली कला वाढविण्यासाठींच बाहुल्यांना नाचवतो ना ? तसे श्रोते आपल्यासाठीच वक्त्याला बोलते करतात ना ? मग ही विनवणी करण्याची उठाठेव आम्हांला कशाला ?

(३२-३३) यावर श्रीगुरु निवृत्तिनाथ ज्ञानेशांना प्रोत्साहन देण्यासाठीं " हें सारें तुझें आम्हांला पावलें, आतां श्रीकृष्णानें काय सांगितलें आहे तें सांग" असें म्हणतात. तेव्हां श्रीगुरूचे हे शब्द म्हणजे त्याचा कृपाप्रसादच होय, असें मानून ज्ञानेश्वर मोठ्या उल्हासानें श्रीकृष्णाच्या म्हणण्याचा अनुवाद करूं लागतात. ( प्रास्ताविक भागाचा समारोप करण्याची ज्ञानेशांची ही ठराविक पद्धति दिसते.)



# ८ भोगासक्त कर्मठ

वेदांतील कर्मकांडावर भर देऊन सकाम बुद्धीनें कर्माचरण करणारांचीं व्यक्तिचित्रें प्रसंगानुरोधानें ज्ञानेशांनीं रेखाटलीं आहेत. त्यांपैकीं अ. २ व ९ मधील उतारे येथें घेतले आहेत. अध्याय दोनमध्यें 'सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा न भजावें' अशी साम्यावस्था प्राप्त करून देणाऱ्या बुद्धियोगाचें विवेचन केल्यावर अनिश्चित बुद्धीच्या लोकांची कर्माचरणाकडे पाहण्याची भूमिका काय असते हें वर्णन करतांना (अ. २–२४५–५५) या ओव्यांत ज्ञानेशांनीं वेदांच्या अर्थवादांत रत झालेल्यांचें चित्र रेखाटलें आहे. गीतेंतील अ. २ श्लोक ४२, ४३, ४४ यांवरील ही टीका आहे.

(१) कर्म प्रतिष्ठिती = केवळ कर्ममार्गाच्या श्रेष्ठत्वाचें समर्थन करतात.

(४) अभिभूत = वश. (६) कुडें = वाईट, अयोग्य. यज्ञपुरुष = परमात्मा. (७) काळकूट = जालीम विष. (८) उलंडणें = उलथणें, (> उलड = उत्क्षेपणें) पालथा करणें. हेतुकपण = फलाभिलाष, सकारणपणा. (९) अर्जिजे = मिळवावें. अप्राप्त = ब्रह्मप्राप्ति न झालेले, दुर्दैवी. (१०) रांधवणी = स्वयंपाक करणारी, सुगरण स्त्री. निकी = चांगली. वेदवादरत = वेदार्थाच्या वादांत रमलेले.

—१२ ते ३८ ओव्या—

'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' असा ज्यांचा अधिकार ते वैदिक पंडितच सकाम कर्माचरणामुळें पुण्याच्या नांवानें पापच कसें करतात; याचें सुंदर चित्र ज्ञानेशांनीं 'त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा' या नवव्या अध्यायांतील २० व्या श्लोकाचें विवरण करतांना रेखाटलें आहे.

(१२) विधिमार्गा कसवटी = ज्यांचें आचरण उत्कृष्ट धर्माचरणाची कसोटी म्हणून मानलें जातें.(१३) क्रिया फळेंसि उभी ठाके = ज्यांच्यापुढें

यज्ञक्रिया फलासह मूर्तिमंत येऊन उभी रहाते.(१४)**दीक्षित** = यज्ञकर्ते.**सोमप** = सोमरसाचें पान करणारे. (१५) **श्रुतित्रय** = ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद. (१६) **निदैव** = अभागी मनुष्य. (१७) **शतक्रतू** = शंभर यज्ञ. **यजिलें** = पूजिलें. **ईप्सितातिं** = इच्छितात.**निरुतें** = खरोखर ( >निरुक्त) **नोहे** = नाहीं काय ? (१८) **उपसर्गु** = अनिष्ट, उपाधि, विघ्न. (१९) **नित्यानंद निर्दोष** = आत्मस्वरूप निष्कलंक, दोषरहित, विशुद्ध व आनंद-स्वरूप आहे. (उतारा १ मंगलाचरण पहा.) (२०) **अव्हांटा** = आडमार्ग. (२१) **पुण्यात्मकें पापें** = पुण्यरूप पापानें ( दिसायला पुण्य पण वास्त-विक पापच). (२२) **मजचिमाजी असतां** = सर्व प्राणी माझ्या स्वरूपा-मध्यें असतांना. **दूरी होय** = दुरावतो. **जीभ न तुटे** (झडे)—चालू मराठी भाषेंतहि हा वाक्प्रचार रूढ आहे. (२३) **याचित** = याचना करतात, अपेक्षितात. (२४) **सौरसें** = सामर्थ्यानें, संबंधानें. (२५–३२) या ओव्यांमध्यें स्वर्गसुखाचें वर्णन आलें आहे. आपल्यामध्यें रूढ असलेल्या स्वर्गकल्पनेला जुळतें असेंच तें आहे. (२६) **महासिद्धि** = अणिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्य, महिमा, ईशिता, वशित्व व कामावसा-यिता अशा आठ शक्तींना महासिद्धि असें म्हणतात. **खिल्लारें** = कळप. (२७) **वोळग** ( > अव + लग् ). = सेवा. **पाइक** = चाकर. **विनोदवनवाटिका** = करमणुकीसाठी तयार केलेल्या बागा.

(२८) **नाचणी** = नर्तिका. **अंतौरिया** ( > अंतुरी, अंतौरी ). = स्त्रिया

(२९) **शेजारें** = शय्यागृहांत. ( शय्या = शेज ) **सांबरे** = सडासंमार्जन.

**सांबर** = पाणी, 'शंबर संबर जलनामानि' ( निघंटु )

**धांवणें** = जासूद. **म्हणियारा** = म्हटलेलें करणारा.

(३०) **स्वस्तिश्रियेचें** = आशीर्वाद देणारे, कल्याण इच्छिणारे.

**विकार** (विकर) = समुदाय. **तातियेचे** = पंक्तीचे ( ला )

(३१) **लोकपाळ** = आठ दिशांचे स्वामी. अष्टदिक्पाल. पूर्वेचा इंद्र,

अग्नेयेचा अग्नि, दक्षिणेचा यम, नैर्ऋत्येचा नैर्ऋत्य, पश्चिमेचा वरुण, वायव्येचा वायू, उत्तरेचा कुबेर, ईशान्येचा ईश्वर. **राउत** = घोडेस्वार. **खोलणिये** = पुढें चालण्यासाठीं. **खांचे** = श्रमतो. **खांचणें** = दमणें, श्रमणें.

(३३–३८) पुण्य संपतांच या स्वर्गाभिलाषी लोकांना पुन्हां मृत्युलोकीं यावें लागतें. जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पुन्हां ते सांपडतात. असें हें वैदिकांचें स्वर्गसुख आहे. या ओव्यांचा हा भावार्थ आहे. 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं' या श्लोकावरील ( अ. ९–२१ ) ही टीका आहे. **(३३) पाउटी** = पायरी, दर्जा. **उटी** = तेज. **(३४) कवडा** = पैसा. **(३५) थितिया मातें** = स्थित–स्थिर असलेल्या मला. **कामिले** = इच्छा केली. **वावों** ॥ व्यर्थ. **(३६) दाथरीं** = थरामध्यें. **(३७) निधान फावे** = द्रव्याचा ठेवा प्राप्त होतो. **(३८) उपणिला** = पाखडला.

---

# ९ अज्ञानी भक्त

गीतेच्या १३ व्या अध्यायांतील श्लोक ७ ते १० यांमध्यें ज्ञानाचीं अठरा लक्षणें सांगितलीं आहेत. त्याच्या समारोपादाखल श्लोक ११ मध्यें ' अध्यात्मज्ञान हेंच खरें ज्ञान. त्या खेरीज जें कांहीं इतर तें अज्ञान होय' ( अज्ञानं यदतोऽन्यथा ) असें म्हटलें आहे. त्या श्लोकावर व्याख्यान करतांना ओव्या ६१५ ते ६५१ पर्यंत 'अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्। एतज्ज्ञानमिति प्रोक्तम्' या समारोपाच्या वचनोक्तीचें स्पष्टीकरण ज्ञानेशांनीं केलें आहे; त्यानंतर ज्ञानेश्वर म्हणतात: "आतां धनंजया महामती। अज्ञान ऐसी वदंती। तेही सांगो व्यक्ती। लक्षणेंसीं ॥ ६५२ ॥...(तैसें) ज्ञान जेथ नाहीं। तेचि अज्ञान पाहीं। तरि सांगों कांहीं कांहीं। चिन्हें तियें ॥ ६५५ ॥" यापुढील एकूण २०५ ओव्यांत ज्ञानेशांनीं अज्ञानाचीं लक्षणें अगदीं स्वतंत्रपणें वर्णिलीं आहेत. "हा चिन्ह समुच्चयो आघवा। आयकिला तो जाणावा। अज्ञान भागु ॥ ८६० ॥" यांपैकीं फक्त ३५ ओंव्या या व पुढील उताऱ्यांत मिळून येथें घेतल्या आहेत.

गर्विष्ठ, द्रव्यलोभी नि स्त्रीलंपट अशांचीं चित्रें रेखाटून अज्ञानाचीं तीं तीं लक्षणें स्पष्ट केल्यानंतर आपल्या अपेक्षापूर्तीसाठीं निरनिराळ्या देवतांकडे धांव घेणाऱ्या चंचल मनोवृत्तीच्या लोकांचें चित्र प्रस्तुतच्या उताऱ्यांत (अ. १३–८०७–८२२) ज्ञानेशांनीं रेखाटलें आहे.

(१) **धनोद्देशें विरक्ती नटणें** = द्रव्यलाभाच्या हेतूनें वैराग्याचें सोंग आणणें. ( त्याप्रमाणें कामनापूर्तीसाठीं भक्तीचें ढोंग करतात. )

(२) **जारेंसी** = परपुरुषासह, परपुरुषाकडे. [ **आणिकेसी** (पाठभेद) = पतीशिवाय इतर पुरुषाकडे ].

(३) **पाउटी** = साधन. **दिठी विषो सूये** = दृष्टीमध्यें विषय ठेवतो ( घालतो ). **सूदणें** = घालणें, ठेवणें. **सुवणें** = घालणें. **सुयें** = घालतो.

(४) **भजन्नलियासवें** = भक्ति केल्याबरोबर. **टवाळ** = निरर्थक, मिथ्या, खोटें. (५) **कुणबट** = अडाणी शेतकरी. **कुळवाडी** = व्यापार-व्यवहार; किंवा शेत पिकविण्याची कामगिरी. **आन आन** ( > अन्य अन्य ) = नवीन नवीन; वेगवेगळें. **परवडी** ( > परिपाठी ) = तऱ्हा, रीत. ( **परवड** = आबाळ ). (६) **टेंक (णें)** = स्पर्शणें, अवलंबणें, विश्वास ठेवणें. **सुगरवा** ( > सुगौरव) = भरभराट, चलती, थाटमाट. (७) **एकसरु** = एकनिष्ठा. **निर्वाह** = योगक्षेम, वागणें–राहणें. (८) **निफजवी** = निर्माण करतो. **कोर्नी** = कोपऱ्यांत. (९) **नीच** = नेहमीं, ( नित्य → निच्च → नीच ). **काजीं** = कार्यामध्यें, विशेष प्रसंगीं. (१०) **वोवसे**( वौस > उप + वस् ) = नवस. (वसा = व्रत). **पितृकार्य** = पितरपूजा, श्राद्ध, पक्ष इ. (११) **जेतुला पाडु** = जेवढी प्रतिष्ठा ( मान, गौरव ). **पंचमी** = नागपंचमी, श्रावणांतील शुद्ध पंचमी.

(१२) **चौथ** = चतुर्थी. **मोटकी** = नेमकी किंवा थोडकी. **पाह(णें)** = बघणें, दिसणें, उजाडणें. चंद्र उगवून थोडीशी चतुर्थी दिसूं लागते न लागते तोंच. **चावदसी** (> चतुर्दशी ) = पंधरवड्यांतील चौदावा दिवस. (१३) तिथींच्या उल्लेखानुसार 'नवमीतें मांडी' हा पाठ येथें योग्य ठरेल, पण 'नवचंडी' नामक एक यज्ञच आहे. हें नवरात्रांतील अनुष्ठान नित्यनैमित्तिक कर्मांपेक्षां विशेष प्रकारचें कर्म आहे. त्या दृष्टीनें आहे हा पहिला चरण सार्थ म्हणतां येईल. **बहिरोबा** किंवा खंडोबा यांचा वार रविवार मानिला जातो. **भैरवां पात्रीं वाढी** = भैरवाला नैवेद्य दाखवितो.

(१४) **जोगावणें** = संभाळणें, उपासना करणें.

(१५) **अहेव** = सौभाग्यवती, सुवासिनी. (> **ऐहेव** = अविधवा ).

(१६) **सैरा धांवतु देखसी** = वाटेल तसा धांवतांना पाहतोस.

---

# १० पठिक पंडित

अज्ञानी भक्ताचें वरील प्रकारें वर्णन केल्यानंतर लौकिक दृष्ट्या ज्ञानी म्हटल्या जाणाऱ्यांचें अज्ञान ज्ञानेशांनीं यापुढील कांहीं ओव्यांत दाखवून दिलें आहे (ओव्या ८२५-८४३) अध्यात्मज्ञानाखेरीज इतर ज्ञान व्यर्थ होय असा या उताऱ्यांतील आशय आहे. हाच विचार इतरत्रहि ज्ञानेशांनीं मांडला आहे. (उदा० अ. १३-६१५-१६ ओव्या पहा.) मध्यंतरीच्या दोन ओव्यांत 'पवित्र अशीं एकांतस्थानें ज्याला आवडत नाहींत, लोकांच्या गलबल्यांत व लौकिक गोष्टींतच जो रमून जातो तो अज्ञानीच होय' असें ज्ञानेश्वर सांगतात. पण सलगतेच्या दृष्टीनें त्या दोन ओव्या मागील किंवा प्रस्तुतच्या उताऱ्यांत बसूं शकत नाहींत म्हणून येथें घेतल्या नाहींत. त्या ओव्या अशा आहेत— आणि एकांतें चोखटें। तपोवनें तीर्थें तटें। देखोनि जो गा विटे। तोहि तोचि ॥ ८२३ ॥ जया जनपदीं सुख। गजबजेचें कवतिक। वानूं आवडे लौकिक। तोहि तोचि ॥ ८२४ ॥

(१) गोचरु = प्रत्यक्ष, इंद्रियगम्य. डौर वाहे = उपहास करी. विद्वांसु = अध्यात्मशास्त्रावांचून इतर शास्त्रें-कला पढलेला विद्वान. (२) न वचे ( > व्रज ) = जात नाहीं. (३) भिंती पाडूनि = भित पाडून, मर्यादा सोडून. वोढाळ = स्वैर भरकटणारी. (४) सूपकर्म = पाकक्रिया, स्वयंपाकाचें शास्त्र. शिल्प = कलाकौशल्याचें शास्त्र, बांधकामाची कला. आथर्वणविधि = जारणमारण, उच्चाटन वगैरेसंबंधींच्या मंत्रांचें तंत्र. आथर्ववेदांत यासंबंधीं मंत्र आहेत. हातीं आथीं = अगदीं हातांत आहेत, पूर्ण अवगत आहेत. (६) कोकीं नाहीं ठेलें = कामशास्त्रांत जाणावयाचें कांहीं राहिलें नाहीं. भारत = महाभारत. भरतु ( पाठभेद ) = भरतमुनींचें नाट्यशास्त्र; कीर = खरोखर. या ठिकाणीं कामशास्त्राबरोबर महाभारताऐवजीं नाट्यशास्त्राचा उल्लेखच योग्य वाटतो. आगम =

**मंत्रशास्त्र. आफाविलें** = आपलेसें झालें, पूर्ण अवगत झालें, ( आ + फावणें = प्राप्त होणें ).(७) **नीतिजात** = नीतिविषयक सर्व शास्त्रें. (८) **गारुडियाचा दंशु** = गारुडीविद्येचें मर्म, इंद्रजाल पसरविण्याची, नजरबंदीची विद्या. **निघंटु** = वैदिक शब्दांचा कोश. **पाइकी करी** = चाकरी करतो. (९) **चोखडा** = चांगला = प्रवीण. **गाढा** = बळकट ( हुशार ). **फुडा** ( स्फुट ) = खरोखर, निःसंशय. **जात्यंधु** = जन्मापासून अंधळा.

(१०) **सिद्धान्तनिर्माणधात्री** = तत्त्वें उत्पन्न करणारी भूमीच. **मूळ नक्षत्रीं न पाहे** = मूळ नक्षत्रावर जन्मलेलें मूल आईबापांनीं पाहूं नये असा ज्योतिषशास्त्राचा दंडक आहे. **असोसें** = अशेष (सर्व अंगभर) किंवा पुष्कळ, अमर्याद (> अ + सं + वस् = आसोस). **डोळसें पिसें** = ( दृष्टीखेरीज ) डोळे असलेली पिसें. ( मोराच्या अंगावरचे डोळे जसे निरुपयोगी त्याप्रमाणें अध्यात्म विद्येखेरीजचें इतर ज्ञान हें निरर्थकच होय असा भाव. ) ( १२ ) **येरें** = इतर वनस्पतीच्या मुळयांनीं पुष्कळशा गाड्या भरणें ( **गाडेभरणें** ). ( १३ ) **लक्षणें** = सामुद्रिकदृष्ट्या उत्कृष्ट चिन्हें. **सिसेंविण** = मस्तकावांचून. **वोहर** = वधूवर, नवरा–नवरी. **वाधावणें** वधावा = वाधावा = ( > वृद्धिवार्ता ) आगमन वार्ता. **(१४) अप्रमाण** = निराधार. (१५) **नित्यबोध** = नेहमींची जागरूकता **निश्चयबुद्धि** ( पाठभेद ) = निश्चयात्मक किंवा स्थिर बुद्धि. **शास्त्रमूढ** = शास्त्रज्ञान असूनहि मूर्ख; पढतमूर्ख. (१६) **विरूढलें** = उगवलें, अंकुरलें. **व्युत्पन्नत्व** = विद्वत्ता. (१८) **कहीं** = कधीं. **ज्ञानार्थु** = ज्ञानाचा विषय = ब्रह्म. (१९) **थडी** = किनारा. **पैलद्वीप** = पलीकडील बेट. **माघौता** = माघारीं, मागें.

---

# ११ आसुरी प्रकृतीचे दीक्षित

गीतेच्या सोळाव्या अध्यायांत दैवी व आसुरी संपत्तींचें (स्वभावविशेषांचें) वर्णन आलें आहे. त्याच्या आधारानें ज्ञानेशांनीं 'अभयं सत्त्वसंशुद्धिः' इत्यादि दैवी गुणविशेषांनीं युक्त अशा आदर्शाचें चित्र रेखाटल्यानंतर ( ओव्या ६८–२१२ ) दंभ, मस्ती, अहंकार, क्रोध, निष्ठुरता, अज्ञान अशा सहा दुर्गुणांनीं पुरेपूर भरलेल्या आसुरी प्रकृतीच्या व्यक्तीचेंहि वर्णन अगदीं तपशीलवार केलें आहे. (ओव्या २१३–४२३) त्यांपैकीं मधल्याच दोन ठिकाणच्या ३०+१६ अशा ओव्या येथें घेतल्या आहेत. गीतेंतील अ. १६ श्लोक ७, ८ व १३, १४, १५ या श्लोकांवरील ही टीका आहे. याच अध्यायांतील ३८९ ओवीवरून मथळ्यांतील 'दीक्षित' शब्द सुचला आहे. ती ओवी अशी–' मग पुढां भेरी निशाण। लाउनी ते दीक्षितपण। जगीं फोकारिती (मिरवतात) आपण। वावो वावो (व्यर्थ) ॥ ३८९ ॥

(१) प्रवृत्ति निवृत्ति = चांगल्या गोष्टी करणें आणि वाईट गोष्टींपासून बाजूला होणें ( हें नेणिजती = जाणत नाहींत. ) (२) चोखी होईल वायसा = कावळा शुभ्र ( चोख ) पांढरा होईल. (३) शौच = शुचित्व, पवित्रपण, स्वच्छता. (४) वास पहाणें = वर्तनक्रम, चालरीत पाहून तसें वागणें. आस = आशा. विधि = शास्त्रसंमत आचरण. (५) वारियाचें = वाऱ्याचें. भलतेउतें = वाटेल तसें, कितीहि, कसाहि. (६) स्वैर पुढां सूनि = स्वच्छंदीपणा पुढें करून ( घालून ). (७) साचा बोलिया = सत्य भाषण. (८) अपानाचेनि तोंडें = गुदद्वार, अपानवायु बाहेर सोडणारें दार. (९) आंगेचि वोखटें = स्वभावतःच वाईट. नवाई = नवल, विलक्षणपणा. (१०) करेयाचां (कऱ्हेयाचां) = उंटाच्या ठिकाणीं (ठायीं) [खांदु = (पाठभेद) वशिंड नीट सरळ अंग कुठून असणार ? तसेंच आसुरी प्रकृतीची व्यक्ति सरळ कुठून बोलणार ? (११) उधवणीचें तोंड = धुराडें.

**धुंवाचे उभड उगळी** = धुराचे लोट बाहेर टाकते. उगळणें (उत् + गृ) = ओकणें. (१२) **नियंता** = नियमन करणारा शास्ता. **निवडी** = निवाडा करतो. निर्णय देतो, ठरवतो. (१३) **निरयभोग** = नरकांतील आपदा. **सुरवाडें** = सुखानें रहातो. (१४) **अनादि** = पुरातन, जिचा प्रारंभ ठाऊक नाहीं अशी. (१६) **वेंटाळ**–एकत्रित करणें, वेढणें, व्यापणें, लुबाडणें. (१७) **वेगळवेंटाळी** = वेगळाले, भिन्न भिन्न ( पदार्थ ) **भोग गोळा करतां न येणें ( न टके )** = प्राप्त करून घेतां न येणें. **गादिजे** = पीडित व्हावें. ( गादणें = पीडित होणें ). (१९) मोठा मासा लहान माश्याला खातो, 'जीवो जीवस्य भक्षणम्'. ह्या वाक्प्रचाराचा येथें उपयोग केला आहे. (२१) **मिती नाहीं** = गणना करतां येत नाहीं, अमर्याद. **प्रतिपत्ती** = समारंभ, रीत. (२२) **वालभें** = वल्लभानें, पतीनें किंवा आवडीनें, विषयावरील प्रेमानें. **परद्वार केलें** = व्यभिचार केला, परपुरुषाचा वा परस्त्रीचा उपभोग घेतला. **कोढी** (> कुष्ठी) = कोड असलेला. (२३) **परत्राचां गांव** = परलोक. (२४) **कर्ता निमे** = कर्ता ( देह) मरण पावतो. **भोग्यासि कवणु ठावो** = भोगायला ठिकाणावर कोण? **मा भोगीं कोणु** ( पाठभेद ) = मग भोगणारा कोण ? (२५) **श्लाघें,** ( घ्यें ) = आनंदानें. (२७) **युग्में** = जोडपीं. (३०) **किडाळ** = वाईट, दोषयुक्त. **पघळ** = विस्तार. **सफोल** = निष्फळ.

\+ + + +

(३१) **मियां** = म्यां, माझ्याकडून, मीनें ( वऱ्हाडी). (३२) **श्लाघों-जाये** = स्तुति करितो. (३५) **गाढे** = बलाढ्य ( शत्रु ). **पवाडें** = महत्त्वानें, मोठेपणानें. (३६) **कामारीं** (> कर्मकारी) = काम करणार, दास, नोकर. (३८) **आज्ञासिद्ध** = हुकुम देतांच क्षणीं त्याप्रमाणें घडवून आणण्याची ताकद ज्याच्या शब्दांत आहे असा. (३९) **अतुर्बलु** = अजोड, अतुल असा बलवान्. **निखळ** = निव्वळ. **रासिवा** = रास, ढीग. (४०) **आथिला** = संपन्न. **माझी सोये नेणें** = माझी बरोबरी करणें तो जाणत नाहीं ( करूं शकत नाहीं. ) **सोये** (> सुगति) = योग्यता, ऐश्वर्य. **श्रीनाथ** = लक्ष्मीपति, श्रीविष्णु. (४१) **उजाळू** = उज्ज्वलता, शुद्धता.

**मेळू** = समुदाय. **हळू** ( अल्‍ ) = क्षुद्र, हलका, कमी योग्यतेचा. (४२) **सरी पावे** = बरोबरी करी. (४३) **अभिचारु** = दुसऱ्याला अपाय करण्याच्या हेतूनें केलेली जारणमारणमंत्रादि क्रिया. **परमारु** = दुसऱ्याचा नाश, परपीडा. **मरमारु** ( पाठभेद ) = प्राणान्त करणारे. (४७) **नट नाचें** = सोंगें घेऊन व नाचून ( रिझविती ). (४५) **माजिर** ( > मदिर ) = मादक ( पदार्थ ). उन्मत्त, बेहोष. **आनंदाकारु** = मूर्तिमंत आनंद. **आनंदकरु** ( पाठभेद ) = आनंद करणारा. (४६) **पिसें** = वेड. **गगनौळें** = आकाशफुलें. **तुरंबिती** = वास घेतात.

---

# १२ कामक्रोधांचें दुवाडपण

गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत कर्मयोगाचा विचार आला आहे. "कर्म कोणाला सुटत नाहीं; लोकांना मार्गाला लावण्यासाठीं म्हणून कां होईना, पण सिद्ध कोटीला गेलेल्यांनाहि धर्मविहित कर्माचरण आवश्यक आहे; गुणांच्या आधारानें आपापलीं कर्में करणाऱ्या इंद्रियांच्या आधीन होऊन कर्तृत्वाचा भार आपणांवर ओढून घेणारांनाच कर्में बंधनकारक होतात; बाकी आपापल्या धर्मानुसार कर्में करण्यांत कांहींच हानि नाहीं."इत्यादि विचार श्रीकृष्णांनीं मांडल्यानंतर अर्जुन प्रश्न करितो कीं, " हें सारें मला समजलें, पण चांगले ज्ञानी म्हणणारे लोक पापाचरण करतांना दिसतात; त्यांना त्या पापकृत्यांकडे बळेंच ओढून नेतो कोण? ( गीता अ. ३, श्लोक ३६ ) या अर्जुनाच्या प्रश्नाला उत्तर देतांना 'हा सगळा कामक्रोधांचा द्वाडपणा आहे ' असें श्रीकृष्ण सांगतात. कामक्रोधांचा तो दुष्टपणा किंवा भयंकरपणा वर्णन करणारा उतारा('काम एष क्रोध एष । रजोगुणसमुद्भवः ' या ३७ व्या श्लोकावरील टीका–) येथें घेण्यांत आला आहे.

(१–२) या दोन ओव्या ३६ व्या श्लोकावरील टीकेपैकीं आहेत. त्यावरून अर्जुनाच्या प्रश्नाचें स्वरूप ध्यानांत येईल. **अनारिसे** ( >अन्या-दृश ) = वेगळें, भलतें (भलत्याच वाटेनें). **हेयोपादेय** (वा हेय उपादेय –पाठभेद ) = त्याज्य. ( हेय = निषिद्ध ) व ( ग्राह्य = उपादेय ). **व्यभिचरती** = ( परधर्मांत ) भ्रष्ट होतात, शिरतात. (३) **हृदयकमळ-आरामु** = हृदयरूपी कमळांत आराम-(विश्रांति) घेणारा ( राहणारा), किंवा हृदयरूपी कमळांतील राम ( पाठभेद ). (४) **कृपेची सांठवण नाहीं** = दयेचा सांठा (शिल्लक) नाहीं. दयेचा लवलेशहि नाहीं. **कृतांत** = यम. **मानिजती** = लोकांकडून मानलें जातें.(५) **भुजंग (भूवंग)** = साप.

(६) **देहदुर्ग** = शरीररूपी किल्ला. **धोंड** = मोठाले दगड. **कोंड** = गांव-कूस, गांवाभोंवतालची भिंत. **व्यामोहादिक** = भ्रम, मोह, अविवेक इत्यादि.

(७) **आसुरियेचे** = आसुरी संपत्तीचे. **आखलिचे** ( पाठभेद ) = नीच

स्वभावाचे. **धायपण** = दाईपणा, पालनपोषण. **अविद्या** = माया, अज्ञान.

(८) **भले पढियंते** = विशेष लाडके. (पढियंत > प्रीयन्त). **निजपद** = आपली गादी. (९-१०) **आमिष** ( आंविस ) = भक्ष्य, खाद्य.

(११) **कवळणें** = पकडणें, धरणें. **थेंकुटी** = ( > स्तोक ) लहान. **वाल्हीदुल्ही** ( > वल्लभदुर्लभ) = नवानवसाची, लाडकी.

(१२) **भातुकें** = खाऊं. **लोकत्रय** = त्रैलोक्य. स्वर्ग, पृथ्वी, पाताळ असे तीन लोक. **बिकें** = बळानें. **जिये** = जगली आहे. (१३) **घेणें दीजे** = घेणें द्यावें. देवघेव करावी. **भोजें** = कर्तबगारीनें. (१४) **भोकसा काढणें** = कोथळा (अंतर्भाग) बाहेर काढणें, पोट फाडणें. **तृणकुटा** = गवताचा चुरा, पेंढा. **अकृत्य** = करूं नये असलें कर्म. **रूढविला** = प्रसिद्धीस आणिला.

(१६) **त्राय फेडणें** = आश्रय ( किंवा सामर्थ्य ) नाहींसा करणें. **खाली काढणें** = साल काढणें, कातडी सोलणें. **उपशम** = निग्रह, शांति. **जितया** = जिवंतपणीं. (१७) **खांडिलें** = तोडलें. **उपडूनिया सांडिलें** = उपटून टाकलें. (१८) **लुंचिली** = उपटली. जैन धर्मात दीक्षाविधीच्या वेळीं स्वहस्तें डोईचे केस उपटावे लागतात. त्या ठिकाणीं '**पंचमुष्टी लोच**' हा शब्द वापरण्यांत आला आहे. **लिपी पुसिली** = (मुखाचें) अक्षरहि पुसून टाकलें. मुखाची भाषाच बंद केली. **जिव्हारी आगी सूदली** = अंत:करणांत आग घातली ( निर्माण केली ). **तापत्रय** = आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक असें त्रिविध दु:ख माणसाला भोगावें लागतें. (१९) **हे आंगा तंव घडले**=हे विकार शरीराबरोबरच उत्पन्न झाले आहेत. **जीवींचि आथि जडले**–जिवाला (अंतःकरणामध्यें) अगदीं चिकटून राहिले आहेत. **नातुडति** = सांपडत नाहींत. **गिंवसिले** = शोधले. (२०) **चैतन्य** = जीवात्मा. **ज्ञानाच्या हारी बसती** = वृत्ति-ज्ञानाच्या पंक्तीला बसतात. **महामारी प्रवर्तले** = हल्ला करण्यासाठीं उसळले म्हणजे **सांवरती ना** = आटोपत नाहींत. (२१) **कवळिती** = घेरून टाकतात. (२२) **साधिती** = ठार मारतात. (२३) **पाशिक** = पाश, जाळें. **आंतौटेपण** =अंतरंगांत असल्याची स्थिति.

---

# १३ मायानदीची दुस्तरता

गीतेच्या ७ व्या अध्यायांत विज्ञानयोग सांगितला आहे. स्वस्वरूप-ज्ञानाव्यतिरिक्त जें प्रपंचज्ञान तें विज्ञान होय. त्याचा निरास करण्या-साठीं प्रथम त्याचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. यासाठीं विश्वाएवढें हें अवडंबर कशा क्रमानें उत्पन्न झालें याचा विचार भारतीय तत्त्वज्ञानांत सांगितला जातो. अशा विश्वोत्पत्तीच्या कथन-प्रसंगीं सांख्य तत्त्वज्ञानांतील प्रकृतीच्या क्रीडेचेंच वर्णन गीतेनें केलें आहे. अष्टधा प्रकृति व पराप्रकृति यांचे परस्परसंबंध विशद केल्या-नंतर "सारें भूतजात हे माझेच अवयव आहेत. पण प्रकृतीच्या (वेदा-न्ताच्या भाषेंत मायेच्या ) योगानें जीवदशेस आल्यावर ' माझेचि मज नोळखती । अहं ममता भ्रांती । विषयांध झाले ॥ ६७ ॥ ' असें म्हणून पुढील ३५ ओव्यांत ज्ञानेशांनीं नदीच्या रूपकाधारें मायेच्या प्रभावाचें वर्णन केलें आहे. त्यांपैकीं पुढील २९ ओव्यांचा उतारा येथें घेतला आहे. गीतेच्या १४ व्या श्लोकाच्या 'मम माया दुरत्यया' एव-ढयाच पदांवरील ज्ञानेशांचें हें व्याख्यान आहे.

(१) महदादि० = महत्, अहंकार इत्यादि २५ तत्त्वें. ही सारी माझी माया आहे. ( हे महदादिक माझी माया । जैसी प्रतिबिंबे छाया । निजांगाची ॥ ७–१५ ) अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं व्यक्त प्रकृति निर्माण करण्याचा निश्चय ( = व्यवसाय ) उत्पन्न होतो. निश्चय करणें हें बुद्धीचें लक्षण आहे, म्हणून प्रकृतींत ' व्यवसायात्मिक बुद्धि ' हा गुण प्रथम उत्पन्न होतो, असें सांख्यांनीं ठरविलें आहे. या बुद्धीसच ' महत् ' तत्त्व असें म्हणतात. ( ज्ञान, मति, प्रज्ञा, ख्याति अशीं इतरहि नांवें तीस आहेत. )

['मीं बहु व्हावें' या बुद्धींतूनच मी–तूं असें पृथक्त्व निर्माण करणारें 'अहंकार' तत्त्व उदय पावतें आणि त्यापासूनच व्यक्त सृष्टि उत्पन्न करूं

शकणारीं अशीं सोळा सूक्ष्म तत्त्वें निर्माण होतात. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन अशीं ११ तत्त्वें सत्वगुणाच्या उत्कर्षातून व निरिंद्रिय सृष्टीचीं (पंचमहाभूतांचें बीजरूप असलेलीं) पांच तन्मात्राद्रव्यें तमोगुणाच्या उत्कर्षातून उत्पन्न होतात. पुरुष-प्रकृति ही दोन मूलतत्त्वें धरल्यास सारें विश्व एकूण २५ तत्त्वांचें बनलें आहे, अशी सांख्यशास्त्राची कल्पना आहे. (अधिक तपशीलासाठीं गीता-रहस्य पानें १६९–१८० पहा).




ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व महाभूतें या पंधरा तत्त्वांना विकार म्हटल्यानें मूलतत्त्वांत गीता त्यांची गणना करीत नाहीं. वेदान्ती 'मन' तत्त्वालाहि मूलतत्त्व मानीत नाहींत. ज्ञानेशांचीहि तीच कल्पना दिसून येते. गीतेनें अ. ७ श्लोक ४ मध्यें अष्टधा प्रकृतींत बुद्धि, अहंकार, मन व पंचमहाभूतें यांचा समावेश केला असून अपरा किंवा मूलप्रकृतीचे ते आठ भाग मानले आहेत. सृष्टयोत्पत्तीचा तपशील ज्ञानेशांनीं अ. ७ ओंव्या १६–४२ यांमध्यें सांगितला आहे.]

**आया** = आकलन, साध्य. ( आय = वश, लाभ.–राजवाडे )

**(२) आघाडां** ( > आघाट = सीमा, मर्यादा, हद्द ) = ( **ब्रह्मरूपी**

**पर्वताच्या** ) हद्दींमधून. आघाडां (पाठभेद) = अर्धा तुटलेला **कडा. उभडा** = उसळी. पहिल्या संकल्परूपी जळाची उसळी बाहेर पडल्याबरोबर तिला पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला अशी कल्पना. **पहिला संकल्प** = 'एकोऽहं बहु स्यां प्रजायेय '= आपण एक आहोंत तें बहुरूप व्हावें अशी इच्छा ब्रह्माच्या (पुरुषाच्या) ठिकाणीं निर्माण झाली; तोच पहिला संकल्प होय. हेंच महत् किंवा बुद्धि तत्त्व होय. विश्वोत्पत्तीचें बीज याच ठिकाणीं असल्यानें वेदांती दृष्टीनें माया नदीचें मूळहि हेंच ठरतें. हा पहिला संकल्प म्हणजे जणूं कांहीं ब्रह्मरूपी पर्वताच्या ठिकाणीं निर्माण झालेला मायानदीचा मूळ झराच होय.

(३) **सृष्टिविस्तार** = सृष्टींतील बहुविध वस्तुजाताचा पसारा म्हणजे या मायानदीचा ओघ किंवा सतत वहात जाणारें पात्रच होय. **काळकलना** = काळाची ग्रास करण्याची शक्ति. सृष्टिविस्ताराचें पात्र कालाच्या ग्रास करण्याच्या विरोधी शक्तीमुळें सारखें वाढत जातें. मायानदीचें पाणी वाढत जाऊन उंच अशा प्रवृत्तिनिवृत्तीच्या दोन्ही तटांवरूनहि वाहूं लागतें. (४) **गुणघन** = सत्व, रज, तम गुणरूपी मेघांचा जोरदार वर्षाव. ही सारी सृष्टि त्रिगुणात्मक आहे. किंबहुना सृष्ट्युत्पत्तीची मूळ सुरुवात ज्या महत् तत्त्वापासून होते, तें मूलतत्त्वहि ह्या त्रिगुणांच्या मिश्रणाचाच परिणाम आहे. ह्या त्रिगुणांच्यामुळेंच जीवाच्या ठिकाणीं मोह (= भ्रम, अज्ञान) निर्माण होतो. त्याच्या पुराखालीं यमनियमांचीं गांवें-शहरें वाहून जातात. **यमनियम** = अष्टांगयोगांतील पहिली दोन अंगें. आत्मसंयमन व इंद्रियनिग्रह. पातंजलीच्या योगसूत्रांत पांच प्रकारचे यम व पांच प्रकारचे नियम सांगितले आहेत. 'तत्र अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह यमाः ॥' (पाद. २ सू. ३०) 'शौच संतोष तपः स्वाध्यायः ईश्वर प्रणिधानानि नियमाः ॥' (पाद. २ सू. ३२)

[ **पांच प्रकार स्पष्ट व्हावेत म्हणून संधि न करतांच सूत्रांतील शब्द वेगळे लिहिले आहेत.** ]

(५) **आवर्त** = भोंवरा. **वळसे** = वळणें; हकरे (पाठभेद) = :करा (राजवाडे). 'प्रमदादि = स्त्रिया वगैरे. या ऐवजीं **प्रमादादि** =

चुका, अपराध. हा पाठ एका दृष्टीनें द्वेष, मत्सर यांच्या संदर्भात बरा वाटतो. अर्थात् षड्रिपूंच्या मालिकेंत द्वेष-मत्सरांच्या बरोबर आरंभीं 'काम' आहे ही गोष्ट लक्षांत घेतां कामाचें आश्रयस्थान म्हणून प्रमदेचा उल्लेख येणेंहि सहाजिक वाटतें.

(६) **वोभाणें** ( ओभाणें > उत् + भरण ) = पूर. **वोसाणें** (>उत्+स्रावणक ) = पुरांतून वाहून आलेली वस्तु. कर्माकर्मांचा पूर आल्यावर त्याबरोबर सुखदुःखें तरंगत येणारच. (७) **जीवफेन** = जीवरूपी फेंस. **संघाट** = समुदाय. जीवोत्पत्तीच्या भौतिक उपपत्तीवर केलेलें हें सांग रूपक किती सार्थ आणि मार्मिक आहे बरें ! (८) **चळिया** = लहान लाटा. **मदत्रय** = विद्या, धन व शक्ति यांची उन्मत्तता. **उकळिया** = उकळ्या. **आकळिया** = प्रसार. कलियां (पाठभेद) = उकळी. **उह्माळ** (>उत्+मल) = उसळी.(९) **चोंढे** = बांध ( चोंढी = खळगा ). (१०) **संमोह** = मोह, अज्ञान. विभ्रम ऐवजीं 'भ्रम' हाच पाठ योग्य होय. **भ्रम** = भास, गोंधळ, घोंटाळा. **आविस** (आमिष) = खाद्य. **देव्हड** = वक्र ( किंवा दीडपट = अधिक. ) **भोंवणें** = भ्रमणें, फिरणें. (११) **खडुळ** (>गोधू-लनम् ) = गढूळपणा. **आस्था** = श्रद्धा, आसक्ति. रेवले = रुपले, रुतले. **अवगाला** = चिखल, गाळ. **खळाळ** = खळबळ, खळखळाट. (१२) **धारसा** = जोराचा प्रवाह. **वाड** = मोठा. **दुवाड** = दुस्तर, कठिण, भयंकर.

(१३) **पुनरावृत्ति** = पुनर्जन्माच्या उसळीनें (**उभडे**) सत्यलोकाचे बुरुज ( हुडे ) डगमगतात ( **झळंबती** ) व त्याच्या आघातानें ( **घायें** ) ब्रह्म-गोलकाचे धोंडे कोसळून पडतात. (१४) **वाहिलेपण**=शीघ्रत्व, वेग. **न धरिती वोभाणें** = पूर ओसरत नाहीं.

(१५) **तरणोपावो** = तरून जाण्याचा उपाय अपायकारकच (**अपावो**) होतो.(१६) **बाहीं** = बाहूंनीं किंवा बाहूबळावरच. (रिगाले = पोहण्यास निघाले). **शुद्धी** = शोध, तपास, पत्ता. **जाणिवेचा डोह** = ज्ञानडोह.

(१७) सांगड=नदींतून तरून जाण्यासाठीं भोपळे एकत्र बांधून तयार केलेलें साधन. **अहंभाव** = अभिमान. **धोंडी** = मोठे धोंडे. **मदमीन** =

गर्वरूपी मासे. (१८) **वयसा** = तारुण्य. **जाड** = कासोटा, लंगोट. **कास** = आश्रय, कासोटा. **मन्मथाचिये कासे लागले** = मदनाच्या आश्रयाला गेले, कामवासनेच्या फंदांत पडले. त्यांना विषयरूपी मगरींनीं चघळून टाकले. या ओव्यांतील रूपकाची कल्पना लक्षणीय आहे. (१९) **वार्धप्य** (पाठभेद) = वार्द्धक्य, म्हातारपण. **जरंगा** = जाळें. (२०) **उपडणें** = उपटणें (आपटणें असा येथें अर्थ केला पाहिजे.) **दाटणें** = गुरफटणें. **आपदागिधी** = संकटरूपी गिधाडें. **उधवणें** = वर येणें. (२१) **बरबट** = चिखल, राड. **बोंब** = माखलें जाणें, लिप्त होणें. **रेव** = रेती, वाळू. (२२) **यजनक्रिया** = यज्ञयाग करणें. **कपाटीं** = कपारींत, गुहेंत. (२३) **कर्मबाह्या** = कर्मरूपी बाहू. (२४) **तागा न लगे** = (विचाररूपी) वेळूला ठाव लागत नाहीं. **योग** = अष्टांग योग, हठयोग. **विपायें** = क्वचित्. (२५) **आंगवण** = बळ, सामर्थ्य. (२६) **रागी** = लोभी. **आली सांती** = प्राप्त झाली असतां. (२७) **चोरां सभा दाटे** = न्यायमंडळ (सभा)चोरांना भिईल. **गळु** = गळ. **भेडा** = भेकड. **विवसी** = स्त्री पिशाच. (२८) **पाडस वागुर करांडी** = हरिणबालक जाळें कुरतडील.

---

# १४ 'नाहीं श्रुतीपरौती माउली जगा'

गीतेच्या सोळाव्या अध्यायांतील 'तस्मात्शास्त्रं प्रमाणं ते' या शेवटल्या श्लोकावरील टीकेचा भाग येथें घेण्यांत आला आहे. ज्ञानेशांची वेदैकनिष्ठा या उताऱ्यावरून दिसून येते. याला जोडूनच अ. २ मधील चार ओंव्या येथें उद्धृत केल्या आहेत. त्यावरून वेद-प्रामाण्याबाबतची त्यांची स्वतंत्र भूमिकाहि स्पष्ट होते.

(१) **आथी** = आहे ( > अस्ति–अत्थि–आथी ). **आपली कृपा** = आपली दया. येथें संदर्भानुसार 'आपल्या पारमार्थिक कल्याणाची इच्छा' असा अर्थ. **निरोप** = आज्ञा. **आन** (> अन्य) = वेगळें. **कीजे** = करावें ( विध्यर्थ ). (३) **आत्म + भुवना + माजि** = आत्मज्ञानरूपी मंदिरांत. **पैसे** ( > प्र + विश् ) = शिरतो. (४) **आदरें** = साक्षेपानें.

(५) **पुरुषार्थ** = धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशी मनुष्याचीं चार जीवित ध्येयें मानलीं जातात. त्यांना 'चतुर्विध पुरुषार्थ' म्हणतात. **गोसावी** ( गो+स्वामी )=मालक, धनी, भोक्ता पुरुष. **बैसणें घापे** = बसण्यासाठीं (आसन म्हणून) घालावें. 'बैसणें'वरून बसकर (आसन) हा शब्द निघाला असेल काय ?(६) **विरुद्ध** = प्रतिकूल. **वीरू** (पाठभेद) = अनिष्ट. (७) **कें** = कधींतरी. (८) **श्रुती** = वेद आणि उपनिषदें. यांच्याबद्दलचा विलक्षण आदर ज्ञानेशांच्या ठिकाणीं आहे. शब्दब्रह्मरूपी गणेशाच्या मूर्तीचें वर्णन करतांना त्याच्या मुगुटावरील सुगंधी पुष्पांचें स्थान उपनिषदांना ज्ञानेशांनीं दिलें आहे ( अ. १-१८ ) गणेशाच्या हातांतील मोदक म्हणजे 'वेदांतु तो महारसु' ( अ. १-११ ) असें ते म्हणतात. गीतेला तर 'जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर' ( अ. १८-१८०७ ) म्हणूनच ते गौरवतात. (९) **ब्रह्मेंसीं मेळवी तंव** = मोक्षास पोंचवीपर्यंत. 'ब्रह्मेंसीं' या तृतियान्त पदांतील 'सीं' प्रत्यय अर्थवान् असून त्याचा अर्थ सह (= ब्रह्मासह) आहे. पण **विशेषेंसीं** ( = विशेषकरून, अगत्यानें). या पदांतील तृतियान्तापुढील 'सीं' प्रत्यय हा स्वार्थे म्हणजे निरर्थक

आहे. (१०) **धर्माचेनि बलार्थे** = धर्मास बळ यावें यासाठीं किंवा धर्माचरणाच्या बलानें. या ओवींतील सार्थे व बलार्थे या दोन्ही शब्दांची विभक्ति चतुर्थीच असल्यानें येथें पहिलाच अर्थ बरोबर वाटतो. (११) **धर्मानुज** = धर्माचा धाकटा भाऊ; धर्माच्या पाठचा (म्हणून पाठीराखा); येथें या शब्दानें ज्ञानेशांनीं श्लेष साधला आहे. "धर्माचा तूं धाकटा भाऊ आहेस तेव्हां धर्मानुकूल आचरण करून त्याचा पाठिराखा होणें, हें तुला ओघानेंच प्राप्त होतें." 'बोधेंचि' या पाठाऐवजीं 'ओघेंचि' हा पाठ अधिक ग्राह्य वाटतो. **अनारिसें** = वेगळें, भलतें (धर्माला विरुद्ध असें).

(१२) **अकृत्य** = करूं नये असें अपकृत्य. **कुडें** = वाईट. **वाळावें** = टाळावें (वाल् ∠ वारय). (१३) **कृत्यपणें खरें निगे** = करण्यास योग्य म्हणून जें ग्राह्य ठरेल तें. **सारावें** = पूर्ण करावें; संपवावें. (१४) **विश्वप्रामाण्य** (प्रमाणिची–पाठभेद) **मुद्रा** = जगाची खात्री पटविणारी राजमुद्रा. **त्रिशुद्धी** = सर्वथा, निःसंशय. एखाद्या गोष्टीची तीनदां शुद्धी म्हणजे परीक्षा केल्यावर ती गोष्ट निर्विवाद सत्य ठरते अशी कल्पना. त्यावरून 'त्रिवार सत्य' 'निःसंशय सत्य' असा वाक्प्रचार रूढ झाला असावा. 'लोकसंग्रहासाठीं अधिकारी पुरुषांनींहि धर्मसंमत कर्माचरण केलेंच पाहिजे' हा विचार ज्ञानेश्वरींत इतरत्रहि मांडलेला दिसून येतो.

**उदा०**— 'देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागी ॥ (अ. ३–५७) 'म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं (अ. ३-५९).

—१५ ते १८ ओव्या—

वेदांचा आधार पुढें करून काम्य कर्मांचा बडिवार माजविणारांचें वर्णन (भोगासक्त कर्मठ-उतारा ८ पहा) केल्यावर वेदांतील कर्मकांडात्मक भागाचा अधिक्षेप करण्यासाठीं 'त्रैगुण्य विषया वेदा' हा श्लोक गीतेंत आला आहे. (अ. २–४५) त्यावर टीका लिहितांना 'तिहीं गुणीं आवृत । हे वेद जाण निभ्रांत' असें ज्ञानेश्वरांना म्हणावें लागलें आहे. वेदांतहि राजस, तामस भाग आहे; अशी कबुली दिल्यावरहि 'म्हणोनि

उपनिषदादि समस्त । सात्विक ते' असा निर्वाळा देऊन ज्ञानेश्वर श्रुति माउलीवरील आपली निष्ठा प्रकट करतातच. त्यानंतर वेदांना कमीपणा येऊं न देतां ज्ञाननिष्ठेचें महत्त्व पटविण्याच्या ओघांत 'यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके' या श्लोकावर (अ. २-४६) प्रस्तुतच्या चार ओव्या ज्ञानेशांनीं लिहिल्या आहेत.

(१५) घेपे = घ्यावें. (१६) गभस्ती = सूर्य. (१७) आर्तीच जोगें = इच्छेप्रमाणें, तहानेची पीडा दूर होण्यापुरतें. आर्ति = इच्छा किंवा दुःख, पीडा. (१८) विवरिती = विवरण करतात.

आपल्या प्रतिपादनाच्या ओघाला इष्ट असेल तसें श्लोकार्थाला वळण लावण्याचें ज्ञानेशांचें धोरण येथें अगदीं स्पष्ट होतें. या श्लोकाचा अर्थ इतर विद्वानांनीं वेगळा केला आहे. ( गीतारहस्य-पान ६३० पाहा. ) अर्थात् यावरूनच ज्ञानेशांची स्वतंत्र दृष्टि, समन्वय बुद्धि व वेदांवरील त्यांची भक्ति हे विशेष स्पष्ट होतात.

---

# १५ अश्वत्थ वृक्षाचें उत्पाटन

गीतेच्या १५ व्या अध्यायांत आरंभीं अश्वत्थ (वट) वृक्षाच्या रूपकाधारें सृष्टीच्या नामरूपात्मक पसाऱ्याचें वर्णन केलें आहे. अ.१३–१४ मध्यें सांख्यांच्या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या विलासाचें वर्णन करून जगद्रूपाचें जें स्पष्टीकरण केलें आहे, त्याला पूरक असेंच हें वर्णन आहे. गीतेनें हें वर्णन कठोपनिषदांतील वर्णनावरूनच घेतलें आहे. 'ऊर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् (गीता १५-१) 'ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थं सनातनः' (कठो० ६–१).

या वृक्षाचें मूळ (परमात्मा = सांख्यांच्या प्रकृति-पुरुष या तत्त्वांपलिकडचें आत्मस्वरूप) वर असून त्यापासून निघालेल्या जगद्वृक्षाच्या फांद्या (त्रिगुणात्मक प्रकृतीचा पसारा) खालीं म्हणजे मनुष्यलोकीं पसरल्या आहेत. त्यांचें वर्णन करतांना गीतेनें वेदांती व सांख्य वर्णनांचा मेळ घातला आहे. (गीता अ. १५–श्लोक १–२ पहा). ज्याला आदि नाहीं, आधार नाहीं, पण जो अवाढव्य आहे, अशा वृक्षाचा नाश करून त्याच्या बुडाशीं असणारें अमृततत्त्व ओळखण्याचा मार्ग कोणता हें श्लोक ३-४ मध्यें गीतेनें सांगितलें आहे. ज्ञानेशांनीं ओव्या ४६ ते २०७ या ओव्यांत या विलक्षण अशा अश्वत्थ वृक्षाचें सविस्तर वर्णन केलें आहे. त्यानंतर 'अशा या वृक्षाचा शेवट कोण करील' या अर्जुनाच्या शंकेला उत्तर देण्यासाठीं 'न रूपमस्येहतथोपलभ्यते'...ह्या तिसऱ्या श्लोकावर त्यांनीं एकूण ६७ ओव्या लिहिल्या आहेत. त्यांपैकीं ४७ ओव्यांचा उतारा येथें घेतला आहे.

(१–२) अगोदर केलेल्या सविस्तर विवेचनाचा समारोप करून 'अश्वत्थ वृक्षाचें उत्पाटन' हा नवा मुद्दा श्रीकृष्ण पुढें ठेवीत आहेत, असा उचित उपक्रम ज्ञानेशांनीं येथें केला आहे. (३–६) अर्जुनाच्या

पोटांत (मनांत) उत्पन्न झालेली शंका या ओव्यांत ज्ञानेश्वर विशद करून सांगतात. त्याचबरोबर अश्वत्थ वृक्षाचें विलक्षणत्वहि पुन्हां एकवार ते मनावर ठसवूं पहात आहेत. (पहा–' ऐसा गाढा आणि अफाट्ट '...).

(१) **अधोर्ध्वशाखु** = वर मूळ असलेल्या या संसाररूपी वृक्षाला खालीं आणि वर दोन्ही बाजूला त्रिगुणांनीं पोसलेल्या फांद्या आहेत. (असें सांगण्यांत "कर्म-विपाक प्रक्रियेचा धागाहि यांत ओवून दिला आहे.–" लो. टिळक) मनुष्यप्राणी इत्यादि फांद्या या खालच्या, तर रवि, चंद्र, इंद्र, ब्रह्मदेव, शिव या वरच्या फांद्या होत असें वर्णन पूर्वी आलेंच आहे. (पाहा–अ. १५ ओव्या–१९५–२०७)

(२) **अधींचीं** = खालचीं (मूळें). 'ब्रह्मादिक फांद्यांचें मूळ कारण मनुष्यत्वच होय म्हणून मनुष्यत्वाला खालचीं मूळें असें आम्हीं म्हटलें,' असें ज्ञानेशांनीं ओवी २०७ मध्यें सांगितलें आहे. **सविवळें** = स्पष्टपणें किंवा विस्तारानें. **उपपत्ती** = खुलासा. **उपरातिं** (पाठभेद) = उफराटीं (मूळें). **परिसविलीं** = ऐकविलीं.

(३) **उत्पाटी** = उपटून टाकी. **उत्पाटन** = **उन्मूलन** = उपटणें.

(४–६) वरच्या फांद्या शेवटीं ब्रह्मदेवापर्यंत गेल्या आहेत. मूळ बीज खालीं नसून वरच आहे. शिवाय तें अव्यक्त आहे. खालीं वृक्षादि स्थावर वस्तूंपर्यंत फांद्या गेल्या आहेत. मध्यभागीं मनुष्यादि फांद्या आहेत. 'अशा या अमर्याद व बळकट (गाढा) वृक्षाचा शेवट होणार कसा?' पण हा क्षुद्र (हळुवट्ट) भाव (विचार) मनामध्यें धरूं नकोस (**झणी धरिसी**) झणी किंवा झणें हें 'नको' या अर्थी क्रियापदाबरोबर येतें.

(७) **दोषें** = दोसें = उद्देशानें, हेतूनें. करितां, साठीं या अर्थी यादवकालीन वाङ्मयांत हें शब्दयोगी अव्यय आलेलें दिसतें. **देशें दवडावा** = बाहेर घालवावा, देशोधडी लावावा. (८) **गंधर्वदुर्ग** = आकाशांतील (मेघाकृतीचे) किल्ले. **शशविषाण** = सशाचें शिंग. **खपुष्प** = आकाशांतील फूल. [**अस्तित्वांत नसलेल्या या गोष्टींचे दाखले देण्यांत जगद्वृक्ष ही देखील भासमान होणारी पण मुळांत नसणारी अशी मायिक गोष्ट आहे, हा वेदान्ती विचारच येथें ज्ञानेशांना**

**पटवावयाचा आहे.]** (९) **साचोकारा** = सत्य, यथार्थ. **रूख** = वृक्ष, झाड. **दरारा** = भीति, धाक. (१०) **डाळां** = डाहळ्या, फांद्या. (डाळां हें वर्णलोपाचें उदाहरण) **परी** = प्रकार. **उजरी** = उत्कर्ष, उदय, विस्तार किंवा स्पष्टता. (११) **चेइलेपण** = जागृतावस्था. **दुगळी** = दुर्बळ, पोकळ [**दुबलेयाची** (पाठभेद) = **दुर्बळ माणसाची**].

[यापुढील दोन ओव्या माडगांवकर, साखरे, बंकटस्वामी, दांडेकर यांच्या प्रतींत आहेत. राजवाडे प्रतींत नाहींत म्हणून त्या प्रक्षिप्त ठरविण्यांत येतात; पण 'नकलकार पदरचें जसें कांहीं लिहितो त्याप्रमाणें मुळांतील कांहीं लिहिण्याचेंहि तो विसरतो' (दांडेकरप्रत-प्रस्तावना) हाहि नकलकाराचा अनवधानजन्य दोष आपण लक्षांत घेतला पाहिजे. सांप्रदायिकांच्या परंपरागत पाठाची अगदींच उपेक्षा करणें म्हणूनच जड वाटतें. राजवाडे प्रतीपेक्षां अधिक असलेल्या पुढील ओव्यांच्या वेळीं (ओव्या २० ते २५. २७ ते ३९) हाच मुद्दा लक्षांत घेणें जरूर आहे.]

(१२-१३) हा वृक्ष जर खरा असता तर कोण मायेचा पूत या वृक्षाचें उत्पाटन करूं शकतां? असा सडेतोड सवाल विचारण्यांत जगताबाबतचा अजातवादाचा दृष्टिकोनच ज्ञानेश्वर व्यक्त करीत आहेत.

(१४) **कासवीचें तूप** = कासवी आपल्या दृष्टीनेंच पिलांना पोसते. तिला दूध नसतें; तेव्हां तूप कोठून येणार? म्हणून शशशृंग, गंधर्वदुर्ग, वांझेची लेकुरें यांच्या वर्गांतच कासवीच्या तुपाचा समावेश होतो. अस्तित्वांत नसणाऱ्या गोष्टींसबंधींच्या या कल्पना आहेत. त्याप्रमाणें संसारवृक्ष ही देखील केवळ कल्पनाच आहे. (१५) मृगजळाच्या पाण्यावर केळीच्या बागा किंवा साळीचें शेत लावतां येत नाहीं. तसेंच (१६) लटक्या अज्ञानाच्या पोटीं खरेंखुरें जगडंबर निर्माण होऊं शकत नाहीं. **केतुकें** = केवढें? **सतिकें** (पाठभेद) = सत्य. **वावो** = मिथ्या. **अज्ञान** = अविद्या (माया) हीच मुळांत लटकी आहे. तेव्हां तिचें कार्य म्हटलें जाणारें जगत्‌हि लटकेंच ठरतें; असा भाव.

**[अमृतानुभवाच्या ७ व्या प्रकरणांत ज्ञानेशांनीं जें अज्ञानखंडन केलें आहे तें या संदर्भांत पाहावें. गीतेनें मायावादाला मान्यता दिल्या-**

मुळें त्या त्या संदर्भांत ज्ञानेशांनीं मायेच्या प्रभावाचें सविस्तर व पारिणामकारक वर्णन केलें आहे. ( उदा० मायानदीची दुस्तरता, अश्वत्थवृक्ष इ. ) परंतु शंकराचार्यांपेक्षां वेगळी बैठक स्वीकारून ज्ञानेश्वरांनीं पूर्णाद्वैताची मांडणी केली असल्यानें त्यांना मायेचें अस्तित्व आवश्यक वाटलेलें नाहीं. ज्ञानेशांची हीच भूमिका प्रस्तुतची ओवी दाखवून देत आहे.]

(१७–२२) केवळ अज्ञान्यांच्या दृष्टीनें अश्वत्थ वृक्षाला अस्तित्व आहे, एवढेंच नव्हे तर त्याला अंत नाहीं हेंहि त्यांच्या दृष्टीनें खरें आहे. हा भाव पुढील ओव्यांत ज्ञानेश्वर मांडीत आहेत. (१८) न पाहे = उजाडत नाहीं ( पाहे = पहांट ). आरौते = अलीकडे, अगोदर. (१९) नुधवी माथा = ( विवेक निर्माण होत नाहीं तोंपर्यंत...) डोकें वर करीत नाहीं. उधवणें = उचलणें. यापुढील तीन (२०–२२) ओंव्या प्रक्षिप्त ठरविण्यांत येतात. कारण काय तर ज्ञानेशांनीं ' तेविं ( किंवा तैसा ) जंव पार्था ' असें म्हणून दृष्टांताचा शेवट केल्यावर पुन्हां तशाच प्रकारचे दृष्टांत येणाऱ्या ओव्या ते लिहिणार नाहींत. पण ज्ञानेशांच्या शैलीकडे पहातां असें होणें अशक्य वाटत नाहीं. इतर अनेक ठिकाणीं उपमेयवाक्य लिहून दृष्टांत-मालेचा शेवट केल्यावरहि तसलीच दृष्टांतमाला पुन्हां सुरू केलेली दिसून येते. उलट तरंग, मृगजळाभास व दीपप्रभा हे दृष्टांत ज्ञानेश्वरीयच वाटतात. २२ व्या ओवींतील सिद्धान्त-वाक्य ज्ञानेश्वरीय पद्धतीचेंच आहे. ओव्या २३ ते २९ यांमध्यें भववृक्षाचें 'अनादित्व' ज्ञानेशांनीं कोटीक्रमानें सिद्ध केलें आहे. (२३) शाब्दी आथी = प्रख्याति आहे. आलु (आलुकी) = आळ, मिथ्या आरोप. ( > अलीक = खोटें ) नुरोधी बोलातें (पाठभेद) एया = 'हा वृक्ष अनादि आहे.' या बोलण्याला विरोध करूं नकोस. नुरोधी बोल तया = हें बोलणें त्याला (अनादित्वाला) बाधक नाहीं. (अनु+विरोधी→नुरोधी ).

(२४) जें खरोखर नाहींच त्याला आरंभ तरी कोठून असणार ? म्हणून ' अनादि ' म्हटलें तर कांहीं बिघडत नाहीं, असा भाव. अशा तऱ्हेचा शाब्दिक कोटिक्रम कधीं कधीं ज्ञानेश्वर करतात. 'जी विद्यमान नाहीं ती

अविद्या ' असा त्यांनीं अमृतानुभवांत युक्तिवाद केला आहे. 'अविद्या येणें नावें । मी विद्यमानचि नव्हें । हे अविद्याचि स्वभावें । सांगत असे।।' (अमृ० प्र. ६–३८). तसाच युक्तिवाद येथें केलेला दिसतो, तेव्हां या ओव्या (२४–२५) प्रक्षिप्त म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं.

(२७–३९) या ओव्यांत याचसंबंधींचे आणखी दृष्टांत दिलेले आहेत. राजवाडे प्रतींत ते नाहींत. परंतु त्या दृष्टांतांचें स्वरूप आणि ज्ञानेशांची विस्तारात्मक लेखनशैली लक्षांत घेतां परंपरेनें चालत आलेला हा भाग प्रक्षित ठरविणें योग्य वाटत नाहीं. (२७) **कैंची** = कोठची. **कें** = कोठें. (२८) **व्योमकुसुम** = आकाशपुष्प. (२९) घट तयार होण्यापूर्वीचा त्याचा अभाव ( प्रागभाव ) हा कोणी उत्पन्न केल्याशिवायच असतो तसा याचा अनादिपणा आहे. ( न्यायशास्त्रांतला हा दाखला आहे. )

(३०) या भववृक्षाला आदि नाहीं व अंतहि नाहीं. पण मधल्या स्थितींत त्याचा भास मात्र होतो. ( 'व्यक्त मध्यानि भारत' ) परंतु तो भासच म्हणून तेंहि त्याचें रूप मिथ्याच ( **टवाळ** ) होय.

(३१) याला समर्पक दाखला असा कीं, मृगजळाला ( मृगांबु ) पर्वतांतील उगम नाहीं कीं समुद्राला जाऊन मिळणें नाहीं. तें मधेंच तेवढें दिसतें. दिसतें म्हणजे भासतें तिथें असत मात्र कांहींच नाहीं. **ब्रह्मगिरी** = त्र्यंबकेश्वराजवळील गोदेच्या उगमाचें ठिकाण. ज्ञानेश्वर-निवृत्तींच्या जीवनांत त्र्यंबकेश्वराला विशेष स्थान आहे; म्हणून त्यांना ब्रह्मगिरीचीच आठवण होणें स्वाभाविक वाटतें.

(३२) खोटेपणाचें नवल ( **नवाई** ) असें कीं तें नसलें तरी भासतें. याला समर्पक दाखले म्हणून इंद्रधनुष्य. (३३) ढोंगी साधू. (३४) आकाशाचा निळेपणा. (३५) स्वप्नींचे क्षणभंगुर पदार्थ, (३६) पाण्यांतील प्रतिबिंब. (३७)यांचा उल्लेख ज्ञानेश्वर करतात. या स्थितिकालांतहि जो भास होत असतो तो क्षणाक्षणाला बदलणारा असतो. (३८) यासाठीं पाण्यावरील तरंग, विद्युल्लता, ग्रीष्मांतीचा वारा. (३९) या चंचल पदार्थांचे दाखले दिले आहेत. मात्र ' नेणतया आपजे । आहे ऐसा ' किंवा ' भुलवी अज्ञानाचे डोळे ' या ओवीचरणांवरून अज्ञान्याच्या ( बद्ध अशा जीवाच्या )

भूमिकेवरून पहातां संसारवृक्षाचें अस्तित्व भासतें असें या ठिकाणीं ज्ञानेशांनीं मान्य केलें आहे, म्हणूनच शेवटीं 'अज्ञानमूळा यया । ज्ञानाचि खड्ग' असा उपाय त्यांना सांगावा लागला आहे.

(४०) आदि ( उत्पत्ति ), रूप ( स्थिति ), अंत ( लय ), या तीन अवस्था या वृक्षाला नाहींत; म्हणजे तो वृक्षच अस्तित्वांत नाहीं. मग उपटण्याची खटपट (**कुंथाकुंथी**) ती कशाला हवी ? असें म्हणूनहि पुढील ओंव्यांत हा वृक्ष कोणत्या शस्त्रानें तोडावयाचा तें सांगितलें आहे.

(४१) **थांवला**=बळावला, वाढला. **खांडेनि** (> खड्ग) दुधारी तरवारीनें. **लोटीं** = तोडून टाक. **आत्मज्ञान** = ब्रह्म हेंच सत्य, बाकी सर्व मिथ्या किंवा आपण ब्रह्मरूपच आहोंत हें ज्ञान. या स्वस्वरूपज्ञानानें अज्ञानजन्य अशा संसारवृक्षाचा शेवट करतां येतो. (४२-४३) " ज्ञानमार्गाखेरीज हठयोग, संन्यास,कर्मकांड इत्यादि इतर साधनें हीं माणसाला अधिकाधिक संसारांत गुंतवितात;त्यामुळें संसारवृक्षाच्या या फांद्यांवरून त्या फांद्यांवर असें कितीदां तरी त्याला हिंडावें लागतें. ( अनेक जन्म त्याला घ्यावे लागतात.) एवढ्यासाठीं या वृक्षाचें मूळ जें अज्ञान तेंच तूं स्वस्वरूप ज्ञानानें तोडून टाक " असें श्रीकृष्ण म्हणत आहेत. (४४) **उरग** = सर्प. **डांगा** = काठ्या. **भारू** = भार, ओझें. **फारू** ( पाठभेद ) = प्रहार. (४५) **डोणी** (> द्रोणी) = नाव. **दांग** = अरण्य. **वोहळ** = ओहळ, लहान ओढा किंवा नाला. (४६) **नाथिलिया** = नसलेल्या; खोट्या. **जाचतया** = खटपट करणाऱ्याचा; ( **वारा** = उत्साह) **विकोपीं जाय** = नाश पावतो. **आपणपें लोपे** = त्याबरोबर आपणहि नष्ट होतो. (४७) **भया** = भीतीला. **घाया** = ( पाठभेद ) = जमखेला. **ओखद** = औषध. **चेवोचि** = जागृतीच. **अज्ञानमूळा यया** = अज्ञान हेंच मूळ असलेल्या या संसारवृक्षाला.

---

# १६ गुणातीतत्व

गीतेच्या 'गुणत्रयविभागयोग' या १४ व्या अध्यायांत एकाच प्रकृतिपासून गुणभेदानें नानाविध सृष्टि ( विशेषतः सजीव सृष्टि पण स्थावर सृष्टिसुद्धां) कशी उत्पन्न होते याचें निरूपण आलें आहे. सातव्या अध्यायांतील क्षराक्षर विचाराचाच हा भाग असल्यानें त्यांतील ज्ञानविज्ञानाच्या विवेचनाला धरूनच श्रीकृष्णानें त्रिगुणांच्या पसाऱ्याचें प्रथमारंभीं वर्णन केलें आहे. परंतु सांख्यांचें द्वैत गीतेला मान्य नसल्यानें प्रकृति व पुरुष यांच्या पलीकडे जो एक आत्मस्वरूपी परमेश्वर किंवा परब्रह्म आहे, तें निर्गुण ब्रह्म ओळखील तो त्रिगुणातीत म्हणावयाचा, (व अशी त्रिगुणातीतता म्हणजेच ब्राम्ही स्थिति होय.) हा सिद्धान्त गीतेनें या अध्यायांत शेवटीं सांगून टाकला आहे. या त्रिगुणातीत अवस्थेचें वर्णन अ. १४ श्लोक १९–२६ यांमध्यें आलें आहे. त्यापैकीं १९ व्या श्लोकावरील ज्ञानेशांचें निरूपण प्रस्तुतच्या उताऱ्यामध्यें घेतलें आहे.

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥

अर्थ : ( अ. १४ श्लोक १९ )

गुणांविण नसे कर्ता आत्मा तो त्यांपलीकडे ।
देखणा ( द्रष्टा ) ओळखे हें जो होय माझेंचि रूप तो ॥

( गीताई )

(१) वस्तु = परब्रह्म किंवा मूलतत्त्व. असिकें = संपूर्ण. आपणपें = आपल्याला. मूलत: एकरूप व संपूर्ण असलेलें परब्रह्मस्वरूप जेव्हां स्वत:ला त्रिगुणात्मक मानून त्या त्या गुणानुसार वेगवेगळ्या रूपानें नटतें; तेव्हांच ही सारी विविध रूपात्मक दृश्य सृष्टि भासमान होते असा भावार्थ. 'जग असकीं वस्तुप्रभा'–(अमृ० प्र. ७-२८९.)

(२) जसा स्वप्नांतला राजा परचक्र, त्यांतील जय, अपजय या सार्‍या गोष्टी स्वतःच होतो, त्याप्रमाणें (३) उंच,नीच, मध्यम या अवस्था गुणभेदानेंच सिद्ध होतात. ती गुणभेद-दृष्टि सोडून दिली कीं, मूळ वस्तु अविकृत ( शुद्ध ) स्वरूपांत जशी आहे तशीच प्रतीत होते.

(४) **वाहणी** = ओघ. **आन** = अन्य, ( विषयान्तर न वाटो. ) **मागील गोठी** = यांपूर्वीच्या श्लोकांमध्यें सत्त्वरजतम या गुणांच्या परिणामाचें वर्णन केलें आहे ( तोच विषय पुढें सांगतों असें म्हणून ) त्याच्या समारोपादाखल पुढील ओवी आली आहे.

(५) आपापल्या सामर्थ्यानुसार हे तीन गुणच देह बनतात. देहांतील भिन्न भिन्न घटक या त्रिगुणांचा परिणाम होत, असा अर्थ. उदा०—सत्त्व गुणानें जीवाच्या ठिकाणीं ज्ञान व सुख उत्पन्न होतें. रजानें तृष्णा व आसक्ति निर्माण होतात तर तमोगुणानें प्रमाद, आळस, निद्रा, अविवेक हीं उत्पन्न होतात. ( गीता—श्लोक—६,७,८ ) यापुढील दोन ओव्यांत परिणामवादी दाखले दिले आहेत. ( ६-७ ) अग्नि—लांकूडरूप, रस—वृक्षरूप, दूध—दहिरूप, गोडी—ऊंसरूप. त्याप्रमाणें (८) गुण हे स्थूल—सूक्ष्म देहरूप बनतात व जीवाला बंधनकारक ठरतात. (९) मात्र गुणांच्या एवढ्या जाळ्यांत राहूनहि जीवाच्या ( जीवात्म्याच्या ) मुक्त स्थितीला उणेपणा येत नाहीं.

(१०) **माघुत साउमें** = मागें व पुढें. **न खोमे** (> क्षोभ)=चाळविली जात नाहीं. गुणांच्या हालचालींनीं मूलवस्तूची गुणातीतता ढळत नाहीं.

(११) अशा निर्विकार, निश्चल अवस्थेलाच मुक्ति म्हणतात. **ज्ञान + अंबुज + द्विरेफु** = ज्ञानरूपी कमलाचा ( भोक्ता असा ) भ्रमर. (१२) **मागें बोलिलें** = अ. १३ श्लोक २३ पहा. **गुणीं गुणाजोगें चैतन्य नोहे** = चिद्‌वस्तु गुणांमध्यें असूनहि ती गुणास वश होणारी नसते. ती गुणाच्या पलीकडची आहे. **खागें** = मुक्कामांचें ठिकाण. अंतिम सिद्धांत. म्हणून 'गुणजात देखावें। न होनिया.'॥१५॥ याला दृष्टांत (१३) पाण्यांतील प्रतिबिंबाच्या ठिकर्‍या मनुष्य कांठावरून जसा पाहतो किंवा (१४) नट जसा स्वतःच्या सोंगानेंच फसत नाहीं. (न झकवे) त्याप्रमाणें (१५) केवळ साक्षित्वानें गुणांच्या या लीला पहाव्यात.

(१६) वोसें = न्यूनता. आकाश तिन्ही ऋतूंना आपल्या पोटांत स्थान देतें पण आपल्या अलिप्तपणाला कमीपणा येऊं देत नाहीं. त्याप्रमाणें 'देह म्हणजेच मी' हा भाव स्वस्वरूपाच्या मूळ जाणिवेला लिप्त करूं शकत नाहीं. (१७) ती स्वतःसिद्ध (आयिती) ब्रह्मस्वरूपाची जाणीव (अहंता) गुणांमध्यें सामावलेली असूनहि ती त्या पलीकडची आहे. देहात्मवादी अहंता सोडून त्या मूळ अहंतेचा स्वीकार केला कीं, (१८) मग गुणच सर्व कर्मांना ( क्रियाजातां ) कारण आहेत. मी केवळ साक्षी, अकर्ता आहे असा बोध होतो. याला दाखला. (२०) वसंत व वनशोभा यांतील संबंधाचा किंवा तारकांचें लुप्त होणें, सूर्यकांताचें प्रज्वलित होणें आणि कमळाचें विकसित होणें या क्रियांचा सूर्य जसा केवळ साक्षीभूत असतो, तसा ' अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ २२ ॥ सत्तारूप = अधिष्ठानरूप. (२३) गुणांना प्रकाशित करणें, त्यांना पाहणें, त्यांचें पोषण करणें हें सारें मी (मूलतत्त्व) करतों. परंतु गुणांचा निरास झाल्यावर जें निखळ रूप उरतें तें म्हणजे मी ( = ब्रह्मतत्त्व, मूलसत्ता. ) (२४) असें जो जाणतो त्यालाच गुणातीतत्वाची अवस्था प्राप्त होते. (२५) टीक=ठिकाण. (२६) सत्ता=अस्तित्व. (२७) देह-अहंता सोडून स्वरूप-अहंतेनें वेष्टिला जातो. ओवी १७ मध्यें हाच विचार आहे, तो पोपटाच्या दृष्टांतानें येथें स्पष्ट केला आहे. निराळ्या संदर्भात नळिकेवरील पोपटाचाच दृष्टान्त ज्ञानेश्वर देतात. ( अ. १८–३९३ व अभंग ५०५ पहा. )

(२८) बदबदा = मोठमोठ्यानें.

---

# १७ कर्मफळत्याग

(जें निपटूनि कर्म सांडिजे। तें सांडणें संन्यासु म्हणिजे। आणि फल-मात्र का त्यजिजे। तो त्यागु गा ॥ ९२ ॥ ) अठराव्या अध्यायाच्या प्रारंभीं संन्यास व त्याग यांतील असा भेद स्पष्ट करून त्यागाचेहि गुणत्रयभेदानें त्रिविध प्रकार होतील, असें श्रीकृष्ण सांगतात. त्यानंतर विहित कर्माचरणाची प्रतिष्ठा प्रस्थापित करण्यासाठीं कर्मयोगाची हातवटी त्यांनीं सांगून टाकली आहे; तो श्लोक ५-६ वरील टीकेचा भाग येथें घेतला आहे. कर्मयोगाची महति पटविणारा म्हणून हा उतारा महत्त्वाचा वाटतो.

(१) मुमुक्षु = मोक्षाची इच्छा करणारा. (२) पांथिक = वाटसरू, प्रवासी. (३) हारतलें = हरपलेलें, हरवलेलें. मागु = शोध. (४) न धातां = तृप्त न होतां. भाणें = पात्र, अन्न वाढलेलें ताट. (६) दान याग तपें = दान हें क्षत्रियोचित कर्म म्हटलें जातें. यज्ञकर्म, तपश्चर्या, हीं ब्राह्मण वर्णाचीं विहित कर्में म्हणून सांगितलीं जातात. ( पहा–श्लोक ४०–४१ अ. १८ ). साक्षेपें = अधिक दक्षतेनें, विशेष कटाक्षानें. (७) अधिकाधिक कर्माचरणांतूनच नैष्कर्म्य स्थिति प्राप्त होते असा भाव. कर्माचा सराव झाला कीं आपण कांहीं विशेष करीत आहोंत याची जाणीव नष्ट होते; त्याप्रमाणेंच कर्तव्य म्हणून केल्या जाणाऱ्या नेहमींच्या कर्मांपासून विशेष फलाची अपेक्षाहि केली जात नाहीं; हा व्यावहारिक अनुभवहि नैष्कर्म्य स्थितीचा प्रत्यय आणून देणारा आहे.

(८–१२) कर्माचरणानें राजस, तामस गुणांचीं पुटें झडून जातात व सत्त्वाचें परमधाम दृष्टीस पडतें, हा मुख्य विचार. त्याला दाखला (८) व्याधीचा निरास सतत औषध-सेवनानें होतो किंवा (१०) खारट द्रवाचीं पुटें दिल्यानें सोनें ( भांगार ) त्यांतील कीड जाऊन निर्दोष, शुद्ध बनतें.

(८) सेवेचि मांडी बांधी = सेवायाची (पाठभेद) रीत बांधतो, नियम करतो. (९) हातापोतीं = वरचेवर, लवकर. यथानिगुती = युक्तीनें,

**हातोटीनें.** (१०) **निर्व्याजु** = निर्दोष, शुद्ध. **कीड** = सोन्यांतील हिणकस भाग. (१२) **सत्त्वशुद्धि गिंवसितया** = अंतःकरणशुद्धीची इच्छा करणाऱ्याला. **सावाय** = बरोबरी, योग्यता. (१३) सत्कर्मे हीं तीर्थाच्या योग्यतेचीं होत. (१४) **मरुदेश** = निर्जल असा वाळवंटाचा भाग असलेला मारवाड देश. **झळे** = उष्णतेची झळ, लाट. (१५) **निमतया**=मरणाराला. (१६) मारक विष औषधरूपानें दिलें असतां तारक होतें. (१७) त्याप्रमाणें बंधनकारक होणारीं कर्मेंच हातोटीनें केलीं असतां जिवाला बंधमुक्त करतात.

(१८-३०) कर्तृत्वाचा अहंकार व फलाची इच्छा सोडून कर्मे करणें हीच कर्मनिरासाची हातोटी होय. (श्लोक ६). (१९) **महायाग प्रमुख** = ब्राह्मणाचीं पंचमहायज्ञादि कर्मे हीं मुख्य होत. **फुंजणें** = अभिमान, ताठा धरणें. (२०) **श्लाघा** = श्लाघ्यता (पाठभेद), मोठेपणा. (२१) **जिणता** = जिंकणारा. **मुद्रा** = राजाचा शिक्का. (२२) **पुरोहित** = उपाध्याय, भटजी. (२३) **यथा अवसरें** = योग्य वेळीं. **निरहेरें** = बुद्धिबळांतील मोहरे. कर्मे यथाकालीं निरपेक्षपणें करावींत; ज्याप्रमाणें बुद्धिबळांतील मोहरीं पुढें पुढें सरकवलीं जातात. (२४) **(फळाचा) यावा** =ओघ किंवा प्राप्ती. **मोहरा हों नेदावा** = (मनोरथाला, इच्छेला) पुढें होऊं देऊं नये. (२५) **धाया** = दाई. दुसऱ्याचें मूल संभाळणारी बाई. (२६) **पिंपरूं** = पिंपळाचें फळ. (२७) **टकळी** (टकुली) = आशा, कल्पना. **गावधनें** = ग्राम-धेनु, गांवांतील गाई.

(२८) **आपुलिया आपण गांठी लागे** = (या युक्तीनें कर्मे करणाराला) आपल्या आत्मस्वरूपाचा लाभ होतो. (२९) **देहसंगु** = देहाचा अहंकार. 'मी कर्मे करतों,' हा अभिमान. **लागु सांडोनी** = संबंध सोडून. **चांगु** = चांगला. (३०) **जीवबंधें शिणला** = संसारांतील बंधनांनीं जो दुःख पावला. **सुटके जाचे** = मुक्ततेची खटपट करतो. **पुढतपुढतीं या बोलां** = हें वारंवार सांगणें आहे.

---

# १८ अभेद-भक्ति

गीतेच्या दहाव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं विभूतियोग सांगितला आहे. 'लहानथोर सर्व भूतमात्र व त्यांच्या ठिकाणचे बरेवाईट विविध भाव हीं सर्व माझींच रूपें आहेत हें जाणून त्यांच्याकडे अभेद भावानें पाहणें आणि आपलें चित्त माझ्या मूलरूपाच्या ठिकाणीं लीन करणें हीच खरी भक्ति होय.' असा श्रीकृष्णांच्या सांगण्याचा भावार्थ आहे. या अध्यायांतील ७, ८, ९, १० या श्लोकांवरील ज्ञानेशांच्या टीकेचा सर्व भाग प्रस्तुत उताऱ्यांत समाविष्ट केला आहे.

(१) यालागीं = एवढ्यासाठीं किंवा म्हणून. या पदाचा संबंध आधीच्या ओवीकडे आहे. ती ओवी अशी 'ऐसेंनि हें विश्व येथें। मीचि प्रसवलों ना निरुतें। परी भावाचेनि हातें। माने जिया ॥ १०–१०३.' हे भाव =(श्लोक ४, ५ मध्यें उल्लेखिलेले) बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम इत्यादि विकार माझ्याच विभूति होत.

(२) ब्रह्मादिपिपीलिकावरी = ब्रह्मदेवापासून तो थेट मुंगीपर्यंत.

(३) दुसरी ओळ प्रश्नार्थक घ्यावी. 'ज्ञानी माणसाला भेदाचें वाईट स्वप्न पडेल काय ?' पाठभेदामध्यें हाच अर्थ स्पष्ट आहे. या ओवींतील दुसऱ्या चरणांत 'चेहरें' असा शब्द छापला गेला आहे. तो 'चेइरें' असा वाचावा.

(४) व्यष्टलिया = व्यापलेल्या (व्याप्ति). योगप्रतीति = योगामुळें येणारा अनुभव. (५) येणें महायोगें = या ऐक्याच्या भावनेनें. त्रिशुद्धि = त्रिवार शुद्ध, निःसंशय. (६) नाटीं = छंदामध्यें. (७) खंगु = खंड. तें सांगितलें पष्ठीं = (अ. ६–४० श्लोक पहा.) मोक्षसुखाच्या आस्थेनें अभ्यासयोगाला गति मिळते. पण मध्यंतरीं विसांवाहि घ्यावा

लागतो. परंतु तरी देखील शेवटीं त्याला सद्गतीच मिळते. हा विचार तेथें सांगितला आहे. त्याच्याशीं समानार्थक उल्लेख ' करितां ठेला तरी चांगु '

(८) **मानसा साद जाली** = मनांत ध्वनि (ऊर्मी, इच्छा) उत्पन्न झाला.

(१०) पाणी व तरंग (कल्लोळ) यांतील संबंधाप्रमाणें मी व विश्व यांचा संबंध आहे. अद्वैतबोध ठसविणारा ज्ञानेशांचा हा नेहमींचा दाखला आहे.

(१२) **भलतेथें** = वाटेल तेथें, सगळीकडे. (१४) **खेळत सुखें त्रिभुवनीं** = त्रैलोक्यांतील व्यवहार (कर्तव्यकर्मे) सुखानें करतात. (१७) **माजें** = मदानें. आत्मज्ञानाच्या उन्मादामुळें. **भोजें** = कौतुकानें, आनंदानें. **घेपे-दीजे** = घ्यावें-द्यावें, घेणें-देणें.

(१८–१९) भक्तांच्या परस्पर प्रेमभावनेच्या उत्कटपणाचें उत्कृष्ट वर्णन यामध्यें ज्ञानेशांनीं केलें आहे. उचंबळलेल्या दोन सरोवरांचा दृष्टांत समर्पक नि सरस आहे. भक्तांच्या भेटीचें हें वर्णन ज्ञानेशांच्या व्यक्तित्वाशीं जुळतें आहे. तेव्हां ६ ते १९ या ओव्या प्रक्षिप्त कां म्हटल्या जाव्यात हें कळत नाहीं. (२१) **सामरस्य** = समरसता. **वोसाण** = पुरांत वाहून आलेल्या वस्तु. **सात्त्विकाचें**=अष्टसात्विक भावांचें वोसाण. ' स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः। वैवर्ण्यमश्रु प्रलय इत्यष्टौ सात्विकाः स्मृताः ॥ '

**चतुष्पथ** = चौक. चव्हाटा. (चारी वाटा मिळण्याचें स्थान). चौकांत मध्यभागीं गणपतींचें देऊळ उभारण्याची त्यावेळीं कुठें कुठें पद्धति असावी.

(२३) गुरु-शिष्यसंवादांत ॐ या एका अक्षरानें सांगितला जाणारा बोध हे भगवद्भक्त मेघांच्या गडगडाटाप्रमाणें गर्जना करून सगळीकडे पसरवितात. वारकऱ्यांच्या नामघोष पद्धतीचा उल्लेखच येथें ज्ञानेशांना अभिप्रेत असावा. तुल०—'मेघ वृष्टीनें करावा उपदेश। ' (तुका.)

(२४) **जालेपणें** = पक्क दशेस आल्यावर, (कळी) पूर्ण उमलल्यावर. **पारणें** = मेजवानी. (२५) भक्ताच्या तदाकार वृत्तीचें सुंदर वर्णन या एकाच ओवींत पहायला सांपडेल. (२६) **अव्यंगवाणें** = व्यंगरहित, पूर्ण. **आपणपेयां** = आपलेसें. (२७) **सेल** = उत्तम भाग, शेलका वांटा. (२८) **अव्हांटा** = आडवाटा. **अपवर्ग** = मोक्ष. (२९) **उपाइलें** = मिळाविलें.

(३१–३७) भगवंत आणि भक्त यांतील प्रेमसंबंध यांत वर्णिला आहे. आई-बालक यांच्यांतील वात्सल्यभावाचा दाखला या ठिकाणीं देतात.

(३१) **लळेयाचिया बाळका पाठोपाठीं** = लाडक्या मुलाच्या पाठीमागें.

(३२) **उपास्तीची पदवी** = उपासनेची योग्यता, भक्तीचा अधिकार.

(३३) **हे पाळती** = अशा प्रकारचें पालन ( पोषण ).

(३४) **सांकड** = (नेहमींचा अर्थ संकट, पण इथें–) संकोच, तुटवडा.

(३५) **वाहणी केले**=(स्वर्गेच्छु व मुमुक्षु अशांना)अर्पण (स्वाधीन) केले.

(३६) **आपणपेंवीण** = स्वतःशिवाय, ( मीपणाशिवाय ).

(३७) **आपणयासाठीं** = आपलेपणाच्या मोबदल्यांत, मीपणा देऊन.



# १९ भक्ताचीं लक्षणें

गीतेच्या भक्तियोग नामक १२ व्या अध्यायांत प्रारंभीं श्रीकृष्णांनीं हठयोगापेक्षां साधकांच्या दृष्टीनें भक्तिमार्गाचें सुलभत्व वर्णन करून पायरी पायरीनें भक्तियोग कसा साधतां येतो तें सांगितलें आहे. 'अद्वेष्टा सर्वभूतांना' या पदांनीं सुरुवात होणाऱ्या १३ व्या श्लोकापासून पुढें १९ व्या श्लोकापर्यंत भक्ताची जगाकडे पहाण्याची दृष्टि, त्याची स्वाभाविक वृत्ति व वागण्याची पद्धति यांचें वर्णन आलें आहे. त्यांपैकीं १८ व १९ व्या श्लोकांवरील भक्त-लक्षणांच्या ओव्या व त्यालाच जोडून असलेल्या समारोपाच्या भागांतील (श्रीकृष्णाची भक्तवत्सलता स्पष्ट करणाऱ्या) कांहीं ओव्या प्रस्तुत उताऱ्यांत घेतल्या आहेत.

(१) **वैषम्य** = विषमता, द्वैतदृष्टि, सारखेपणाचा अभाव, वांकडेपणा. **सरिसा पाडु** = सारखी योग्यता. (२) **पारखियां** = पारखा, परक्याला. ही दुसरी ओवी राजवाडे प्रतींत १३ व्या श्लोकावरील टीकेंत आहे. (३) **इक्षुदंडु** = ऊंस. (६) **एकचि मान** = एकच किंमत, सारखीच मान्यता. (७) **मारुत** = वारा. **मध्यस्थ** = मध्यभागीं राहणारा, तटस्थ वृत्तीचा. (९) **सेव्य** = सेवन करण्याजोगें, पिण्यास योग्य. **उदक** = पाणी. (१०) **सबाह्य** = अंतर्बाह्य. **लागु** = संबंध. भक्त हा सर्वसंगपरित्यागी म्हणजे संन्यासी नव्हे तर निरभिमानी असतो. **आंगु आंगीं सूनी** (= घालूनी; **सुणें** = घालणें) **एकाकी असे** = जो (भक्त) जीवस्वरूपाचा ब्रह्मस्वरूपांत प्रवेश करवून एकाकी (निःसंग) असतो. (११) **श्लाघ** = आनंद मानणें. (१२) **पांती** = पंगत. **प्राणवृत्ति** = वायूसारखी उदासीन वृत्ति. **विचरे** = हिंडे. लोकांत (नगरांत) काय, वनांत काय कुठेंही सारख्याच वृत्तीनें वारा हिंडतो. त्याच उदासीन वृत्तीनें भक्त कुठेंहि रहातो. (१३) 'न बोलैल मौनि' हा पाठ येथें योग्य दिसतो. खरेंखोटें तो कांहींच बोलत नाहीं. **आराये ना** = तृप्त होत नाहीं. (पर्यायानें कंटाळत नाहीं.) **उन्मनी** = जागृति, स्वप्न, सुषुप्ति तुर्या (समाधिस्वरूप

चतुर्थ अवस्था ) या पलीकडील पांचवी मनरहित अवस्था. (१४) ' यथा लाभे न तोखें ' यापेक्षां '**यथालाभेनि तोखे**' हा पाठ बरा वाटतो. **पारुखणें** = रुसणें, रागावणें. (१५) **बिढार** = बिऱ्हाड, घर.

(१६–१७) भक्ताच्या विश्वाकार स्थितीचें वर्णन येथें आलें आहे. वारा जसा अवकाशांत (आकाशांत) सर्वत्र भरून राहिलेला असतो, तसा भक्त जगरूप होऊन रहातो. (१८) अशी स्थिति प्राप्त होऊनहि ज्या ज्ञानी भक्ताच्या ठिकाणीं माझ्या भजनाविषयीं आस्था असते. त्याला मी आपल्या मस्तकावर मुकुटाच्या ठिकाणीं धारण करतों. (१९) **पायवणि** =चरणोदक, पादतीर्थ. (२०) विष्णूचें पादोदक असणारी गंगा शंकरांनीं डोक्यावर धारण केली; म्हणून श्रद्धाविषयाचा आदर कसा करावा, या बाबतींत शंकरालाच लोकांनीं गुरू करावें, असें श्रीकृष्ण म्हणतात. (२१) पण शंकराची अशी स्तुति करणें म्हणजे येथें पर्यायानें आपली स्तुति केल्यासारखेंच होत आहे; ही गोष्ट लक्षांत येतांच ' हें वर्णन पुरें ' म्हणून श्रीकृष्ण शेवटीं सांगतात कीं,(२२) 'अशा भक्ताला मी डोक्यावर धारण करतों.' (पंढरपूर येथील विठ्ठलाच्या डोक्यावर शिवलिंग आहे या समजुतीशीं प्रस्तुत ओवीचा संबंध जोडला जातो.) (२३) **चौथी पुरुषार्थसिद्धि** = मोक्ष. भक्तीच्या मार्गानें मोक्षाचें वांटप ज्ञानी भक्त करीत असतो. (२४) **सोडी बांधी** = मोक्षाचा देण्या-घेण्याचा व्यवहार. घोड्याला सोडणें, बांधणें हें जसें पाग्याच्या हातीं असते, तसलाच अधिकार मोक्षाबाबत भक्ताला असतो; असा भाव. **तळवट** = खालचा भाग. इतका अधिकारी असूनहि तो पाण्याप्रमाणें नम्र असतो. ( "जळ तळवटु घे " = पाणी सखल भागाकडेच जातें.)

(२५) **जयाची टांच धरूं हृदयीं आम्ही** = भृगु ऋषीनें वक्षस्थलावर मारलेल्या लाथेचा ठसा एक शुभ चिन्ह म्हणून(वत्सलांछन)विष्णूंनीं धारण केला असल्याची पौराणिक कथा आहे, त्या कथेचा संदर्भ येथें आहे.

( २७–२९ ) भक्तासाठीं सगुण, साकार रूपानें आपण प्रकट झालों हा आशय पुढील ओंव्यांत श्रीकृष्ण सांगतात. निर्गुण, निराकार, निरिं-द्रिय म्हणूनच 'अचक्षू' अशा परब्रह्मानें भक्तदर्शनासाठींच डोळे आणि

(२८) भक्ताच्या आलिंगनासाठींच दोन नव्हे तर चार हात धारण केले. (२९) भक्त-सहवासाच्या सुखासाठींच अदेही (विदेही) असें परब्रह्म देहधारी विष्णूच्या स्वरूपांत प्रगट झालें. भक्तासाठीं अवतार घेणें ही गोष्ट त्याच्या आवडीचीच होऊन बसली आहे.

(३१-३२) भक्त त्याचे मित्र होतात; एवढेंच नव्हे तर भक्तवर्णन करणारे व भक्त चरित्राचें श्रवण करणारेहि मला आवडतात—हें निवेदन एका परीनें भक्तियोगाची फलश्रुति सांगणारेंच म्हटलें पाहिजे. प्राणापरौतें = प्राणापलीकडे, प्राणाहून अधिक. (३३) भक्तीची थोरवी या एका ओवींत सामावली आहे.

(३४-४२) या अध्यायांतील शेवटच्या २० व्या श्लोकावरील टीके-पैकीं प्रस्तुतच्या ओव्या आहेत. भक्त या पदवीला कोण कोण प्राप्त होतात तें ३४ ते ३७ या ओव्यांत सांगितलें आहे. हे गोष्टी = हें भक्तियोगाचें वर्णन.(४०) देवतार्चन = अर्चन-पूजन करण्याची देवता.(४१)व्यसन = छंद. निधिनिधान = ठेव्याची खाण. (४२) 'जे भक्त-चरित्रातें प्रशं-सिती'(३१) या ओवी-चरणाचाच अनुवाद पुन्हां या ओवींत केला आहे.

(४३-४८) श्रीकृष्णाच्या गुणवर्णनानें ज्ञानेश्वरांनीं १२ व्या अध्या-याचा समारोप केला आहे. अर्थात् हें वर्णन त्यांनीं संजयाच्या तोंडीं घातलें आहे. 'अशा अशा प्रकारचा श्रीकृष्ण हें सांगत होता आणि अर्जुन ऐकत होता.' असें शेवटच्या ओवींत संजय म्हणतो. 'चक्रवर्ती निजांचा (= भक्तराज श्रीकृष्ण)। सांगतुसे येरु (अर्जुन) दैवाचा। आइकतु असे ॥ ४८ ॥

राया = धृतराष्ट्र. कौरवपांडवांची युद्धकथा धृतराष्ट्राला सांगण्यासाठीं व्यासांनीं संजयाला नियुक्त केलें होतें. निर्मळ, निष्कल (कलारहित, संपूर्ण) हीं विशेषणें ब्रह्मरूप सदृशच आहेत. कृपालु, प्रणतप्रतिपालु, भक्तजनवत्सलु हीं विशेषणें कृष्णाचें भक्तप्रेम स्पष्ट करतात. (४३) निजजनानंद = भक्तांचा आनंद असा (श्रीकृष्ण). जगत् + आदि + कंद (गड्डा) = जगाच्या उत्पत्तीचें मूळ. (४४) शरण्यु = शरण जाण्यास योग्य. [कारण शरण आलेल्यांचा तो प्रतिपाळ करतो =

**प्रणतप्रतिपाळु.** ] (४५) **धर्मकीर्तिधवळु**–धर्माचें यश उज्ज्वल राखणारा. **अतुलबळ** = सामर्थ्याच्या बाबतींत अजोड. **बळीबंधनु** = बळीच्या बंधनांत राहिलेला. बळी पाताळांत दडपल्यावर त्याच्या औदार्यानें संतुष्ट झालेल्या वामन अवतारी विष्णूनें त्याचा द्वारपाल होण्याचें कबूल केलें अशी कथा आहे. (४६) **सुरसहाय्यशीळु** = देवांना साह्य करण्याचा ज्याचा स्वभाव आहे. विष्णूचे बहुतेक अवतार देवांच्या सहाय्यार्थच झाले आहेत. **लोकलालनलीळु** = लोकांचें संगोपन करणें हा ज्याचा खेळ आहे. हें कार्य तो आवडीनें करतो असा भाव. (४७) **भक्तजनवत्सलु** = भक्तांविषयीं मायाळु. **प्रेमजनप्रांजळु** = प्रेमळ लोकांना जो सरळ सोपा आहे. **सत्यसेतुसरळु** = सत्याच्या पुलावरूनच ज्याच्याकडे सरळ जातां येतें असा.

---

# २० नामघोषगौरव

गीतेच्या ९ व्या अध्यायांत राजयोगाचें म्हणजे भक्तिमा। रहस्य विवरण करून सांगितलें आहे. आसुरी स्वभावाच्या माणसांचे कर्म, ज्ञान, भक्ति हीं सारीं व्यर्थ होत; असें सांगितल्यानंतर दैवी स्वभावाच्या पुरुषांची योग्यता वर्णन करून त्यांच्या एकविध भक्ति-प्रेमाचा महिमा गायिला आहे. गीता अ. ९ श्लोक १३ व १४ या श्लोकांवरील टीकेचा कांहीं भाग प्रस्तुत उताऱ्यांत आला आहे.

( १–९ ) दैवी प्रकृतीच्या महानुभावांचें वर्णन या ओव्यांत आले आहे. ( १ ) **क्षेत्रसंन्यासी** = मरेपर्यंत एकाच तीर्थाचे ठिकाणीं राहण्याचा निश्चय करणारा. 'महात्म्यांच्या अन्तःकरणाचा मी कायम रहिवासी होतों' असा भावार्थ. **निजेलियातें वैराग्य उपासी**=झोपेंत देखील त्यांचें वैराग्य ढळत नाहीं. मन चलविचलित होत नाहीं. ( २ ) **राणिवा करी** = अधिराज्य गाजवतो. ( ३ ) **पूर्णता जेऊनि धाले** = हे महात्मे सदा तृप्त असतात. कारण नेहमींच स्वयंपूर्णतेचा अनुभव घेतात. **पालव** = पल्लव, कोंवळीं पानें. ( ४ ) **परिणामा ( चे ) कोंभ** = परिणत अवस्थेचे अंकुर. **आनंदसमुद्र** = ब्रह्मानंदरूपी सागर. ( ५ ) **येतुली** = एवढी. **परौतें** = पलीकडे, बाजूला. **लीलेमाजीं**=सहजपणें होणाऱ्या कर्माचरणांत; नेहमींच्या वागण्यांत **नीति** ( = आदर्श आचरण ) **जियाली दिसे** = सदाचरण जगलेलें दिसतें. भक्त नीतीचे मूर्तिमंत आधार होतात. ( ६ ) **करणीं** = इंद्रियें. **गवसणी** = आच्छादणारी खोळ, पांघरूण. ( ७ ) **महानुभाव** = मोठे अनुभवी पुरुष, महात्मे. ( मानभाव पंथी लोक नव्हेत. ) **दैविये प्रकृतीचें दैव** = दैवी स्वभावाच्या पुरुषांचें महद्भाग्य असे हे. ( ८ ) **मग......मातें भजती** = नंतर म्हणजे स्वस्वरूपाच्या ज्ञानानंतरहि माझी भक्ति करतात. 'ज्ञानोत्तर भक्ति' किंवा 'ज्ञानी भक्त' हाच गीतेंतील भक्तियोगाचा आदर्श ज्ञानेशांना मान्य आहे. ( ९ ) **नवलाव** = आश्चर्यकारक प्रकार, विलक्षण गोष्ट.

(१०–२४) श्लोक १४ मधील '**सततं कीर्तयन्तो मां**' एवढ्या पदांच्च व्याख्यान प्रस्तुत उताऱ्यांत घेतलें आहे. त्यांत भजन-कीर्तनाचेंच रम्य गायिलें आहे. ज्ञानेशांच्या वारकरीपंथीय भूमिकेशीं तें सुसंगतच . (१०) **नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे**= शास्त्री-पंडित, भट-भिक्षुक प्रत्येक पापाचरणाच्या निवृत्तीसाठीं प्रायश्चित्ताचें मोठें अवडंबर माजवित. भक्तिमार्गानें भजन-कीर्तनासारख्या सुलभ साधनांपुढें तें सारें कर्मकांड अनावश्यक ठरविलें. त्यामुळे वरील मंडळींचा व्यवसाय-धंदा नाहींसा झाला. (११) **अवकळा**= निस्तेजता, दुर्दशा. **ठाय** = ठिकाण किंवा उत्कर्ष. (१२) **यम** = मृत्यु देवता, किंवा यमसाधनें, मनःसंयमन, निग्रह. १० **दम** = दमसाधनें, इंद्रियदमन. **दोष** = पाप. (१४) **पाह्यवित** = उजाडवित, ज्ञानोदय करितात. (१५) **पाड धरूं** = साम्य, सारखेपणा धरूं. **कडसणी**= निवड. **एकसरें** = एकसारखें. (१६) **धवळलें विश्व** = (नामभक्तीनें) विश्व प्रकाशित (तेजस्वी) केलें.

(१७-१८) सूर्य, चंद्र, मेघ या वस्तु एकेका उणीवेमुळें उपमेला (भक्तांशी तुलनेला) पुऱ्या पडत नाहींत; असें सांगून **व्यतिरेक अलंकारानें** भक्ताचें महत्त्व पटवितात. **किडाळ** = दोष, व्यंग. भक्तांच्या ज्ञानोदयाला (उत्कर्षाला) अस्त माहित नाहीं. चंद्र पौर्णिमेला एकदांच पूर्ण असतो पण भक्त स्वरूपस्थितीनें नेहमींच पूर्ण असतो. ( हे सदा पुरते = 'पूर्णता जेऊनि धाले ') यांचें औदार्य किंवा बोध मेघांप्रमाणें ओसरत नाहीं. **सपांखर** = कृपाळू, दयाळू ( पण **पंचानन** = सिंह ). (१९) **भोजें** = प्रेमानें, कौतुकानें. **वोळगीजे** = सेवा करावी. **उमरडोनि जाय** = उलंघन करून जातो. (२०) **गिंवसावा** = शोधावा. (२२) **कीर्तनसुखें झालें आपणपांचि** = नामघोषाच्या आनंदामध्यें आपल्या स्वरूपाच्या ठिकाणींच रममाण होऊन राहिले. (२३) **निरवळ** = निव्वळ, केवळ. **निखिल** ( पाठभेद ) = अखिल, सर्व. **प्रबंध** = कवित्व, कथन. (२४) **विचरती चराचरीं** = (कित्येक भक्त माझी कथा करीत करीत ) सर्व जगांत संचार करतात.

---

# २१ ' हृदया हृदय येक जालें '

**अठराव्या अध्यायांतील ' सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ' (१८–६६) या सर्व-प्रसिद्ध श्लोकावरील व्याख्यानाचा भाग प्रस्तुत उताऱ्यांत घेतला आहे. अनेक दृष्टीनें हा समारोपाचा उतारा महत्त्वाचा आहे.**

( १ ) **सप्रपंच अज्ञान** = प्रपंच म्हणजे जन्ममरणाचें रहाटगाडगें मागें लागलेलें; हें सारें नश्वर वस्तुजात; ही भौतिक सृष्टि. हा प्रकृतीचा पसारा मूलवस्तुस्वरूपाविषयींच्या अज्ञानाचा परिपाक होय. अज्ञान हें कारण व प्रपंच हें त्याचें कार्य. तेव्हां अज्ञानाच्या कार्यासह (फलासह) अज्ञानाचा लोप होऊन स्वस्वरूप ज्ञान ( मी गोचरु होये ) प्रत्यक्ष होईल अशा प्रकारचें हें गीतारूप ज्ञान अनेक प्रकारच्या उपपत्तींनीं वेगवेगळ्या प्रकारें ( नानापरी ) तुला एथवर सांगितलें. ( २ ) **०वियालें धर्माधर्म जें = अज्ञान** व्यालें धर्मादिक. ( ४ ) = तेव्हां या ज्ञानाच्या योगानें तूं ' धर्म, अधर्म, पुण्य, पाप इत्यादि ( स्वर्गनरक सूचक ) कल्पनांना जन्म देणारें ' (मूळ अज्ञान संपूर्णपणें सोडून दे.) ( ३ ) **दुरित** = पाप. **दुर्भगत्व** = दुर्भाग्य, अभागीपणा. ( ५ ) रज्जुसर्प किंवा स्वप्नजागृति हे दृष्टान्त मायावादी तत्त्वज्ञानांतील नेहमींचे आहेत. **घराचारु** = गृहप्रपंच, संसार. ( ६ ) **नाना** = अथवा. **कवळ** = काविळ, ज्यांत दृष्टीला सारें कांहीं पिवळेंच दिसूं लागतें असा एक नेत्ररोग. **धुपे** = नाहींसा होई ( > धुपणें ). ( ७ ) **दिवसापाठी देउनि** = दिवसाला पाठीशीं घातल्यावर; संध्याकाळ झाल्यावर. **घापे त्यजुनि** = ( मृगजळ ) सोडून जातें. ( ८ ) **टवाळ** = मिथ्या. अज्ञानापाठोपाठ धर्म, अधर्म या कल्पनाहि नष्ट होतात. हा पहिल्या दोन ओव्यांतील विचारच पुन्हां येथें ( ८–९ ) सांगितला आहे. तो पटण्यासाठीं मध्यंतरीं कांहीं दृष्टांत दिले आहेत. (१०) **भिन्नाभिन्न आन नाहीं** = वेगळें असें दुसरें कांहीं नाहीं. ' आघवें मीचि ' ' विश्वा अशेखा भरला आहे ' **सोऽहं बोधें** = सः अहं =

' तो मीच आहे ' ही जाणीव ठेवून त्याच्या ठिकाणी एकविध भावानें विलीन हो. ( **तयाचां ठायीं अनन्यु होय** ) ( ११ ) ' मामेकं शरण व्रज ' = मला एकट्याला शरण ये. यांतील ' शरण ' शब्दाची व्याख्या या ओवीत ज्ञानेशांनी केली आहे. ' स्वतःचें भिन्नत्व विसरून स्वस्वरूपाचें एकत्व ओळखणें ' याचें नांव शरण जाणें होय. याला ज्ञानेशांचे नेहमीचे दाखले ( १२–१३ ) घट आणि आकाश, सुवर्ण आणि मणि, कल्लोळ आणि पाणी यांचे. ( १४ ) समुद्रांत राहूनहि वडवानलानें आपला ज्वलनाचा वेगळेपणा कायम ठेवला; तसें करूं नकोस; (ती गोष्ट) **वाळूनि दे पां** = सोडून दे. ( १५ ) माझ्यापाशी येऊनहि **जीवग्रंथी न सुटणें** म्हणजेच भिन्न राहणें ही गोष्ट तुला–मला दोघांनाहि लाजिरवाणी आहे. ( १६ ) कारण कोणाहि सामान्य राजाशी संबंध येतांच साधी दासीदेखील त्याच्या तोलाची होऊन जाते. ( १७ ) **वोखटें बोल** = वाईट, असत्य गोष्टी. ( १८ ) मी होऊन माझी भक्ति करणें ही सहज-भक्ति **येणें ज्ञानें** = या गीताज्ञानानें (तुला हस्तगत करतां येईल).

(१९-२२) परब्रह्म स्वरूपाशी एकदां विलीन झाल्यावर मग धर्म, अधर्म वाचक कर्मे बाधक होत नाहींत. ही कल्पना स्पष्ट करण्यासाठीं ज्ञानेश्वरांनीं आपले नेहमीचे दृष्टान्त दिले आहेत. ताकापासून निघालेलें लोणी, परिसस्पर्शानें लोहाचें झालेलें सोनें, काष्ठापासून उत्पन्न झालेला अग्नि ही सारी पुन्हां गोण अशा पूर्वस्थितीला जात नाहींत. (२३-२४) परब्रह्माशीं एकरूप झाल्यावर त्यावांचून अन्य काहीं उरतच नाही. जसा सूर्यापुढें अंधार किंवा जागृतीनंतर स्वप्नाभास टिकत नाहीं. (२५-२६) म्हणून पापपुण्याची काळजी तुला नको. पाण्यांत पडलेलें मीठ जसें पाणीच होऊन जातें, त्याप्रमाणें तू मला अनन्यभावानें शरण आलास कीं मद्रूप होऊन जाशील (२७) द्वैतभाव हेंच मुख्यतः बंधनकारक पाप आहे, तें अद्वैत-बोधानें निष्फळ (**वायाणें** = व्यर्थ) होऊन जाईल. त्यामुळें (२८) आपसूकच तूं मुक्त होशील. **मज प्रकाशोनियां घेईं** = माझ्यावर प्रकाश पाडवून घे; माझें स्वरूप तूं समजून घे. (म्हणजे मीच तुला सर्व बंधनांतून सोडवीन.) (२९) **आधीं न वाहे** = चिंता-काळजी वाहूं (करूं) नकोस. **मामेकं**

**शरणं व्रज** = 'मज एकासि ये ( सुमती। जाणोनि ) शरण ॥–' यांतील 'जाणोनि' हें पद महत्त्वाचें. भोळीभावडी भक्ति नको. जाणून समजून मला भज ( ज्ञानोत्तर भक्ति कर). (३०) असें श्रीकृष्ण बोलिला. या ओवींतील श्रीकृष्णाचीं विशेषणें ब्रह्माच्या सगुण पण विराट स्वरूपाचीं वाचक आहेत. **सर्वरूपरूपस** = अनेक रूपांच्या योगानें रूपवान (रूपस). **सर्वदृष्टिडोळस** = अनेक दृष्टींच्या योगानें डोळस असा. **सर्व देश-निवास** = सर्वत्र राहणारा. (३१) **सकंकण बाहु दाक्षिणु** = कंकण-युक्त (सलकडी असलेला) उजवा बाहू. (३२) तेथपर्यंत प्राप्त न झालेली वाणी बुद्धीला काखोटीस मारून (काखेसूनि) मागें परतली. कारण (३३) बुद्धिवाद करून, बोलून जें देतां येणार नाहीं ( असें अंतरीचें प्रेम ) तें देण्यासाठीं श्रीकृष्णानीं हें आलिंगनाचें (**खेवाचें**) निमित्त ( **मिख** ) केलें. (३४) आणि द्वैत (भिन्नत्व) न मोडतां अर्जुनाला अद्वैतानुभव प्राप्त करून दिला. (३५) जसा एका दिव्यानें दुसरा दिवा लावावा, तसा हा आलिं-गन (**परिष्वंगु**) प्रकार झाला. [परिससंगु हा पाठभेद येथें अप्रस्तुत आहे.]

(३६-३८) कृष्णार्जुन आलिंगनानें दोघांनाहि जो सुखानंद अनुभवास आला त्याचें वर्णन या ओव्यांत केलें आहे. सर्वसमर्थ (**वाड**) देवहि त्या सुखानुभवांत बुडून गेले. (३७) दोन समुद्र एकमेकाला मिळाल्यावर तेथील पाणी दुप्पट होऊन उचंबळतें आणि भरतीला वर आकाशाची जागा व्यापतें; तसें त्या दोघांचें प्रेम भरतीस आलें असा भावार्थ. (३८) दोघांनाहि त्याला आवर घालतां येईना. सर्व विश्वच नारायणानें भरून गेलें ( **कोंदलें** ). (३९) अशा प्रकारें वेदांचें मूळ असलेलें व सर्व अधि-कारसंपन्न असें पवित्र गीताशास्त्र श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलें. ( **प्रकट केलें.** )

---

# २२ पसायदान

'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः' या शेवटल्या श्लोकावरची टीका संपल्यानंतर ( अ. १८-१६३१-१६६३ ) ज्ञानेशांनीं सर्व ग्रंथाच्या समारोपादाखल सुमारें १५० ओव्या लिहिल्या आहेत. त्यामध्यें अनेक अंगांनीं त्यांनीं ग्रंथसमारोप केला आहे. प्रारंभी गीतेच्या ७०० श्लोकांची महति, त्यांचें सौंदर्य वर्णन करणारी उत्प्रेक्षांची एक मालाच ज्ञानेशांनीं गुंफिली आहे. त्यानंतर 'गीता ही प्रभूची वाङ्मयी मूर्ति आहे.' असें सांगून गीतेचा महिमा वर्णिला आहे. ( उतारा ३–गीता-गौरव पाहा. १६८४-९४) त्यापाठोपाठ गीताकार व्यासांची थोरवी वर्णन करून त्याबरोबर स्वतःच्या लेखन धाष्टर्याचें समर्थन ते करीत आहेत. (उतारा ४–व्यासांचा मागोवा पाहा. १६९५-१७२२ ) त्यापुढें गुरुकृपेच्या सामर्थ्याचें वर्णन येतें. ( उतारा ६–गुरुकृपेचें सामर्थ्य पाहा. १७२३-३४ ) त्यापुढील पंधरा ओव्यांमध्यें स्वतःच्या ओवीबद्ध गीता-टीकेच्या प्रभावाबद्दल आत्मविश्वासाचे उद्गार ज्ञानेशांनीं काढले आहेत. ( १७३५-१७५० ) पुढें आपली नाथसंप्रदायी गुरुपरंपरा सांगून गुरुक्रमानें लाभलेलें हें समाधि-धन गुरूच्या प्रोत्साहनानेंच ग्रंथरूपांत तुमच्यापुढें मांडिलें आहे ' असें श्रोत्यांना उद्देशून ज्ञानेश्वर म्हणतात. पुढें ( १७६४-१७९० ) ज्ञानेश्वर स्वतःसंबंधींचा शालीनभाव व्यक्त करून ग्रंथकर्तृत्वाचें सारें श्रेय संतश्रोत्यांना देऊन टाकतात. ' किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण' अशी लीनता व्यक्त करून मग या ग्रंथकर्तृत्वाबद्दलचें प्रसाद-दान ज्ञानेश्वर मागत आहेत. तोच उतारा या संकलनांतील शेवटचा म्हणून या ठिकाणीं घेतला आहे.

( १ ) **विश्वात्मकें देवें** = विश्वरूपानें नटलेल्या देवानें. ( जनता-जनार्दनानें ) ज्ञानेशांच्या चिद्विलासी तत्त्वज्ञानाला धरूनच हा निर्देश आहे. **वाग्यज्ञ** = ग्रंथरचना, गीतेवरील व्याख्यान हें जणूं यज्ञकर्मच आहे. ( २ ) **व्यंकटी** (वांकुडे–पाठभेद) = वांकडेपणा, वक्र दृष्टि. **रती वाढो**= प्रेम-आवड वाढूं दे. **भूतां** = प्राण्यांच्या ठिकाणी. **मैत्र पडो** = मित्र-भाव–(स्नेह) निर्माण होवो. (३) **दुरितांचें तिमिर** = पापाचा अंधार. **विश्व पाहो** = ( स्वधर्म सूर्याकडून ) जग प्रकाशित होवो. **लाहो** = लाभूं दे. ( ४ ) **मांदियाळी** = मंडळी, समुदाय. **अनवरत** = अखंड, निरंतर. ( ५ ) **आरव** = बगीचा. **अर्णव** = समुद्र. **पीयूष** = अमृत. ( ६ ) संतसज्जनांचें विशेष महत्त्व व्यतिरेकानें वर्णन करतात. जसें: **अलांछन** = अकलंक, कलंकरहित ( चंद्रमा). **तापहीन मार्तंड** ( सूर्य ) **सोयरे** = आवडते आप्त. ( ७ ) **आदिपुरुख** = ब्रह्म. ( ८ ) **ग्रंथोप-जीवियें** = हा ग्रंथच ज्यांचें जीवन होऊन राहिला आहे. **दृष्टादृष्टविजयें**= इहलोकीचे व परलोकीचे लाभ व्हावेत ( होआवें ). ( ९ ) **विश्वेशराव** = विश्वरूप श्रेष्ठ ईश्वर. त्यानें ' तथास्तु ' ( **हा होईल दानपसावो** ) असा आशीर्वाद दिला. त्यामुळें ज्ञानदेवांना परमसुख झालें.

---